लोकीं[1] वाद नको, अहंमति नको, मायापसारा नको,
आत्मा तूंच समाधि भोगुन कदा काळास शंकूं नको. ॥ ५
नाना[2] देश फिरूं नको; जनिंवनीं राहून भागूं[3] नको;
लोकीं लाज[4] धरूं नको; हरिकथाविश्वास सोडूं नको; ।
कर्णीं दुष्ट कठोर शब्द पडती तें दुःख मानूं नको
भोगें दुःखसुखादि सारुनि निजानंदास भंगूं नको. ॥ ६
नाना[5] नेम नको, व्रतें[6] करुं नको; कर्मांत गूंतूं नको
पुण्याची मनिं कामना[7] धरुं नको; मूर्खांत बैसूं नको; ।
देहाचें सुखदुःख तें गणुं[8] नको; चिंता भवाची[9] नको;
**'श्रीनारायण'**नाम सार[10] जपतां जन्मास येणें[11] नको. ॥ ७
'झालें' 'होइल' 'होतसे जग' असें चित्तांत कल्पूं नको;
'केलें कर्म' 'करीन हें' 'करितसें' हें सत्य मानूं नको; ।
लोकीं तूं खळ[12]संगती धरुं नको; स्नेहांत गुंतूं नको;
'मी' 'माझेंच कुटुंब' हें म्हणुं नको; वेदास[13] सोडूं नको. ॥ ८
संसारीं असतां प्रवाहपतितद्वंद्वांसि[14] त्रासूं नको;
खेदाखेद[15] मनांत आणुनि, वनीं[16] जाणें विचारूं नको; ।
'कांहीं घेइन' हे मती धरुं नको; 'सोडीन' हेही नको;
आत्मा तूं परिपूर्ण एक असा[17]सी सिद्धांत सोडूं नको. ॥ ९
लाभीं[18] हर्ष नको; विषादहि नको; निंदाप्रशंसा नको;
हानीचा मनिं शोक तूं धरुं[19] नको; देहीं अहंता नको; ।

---

१. कोणतें मत खरें याविषयीं लोकांशीं वाद घालूं नये. वेदांत हेंच एक मत खरें धरून चालावें. २. आत्मज्ञानप्राप्तीसाठीं नाना देश हिंडणें जरूर नाहीं. ३. दमूं नको, थकूं नको. 'भोगूं नको' असाही पाठ आढळतो, पण तो अपपाठ असावा असें वाटतें. ४. स्वमतावलंब केल्यावर त्याची लाज धरूं नये. ५. नाना नेम व व्रतें यांची कांहीं मातबरी नाहीं, त्यांपासून मोक्षप्राप्ति होत नसते. ६. 'व्रतें मख नको' असाही पाठ आहे. ७. इच्छा. ८. मानूं नको, मोजूं नको. ९. संसाराची. १०. उत्तम, श्रेष्ठ. ११. 'येऊं असा अन्य पाठ आहे.' १२. दुष्टांची सोबत. १३. 'वेदांत' असाही पाठ आहे. १४. पापपुण्य, सुखदुःख इत्यादि विरुद्ध गुणंदर्शक वस्तु. १५. सुखदुःख. १६. वनांत जाण्याचा विचार करूं नको. 'मनीं जाणें' असाही पाठ आहे, पण तो अपपाठ असावा. १७. 'एकचि असा' 'एक असतां' असे पाठभेद आहेत. १८.'लाभीं हर्ष अलाभिं दुःखहि नको' असाही पाठ आहे.१९.'करुं नको' असें पाठांतर आहे.

कोणाचें इतिकृत्य तें स्मरुं नको; ‘माझें तुझें’ हें नको;
आप्तासी ममता नको; गुरुपरब्रह्मासि सोडूं नको. ॥ १०
कांहीं [1]मंत्र नको; क्रिया करुं नको; वार्ता [2]जनासी नको;
देहा ध्यास कुलाभिमान हृदयीं कर्तव्य ठेवूं नको; ।
‘कर्ता मीच’ असें कदां म्हणुं नको; कार्यांत गुंतूं नको;
रामोपासन लोकसिद्ध असतां [3]ऐक्यत्व खंडूं नको. ॥ ११
कोणाशीं मनिं [4]वक्रता धरुं नको; [5]भिन्नत्व ठेवूं नको;
कोणाचे गुणदोषही गणुं नको; मैत्री जनाची नको; ।
चिंता तूं निजमानसीं करुं नको; [6]देहात्मबुद्धी नको;
ब्रह्मावीण दुजें कदां स्मरुं नको; सद्भाव सोडूं नको. ॥ १२
नाना ग्रंथ नको; तपें जप नको; तूं [7]वाद घालूं नको;
नाना धर्म [8]हटादियोगहि नको; आशा धनाची नको. ।
नाना तर्क नको; मनीं [9]भ्रमुं नको; रागास येऊं नको;
**‘ब्रह्मास्मीति’** भुलूं नको; [10]निजपदानंदास भंगूं नको. ॥ १३
शंका भीति नको; वृथा भ्रमुं नको; दुःसंग सेवूं नको;
देहाचें कृत कर्म तें निजशिरीं वाहोन घेऊं नको; ।
नाना मार्ग नको उपाधिमळ हा आत्म्यास लावूं नको
[11]चित्तीं दोषकलंक संशय नको; [12]अद्वैत सोडूं नको. ॥ १४
देहाची ममता कदा धरुं नको; आशा गृहाची नको;
लोकांची मनिं भीड तूं धरुं नको; निंदेस शंकूं नको; ।
पोटाची [13]हृदिं काळजी करुं नको; हा देह दंडूं [14]नको;
[15]सत्संगाविण संगती करुं नको; सद्बुद्धि सोडूं नको; ॥ १५

---

१. मसलत, उपदेश. ‘मार्ग’ असा अन्य पाठ आहे. २. ‘जनाची’ असाही पाठ आहे. ३. अद्वैतमताचें खंडन करूं नको. ‘एकत्व’ असाही पाठ आहे. ४. वांकडेपणा, वैर. ५. आपपरभाव ठेवूं नको. ६. देहास आत्मा मानणें ही बुद्धि नको. देहवादी आत्म्याचें अस्तित्व मान्य करीत नाहींत. देहासच आत्मा मानणें ठीक नाहीं—असें कवीचें मत असावें. ७. कोणतें मत ग्राह्य याविषयीं वाद घालूं नको. ८. योगाचे राजयोग व हटयोग असे दोन भेद आहेत. ९. ‘भ्रम’ असा पाठभेद आहे. १०. ‘निजपरानंदास’ असें पाठांतर आहे. पर=परम=श्रेष्ठ, सर्वोत्कृष्ट. ११. ‘चित्ता’ असाही पाठ आहे. १२. परमेश्वर व आत्मा यांत फरक न मानणें. १३. अंतःकरणांत, हृदयांत. १४. मुद्रा, उपास, व्रतें इत्यादि करून देहास त्रास देऊं नये. १५. ‘सत्संगेंविण अन्यसंगति नको’ असाही पाठ आहे.

KÂVYASANGRAHA. 23.

A

# COLLECTION OF MARÂṬHÎ POEMS.

BY

# VARIOUS MARÂṬHÎ POETS.

*"A true poem is a gallery of Pictures".*

*SIR JOHN LUBBOCK.*

## PART II.

*EDITED WITH*

CRITICAL AND EXPLANATORY NOTES

BY

VÂMANA DÂJÎ OKA,

HEAD MASTER, HIGH SCHOOL, RAIPORE.

PRINTED AND PUBLISHED

BY

TUKÂRÂMA JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JÂVAJÎ DÂDÂJÎ'S "NIRṆAYA-SÂGARA" PRESS.

Bombay.

1896.

*Price 14 Annas.*

काव्यसंग्रह. २३.

अनेककविकृत

# लघुकाव्यमाला.

## भाग दुसरा.

'कविवाक्यामृततीर्थस्नानैः पूता भृशं यशोदेहाः ।
येषां त एव भूपा जीवन्ति मृता वृथैवान्ये.' ॥

सुभाषित.

हा

वामन दाजी ओक,

हेडमास्तर, हायस्कूल, रायपुर;

यांनीं अर्थनिर्णायक व अवांतर माहितीच्या टीपा देऊन
जुनाट हस्तलिखित प्रतींच्या आधारें
तयार केला.

तो

मुंबईत जावजी दादाजी यांच्या 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक
तुकाराम जावजी यांनीं छापून प्रसिद्ध केला.

१८९६.

किंमत १४ आणे.

ह्या ग्रंथ,

कैलासवासी महादेव मोरेश्वर कुंटे, बी. ए.,

हेडमास्तर, हायस्कूल, पुणें; व 'षड्दर्शनचिंतनिका'कार;

ह्यांच्या आत्म्यास,

त्यांच्या आंगच्या विद्याव्यसन, सत्यप्रीति, कर्तव्यदक्षता,

स्वराष्ट्राभिमान इत्यादि गुणांच्या

अभिनंदनार्थ

अर्पण केला असे.

'काव्यसंग्रह'कार.

# प्रस्तावना.

आज आम्ही आपल्या प्रिय वाचकांस लघुकाव्यमाला–भाग २ अर्पण करीत आहों. मंगलरूप परमेश्वरानें अशी सुसंधि लौकर आणली ही त्याची कृपा होय. पहिल्या मालेप्रमाणें या मालेंतही पंचवीस पुष्पें गुंफिलीं आहेत. त्यांपैकीं सोळा अनाघ्रात म्हणजे आजपर्यंत कोणीही वास न घेतलेलीं आहेत. या मालेंत एकंदर तेराशें सोळा पांकळ्या आहेत, त्यांपैकीं नवीन फुलांच्या एक हजार तेवीस आहेत.

(१) या मालेंत गुंफलेलीं नवीन पुष्पें कोणाकडून व कोणतीं मिळालीं हें पुढें दर्शविलें आहे:—

रा. रा. **कृष्णाजी विष्णु आचार्य** (म्हसवड)–रामगौरव व चंद्रावळीवर्णन.

रा. रा. **श्रीनिवास नीलकंठ सरमोकादम** (वणी)–शुकरंभासंवाद व दामाजीपंतचरित्र.

रा. रा. **पांडुरंग आबा जोशी मोघे** (वसई)–नौकाक्रीडनाख्यान व शबर्याख्यान.

रा. रा. **गणेश कृष्ण देशपांडे** (धारवाड)–बलिदानकथा व रावणगर्वपरिहाराख्यान.

रा. रा. **भगवंत बाळकृष्ण पै रायकर** (होडावडें)–पंचीकरण व निःसंदेहदिवाकर.

रा. रा. **गोविंद विष्णु श्रीखंडे** }
रा. रा. **नारायणराव मास्तर** } (खांडवा)–शिबिचरित्र व गोपीकृष्णाख्यान.

रा. रा. **पांडुरंग केशव ओव्हरसीयर** (कोल्हापूर)–सुभद्राहरण.

एक मित्र (गोवें)–सत्यभामाविनोद, विठ्ठलस्तुति व स्थालीपाककथा.

(२) तसेंच रा. रा. **गोविंद विष्णु श्रीखंडे** व **चिंतो गोविंद वैशंपायन** (पालशेत) यांनीं 'सुविचारमाला' व श्री. रा. **गणेश काळबा गाडेकर** (वेंगुर्लें) यांनीं 'व्यंकटेशस्तुति' व 'सीतास्वयंवर' या काव्यांच्या लेखी प्रती जुन्या छापील प्रतींशीं ताडून पाहण्यास दिल्या.

यास्तव या सर्व सज्जनांचे फार फार आभार मानून 'वारंवार असेंच साहाय्य करीत असावें' अशी सविनय प्रार्थना करून तूर्त रजा घेतों.

पहिल्या मालेप्रमाणें हीही रसिकांस मान्य होईल अशी आशा आहे, ती परमेश सफल करो.

**'काव्यसंग्रह'कार.**

# अनुक्रमणिका.



१. या काव्यांच्या कर्त्यांचीं नांवें माहीत नाहींत.

# अनेककविकृतलघुकाव्यमाला

## भाग दुसरा.

---

## पांडुरंगकविविरचित[1]

### १. रा[2]मगौरव.

(श्लोक.)

श्रीरामकृष्णगुरु सौ[3]ख्यद वंदियेला, प्रारंभ दिव्य मग [4]काव्यरसासि केला; ।
हा 'रामगौरव' धरा स्वमनीं सदाही देऊनि [5]उत्तमगती [6]अघसंघ [7]दाही. ॥ १

[8]विश्वाद्या! करुणाकरा! बहुत मी यो[9]नी पहा हिंडलों,
कोठेंही सुख पाहिलें न नयनीं, नानापरी दंडलों; ।

---

१. हा कवि कोण होता, कोठें राहात होता इत्यादि माहिती मिळत नाहीं. या कवीनें केलेलीं पुढें लिहिलेलीं काव्यें आमच्यापाशीं आहेत:—(१) द्रौपदीस्वयंवराख्यान—ग्रंथसंख्या ६७, (२) शिवनिशाख्यान—ग्रंथसंख्या ५१, (३) स्थालीपाक—ग्रंथसंख्या ४७, (४) पार्थहनुमंतसंवाद—ग्रंथसंख्या ३२, (५) रामगौरव—ग्रंथसंख्या १००, (६) नारायणरावपेशवेचरित्र—ग्रंथसंख्या २२३, (७) अश्विन्याख्यान—ग्रंथसंख्या १५१, एकंदर ग्रंथसंख्या ६७१ व कांहीं पदें. ह्याशिवाय पांडुरंगाची आणखी कविता मिळविण्याचा आमच्या शोधक वाचकांनीं प्रयत्न करावा, अशी सविनय विज्ञप्ति आहे. २. ह्या काव्यांत कवीनें रामाची मनोभावपूर्वक स्तुति करून, आपणास मुक्ति मिळण्यासाठीं प्रार्थना केली आहे. हें काव्य बरेंच सरळ, रसाळ व सुबोध आहे. ३. सुख देणारा. ४. शृंगारादि रस. येथें मुख्य भक्तिरस. ५. मोक्ष. ६. पातकराशि. ७. भस्म करी. ८. जगाच्या अगोदरच्या! ९. कीटकपश्वादिजन्म. एकंदर योनी चौऱ्यायशीं लक्ष आहेत. या चौऱ्यायशीं लक्ष योनींची संख्या अशी:—२१ लक्ष अंडज खाणींत [९ लक्ष योनि सर्प मुंगी इत्यादि, ४ लक्ष योनि जळचरांत, ८ लक्ष योनि पक्षिकुळांत,—मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष जारज खाणींत [९ लक्ष द्विपद योनि, ४ लक्ष चतुष्पद योनि, ८ लक्ष श्वापद योनि,—मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष उद्भिज्ज खाणींत, [९ लक्ष अन्नधान्यादिक, ४ लक्ष सुगंधादिक पदार्थ, ८ लक्ष वृक्ष तृण इत्यादि,—मिळून २१ लक्ष]; २१ लक्ष स्वेदज खाणींत [९ लक्ष तारागणादिक, ४ लक्ष मेघमाला, ८ लक्ष हिरे रत्न माणिकादि, मिळून २१ लक्ष]; याप्रमाणें प्रत्येक खाणींत २१ मिळोन चार खाणींत ८४ योनि होतात. दुसऱ्या मताप्रमाणें २१ लक्ष वृक्षयोनि, ११ लक्ष कीटकयोनि, ३० लक्ष पशुयोनि, ९ लक्ष जलचरयोनि, १० लक्ष पक्षियोनि, आणि ४ लक्ष मनुष्ययोनि, मिळून ८४ लक्ष योनि होतात.

काहीं पुण्य उभारितां अवचटें[1] आलों नृदेहाप्रती[2]
आतां जन्म पुन्हा नको रघुपते! दे मुक्ति[3] कीं शीघ्र ती. ॥ २

बालत्व हें अज्ञदशेंत गेलें, तारुण्यकाळीं हित नाहिं केलें ।
वार्धक्य[4] आलें क्षिण होय शक्ति, सारांश रामा! घडली न भक्ति. ॥ ३

झाला नृदेह परि कांहिं घडे न सेवा, आतां गती[5] मज तरी कसि होय देवा!? ।
मी तों[6] अशक्त न घडे हरि! तीर्थयात्रा, कोणा स्मरूं? तरि तुम्हाविण सौख्यपात्रा!॥

चित्तें कसी टाकिलि आत्मशुद्धि? भवार्णवीं[7] मग्न सदैव बुद्धि, ।
दारांसुतांनीं मन गोंवियेलें[8], आलों नृदेहा हित काय केलें? ॥ ५

कामाग्नि जाळी, बहु कोप वाढे, मदोन्नता मत्सर टाकि दाढे ।
लोभाभिमानें कृतदीर्घतृष्णा[9] यापासुनी सोडविं रामकृष्णा! ॥ ६

कुमती[10] न ढळे, बहु घात करी, शिण होय मला हरि! धांव तरी, ।
बुडतों भवसिंधुजळीं[11] उघडा तरि काय तुला न कळे? सुघडा[12]! ॥ ७

संसार हा परमघातक गोड वाटे, झाला मना भ्रम कसा मद मोह दाटे, ।
आशा न जाय, मज भेद[13] अखंड जाची, रामा! 'तुझा' म्हणवितों तुज लाज याची.८

कुटिल[14] परम बुद्धी, निंदिले विप्रसंत[15]
दुरित[16] बहुत झालें, कांहिं लागे न अंत; ।
म्हणुनि शरण आलों मी तुला रामराया!
शरधनुसह धांवें मुक्त मातें कराया. ॥ ९

---

१. अकस्मात. २. मनुष्यदेहाप्रती. ३. मोक्ष. मुक्ति चार प्रकारची आहे:—सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता. उपास्य देवतेच्या लोकीं राहणें ती सलोकता; उपास्य देवतेच्या संनिध राहणें ती समीपता; उपास्य देवतेचें व आपलें स्वरूप व गुण सारखें होणें ती सरूपता; आणि उपास्य देवतेमध्यें (ब्रह्मीं) मिळून लीन होणें ती सायुज्यता. ४. वृद्धपणा. ५. सद्गति. ६. तर. ७. भवसमुद्रीं. ८. गुंतविलें, मोहिलें. ९. लोभ आणि अभिमान यांनीं वृद्धिंगत केली आहे वासना ज्याची असा मी आहें त्या मला. १०. या श्लोकाचें वृत्त **'तोटक'** आहे. यांत चार सगण असतात. 'याचें लक्षण:—'सकारैरन्वितं वृत्तं चतुर्भिर्युगपत्स्थितैः । उदितं तोटकं नाम वृत्तज्ञैर्द्वादशाक्षरम् ॥' [श्रीक्षेमेंद्रकृत सुवृत्ततिलक—१।२५]; 'द्रुतताललयैरेव व्यक्तं रूक्षाक्षरैः पदैः । प्रनर्तयति यच्चित्तं तत्तोटकमभीप्सितम् ॥.' [सुवृत्ततिलक—२।१६.] ११. संसारसमुद्राच्या पाण्यांत. १२. बुद्धिवाना, चतुरा, शहाण्या. १३. द्वैत. १४. वांकडी. १५. ब्राह्मण व साधू. १६. पातक.

मी तों पतीत, तुज पावन नाम साजे; हें [1]ब्रीद होय तरि ये, ढकलूनि लाजे ।
चिंता तुझी तुज असो, विनवूं कशाला? येसी गमे [2]भरंवसा [3]त्रैयलोकपाला!॥ १०
तूं आपला म्हणविला न धरूनि शंका, केला क्षपाचर सुखी [4]हरि! [5]दत्तलंका ।
मी तों मनुष्य तव सेवक घोष लोकीं रामा! म्हणोनि मजला [6]सकृपा विलोकीं.॥ ११

[7]दयार्णवा! तूं मम [8]तातमाय, दावीं तुझे सुंदर दिव्य पाय, ।
ते मी मनीं ठेविन आवडीनें, गोष्टी सख्या! सिद्धिस एवढी ने. ॥ १२

[9]रामा! मी तव [10]दासदास म्हणवीं, मातें कशाचें भय?
रामा! जाइन जे स्थळीं सुखघना! होईल तेथें जय, ।
रामा! या भुवनत्रयीं तुजविणें नाहीं दुजा [11]तारक,
रामा! तूं [12]सकळार्थ पूर्ण करिसी, तूं तात मी [13]बाळक. ॥ १३

---

१. कर्तव्य, प्रतिज्ञा, बाणा, लौकिक. २. भरंवसा=भरवश, भरोसा. [भरवशो महान् प्रत्ययः । 'भरोसा' इति भाषया । स्तुतिकुसुमांजलि—स्तोत्र ११, श्लोक ३२ टीका; पृष्ठ १७० पहा.] ३. स्वर्ग, मृत्यु व पाताळ या तिन्ही लोकांस पाळणाऱ्या! ४. हे हरि. जो जडजनांचीं दुःखें हरितो तो हरी. ['हरि जडदुःख म्हणूनि कीं हरि तो'. वामनपंडित—जटायुस्तुति ३६.] ५. दत्तलंका हें क्षपाचर (बिभीषण) याचें विशेषण करावें. ६. सकृपा रामा=दयाळू रामा—किंवा कृपेसह=कृपेनें. ७. दयासागरा! ८. बाप आणि आई. ९. ज्याच्या योगानें मुनींचीं मनें रमती तो राम. ['मुनिमनें रमती रघुनंदना! तुजमधें दशकंधरसूदना! । म्हणुनि निर्गुण जानकिनायका! म्हणति **'राम'** तुतें गतिदायका! ॥' वामनपंडित—रामस्तव १.] १०. दासांचा दास. ११. तारणारा, तारणकर्ता. १२. सर्व हेतु. १३. या श्लोकाचें वृत्त 'शार्दूलविक्रीडित' आहे. याचें लक्षण असें आहे:—'मसजैः सततैर्गेन युक्तमेकोनविंशवत् । शार्दूलक्रीडितं प्राहुश्छिन्नं द्वादश सप्तभिः ॥ ३६ ॥' [सुवृत्ततिलक—प्रथम विन्यास.] 'साकाराद्यक्षरैः पादपर्यंतः सविसर्गकैः । शार्दूलक्रीडितं धत्ते तेजो जीवितमूर्जितम् ॥ ३५ ॥ विसर्जनीयस्योत्वेन पदैर्निम्नोन्नतैरिव । शार्दूलक्रीडितं याति पाठे सायासतामिव॥३६॥ विच्छिन्नपादं पूर्वार्धे द्वितीयार्धे समासवत् । शार्दूलक्रीडितं भाति विपरीतमतोऽधमम् ॥ ३७ ॥ आद्यंतयोर्गुणोत्कर्षकांत्या सर्वातिशायिनोः । शार्दूलक्रीडितं धत्ते मध्ये तद्गौरवोन्नतिम् ॥ ३८ ॥ आद्यंताकारविरहात्पर्यंते चाविसर्गतः । शार्दूलक्रीडितं स्वस्य रूपं नैवोपलभ्यते ॥ ३९ ॥' [सुवृत्ततिलक—द्वितीय विन्यास.] 'शौर्यस्तवे नृपादीनां शार्दूलक्रीडितं मतम् ॥ २२ ॥' [सुवृत्ततिलक—तृतीय विन्यास.] याचा भावार्थ असाः—ज्या वृत्ताच्या प्रत्येक चरणांत १९ अक्षरें असतात आणि बाराव्या आणि त्यानंतर सातव्या अक्षरावर यति असतो आणि ज्यांत म-गण, स-गण, ज-गण, स-गण, त-गण, त-गण आणि एक गुरु अक्षर अशी रचना असते त्यास **शार्दूलविक्रीडित** वृत्त म्हणावें. अकारादिपासून विसर्गापर्यंत प्रत्येक चरणांत अक्षरें गोविलीं असलीं तर तें **शार्दूलविक्रीडित** मोठें भारदस्त आणि सतेज असें समजावें. जागोजागीं वि-

[१]रसना तव नाम गातसो गुणसिंधो! तनुधर्म हा वसो ।
हृदयीं तवरूप कीं ठरो, [२]सुखधामा! मन पूजनीं भरो. ॥ १४

तूं **'विश्वंभर'** बोलती श्रुति, तरी मी काय [३]विश्वापर?
विश्वीं मी असलों तरी **रघुपते**! तारीं मला लौकर, ।
दीनोद्धार [४]मुनि प्रशस्त वदले मी थोर झालों कसा
संरक्षीं [५]निजभृत्य सत्वर **विभो**! रक्षीं ब्रिदाचा ठसा. ॥ १५

**न** जाणें मी पूजा, न मज समजे [६]ध्यान करणें,
**न** जाणें रूपातें, न कळत कशी प्रीति धरणें, ।
**न** जाणें पायांतें न मज तरि [७]सत्संग घडला,
तुझे नामीं **रामा**! [८]दिननिशिं मम प्राण जडला. ॥ १६

---

सर्गयुक्त पदें आल्यानें **शार्दूलविक्रीडित** म्हणतांना खालउंच चालण्याप्रमाणें हिसके बसतात. पूर्वार्धांत वेगळालीं पदें असलीं व द्वितीयार्धांत समासयुक्त असलीं तर तें **शार्दूलविक्रीडित** विपरीत आणि निकृष्ट समजावें. आरंभ आणि अंत हे सुंदरतम साधतां आले तर गुणोत्कर्षांच्या सौंदर्यानें मध्यभागीं **शार्दूलविक्रीडिता**स गौरव आणि श्रेष्ठत्व प्राप्त होतें. आरंभीं आणि शेवटीं 'आ'कार नसला व अंतीं विसर्ग न आला तर **शार्दूलविक्रीडिता**स आपलें स्वरूप प्राप्त झालें नाहीं असें समजावें. राजे वगैरे भुजबलशाली वीरांच्या शौर्याचीं प्रशंसा करावयाची असली तर **शार्दूलविक्रीडित** योजावें, असें ज्ञात्यांचें मत आहे.

१. जीभ. ['**रसना** कांचिजिव्हयोः' इति विश्वप्रकाशः.] २. सुखाचें घरच अशा. ३. विश्वाहून इतर. ४. मुनीचें लक्षणः—'दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥' [गीता—अ० २] दुःखामध्यें ज्याचें मन संत्रस्त होत नाहीं, सुखासाठीं जो उचंबळ होत नाहीं, आवड भय क्रोध हीं ज्याचीं निवृत्त झालीं, त्या विवेकी मनुष्याला स्थितप्रज्ञ (मुनि) म्हणतात. [सुबोधचंद्रिका.] ५. आपला सेवक. ६. योगाचें एक अंग. योगाचीं अंगें आठ आहेत. तीं येणेंप्रमाणें:—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधि. ध्यान याचें लक्षण असें आहे:—"ध्यान—सर्व विषय वर्ज्य करून परमात्म्याकडेच एकाग्रतेनें मन लावून चिंतन करणें याला ध्यान म्हणतात. पांतजलयोगसूत्रांत ध्यानाचें लक्षण असें केलें आहे:—'तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्' [पाद ३, सूत्र] याचा अर्थ इतकाच कीं नाभिचक्र, हृदयपुंडरीक, नासिकाग्र इत्यादि स्थलीं चित्तवृत्तीची जी एकाग्रता होते त्या स्थितीला ध्यान असें म्हणायाचें. प्रस्तुत सूत्रांत 'एकतानता' असा जो शब्द आहे, त्याचा अर्थ एकाग्रता आहे. ध्यान हें एकप्रस्तुत विषयाचें महत्वाचें अंग आहे. ध्यानापासून ज्या शक्ति प्राप्त होतात त्यांचें वर्णन गोरक्षनाथाचे ग्रंथांत फार केलें आहे.' [सरलार्थबोधिनी गीता—पृष्ठ ३५७.] ७. साधुसमागम. ८. दिवसरात्र.

तुझी [1]नामनौका भवाब्धींत तारी, तुझें नाम पुण्यध्वजातें उभारी; ।
तुझें नाम रूपाहुनी श्रेष्ठ झालें, म्हणोनीच रामाश्रया चित्त आलें. ॥ १७
[2]राजीवलोचन! विभो! तव नाम गोड, वाचा पवित्र करुनी पुरवीत [3]कोडें, ।
तें नाम नित्य जपतां नलगेचि मोल, तारील [1]नामतरणी भवसिंधु खोल. ॥ १८
नामाचा महिमा तुलाहि नकळे वेदादि [4]मौनावती
तेथें मी नर मूर्ख [5]अल्पमतिचा, [6]ताटस्थ जाली मती ।
तूं बुद्धिप्रद होसि जानकिपते! कांहीं न तेव्हां उणें
वेधीं चित्त, अखंड भक्तवरदा! तूं आपुलीया गुणें. ॥ १९
[7]सकामकर्में फल मात्र देसी, परंतु [8]कैवल्यपदीं न नेसी, ।
[9]निष्काम ते [10]मेळविले स्वतेजीं निष्कामपंथांत मलाहि योजीं. ॥ २०
असत्य माया, तव नाम सत्य; म्हणूनि नामीं जडलों अगत्य, ।
श्रुतिस्मृति श्रेष्ठहि [11]नाम गाती, ध्याईन नामास दिवाहि रातीं. ॥ २१
[12]स्मररिपु तव नामें शांत झाला निवाला,
स्मरण करुनि नामें [13]वाल्मिकि श्रेष्ठ झाला, ।

---

१. नाम हीच नौका. २. राजीव+लोचन=कमल+नयन=हे कमलाक्षा रामा! ३. कौतुक. ४. मुके होतात. मौनावणें हा नामापासून साधलेला धातु होय. ५. अल्प आहे बुद्धि ज्याची असा. ६. कांहींच कळेना म्हणून विस्मयानें निश्चळ. ७. सहेतुककर्माच्या योगानें. ८. परमेश्वरस्वरूपीं मिळणें. ९. कोणताही हेतु न धरितां कर्म करणारे. १०. सायुज्यपदाला पोंचविले, सायुज्यतामुक्ति पावले. ११. नामाचें माहात्म्य आनंदतनयानें असें वर्णिलें आहे:—'नामें समस्त दुरितें हरिती क्षणानें, नामें महाभय हरे बरवेपणानें । नामीं असा अजि असे महिमा स्वभावें, यालागिं नामगुणकीर्तन नित्य गावें ॥ १ ॥ [गणिकोद्धार—काव्यसंग्रहग्रंथमाला—पृ० ५५.] मोरोपंतकृत नाममाहात्म्य, वामनपंडितकृत नामसुधा हीं प्रकरणें इष्ट तर पाहावीं. १२. शिव. रामनामाचा जप करितांच महादेवाच्या शरीराचा विषप्राशनानें झालेला दाह शांत झाला अशी पुराणप्रसिद्ध कथा आहे. १३. **वाल्मीकि**=वाल्मीक=रामायणाचा कर्ता प्रख्यात ब्रह्मर्षि. पूर्वीं प्रचेते म्हणून कोणी दहा बंधु होते त्या सर्वांत हा कनिष्ठ बंधु होय. पुढें हा मरण पावल्यावर एका ब्राह्मणाच्या पोटीं जन्मास आला. त्यास त्याचे आईबापांनीं बाळपणींच तप करण्यासाठीं म्हणून अरण्यांत सोडून दिलें. पण हा दुर्दैवानें कांहीं दिवस तपोनिष्ठाचा स्तेयनिष्ठ झाला. हा जेथें होता तेथें कांहीं भिल्ल आले, त्यांनीं त्याचें दयेनें संरक्षण करून धनुर्विद्या व चौर्यकर्म यांत त्याला पटाईत केलें. नंतर हा आपल्या कुटुंबाच्या उदरभरणार्थ सतत पांथस्थांस लुटूं लागला. नित्याप्रमाणें हा फिरत असतां त्यास कोणीएक महर्षि भेटला. त्यास हा आपल्या नित्याप्रमाणें 'आपल्याजवळ काय आहे तें मला निमुटपणें द्या, नाहीं तर प्राणास मुकाल' असें म्हणूं लागला, तेव्हां त्या मह-

अघटित तव रामा! देखिली नामशक्ती
म्हणउनि मन माझें गुंतलें नामभक्तीं. ॥ २२
कोण्या मिसें ये वदनासि नाम, होईल तो मानव [1]पूर्णकाम, ।
[2]मुमुक्षुला नाम करील मुक्त, श्रुत्यर्थ [3]ईत्यर्थ असाचि युक्त. ॥ २३

---

र्षींस दया येऊन तो म्हणाला, 'अरे, तूं ज्या बायकापोरांसाठीं हीं अघोर पातकें करितोस त्यांना असें विचार कीं, तुम्हीं माझे पापांस विभागी आहां काय?' तेव्हां तो महर्षीचे आज्ञेवरून आपल्या कुटुंबास विचारावयास आला, तेव्हां त्यांनीं असें सांगितलें कीं, 'पापं तवैव तत्सर्वं वयं तु फलभागिन:,' म्हणजे 'पाप तुझें तुला, आम्ही केवळ तुझ्या द्रव्याचे वांटेकरी आहोंत.' याप्रमाणें हें भाषण ऐकून त्यास फार वाईट वाटलें, व पश्चात्ताप होऊन त्याच महर्षींस अनन्यभावानें शरण गेला. तेव्हां त्या महर्षींनें त्यास रम् म्हणजे भक्तांस रमविणारा, आराम देणारा म्हणून ज्यास श्रीराम हें नांव आहे त्या नामाचा जप करण्यास सांगितलें. पण रामनामाचा जप करण्यास त्यास अधिकार नसल्यामुळें 'मरा' असा उलटा जप करण्यास सांगितलें व आपण अंतर्धान पावला. महर्षि जातांच या चोरानें अचल आसन घालून जप करण्याचा असा सपाटा लावला कीं कांहीं वर्षांनीं त्याच्या आंगावर वारुळें (वाल्मीक) वाढलीं. पुढें त्याच महर्षींनें दर्शन देऊन, त्यास वारुळांतून काढिलें. नंतर या चोराची गणना ऋषींत होऊं लागली. ह्याचा आश्रम तमसानदीतीरीं होता व याजपाशीं अध्ययन करणारे अनेक शिष्य होते, त्यांत भारद्वाज हा मुख्य होता. नित्यक्रमाप्रमाणें एक दिवशीं हा नदीतीरीं स्नानास गेला असतां त्यानें क्रौंचपक्ष्याचें एक जोडपें (मिथुन) पाहिलें, त्यांतील नर आपल्या मादीविषयीं कामासक्त झाला असतां व्याधानें त्यास मारिलें. तेणेंकरून मादीस फार दु:ख झालें. हिकडे ऋषीच्या मुखांतून दयेनें व्याप्त झाल्यामुळें साहजिकपणें अनुष्टुभ्वृत्तांत अशी शापोक्ति निघाली:—'मा निषाद प्रतिष्ठां त्वमगम: शाश्वती: समा: । यत्क्रौंचमिथुनादेकमवधी: काममोहितम् ॥.' ही उक्ती त्याचे तोंडांतून निघतांच त्यास फार आश्चर्य वाटलें. इतक्यांत ब्रह्मदेव प्रगट झाले व त्यांनीं त्यास असें सांगितलें कीं, 'तूं ह्याच वृत्तांत स्त्रीविरहपर काव्य कर. या काव्यांत तूं जसें वर्णन करशील तसेंच वृत्त पुढें घडून येईल.' असें बोलून ते अंतर्धान पावले. पुढें वाल्मीकीनें शतकोटी काव्य केलें. सीतेला रामानें टाकल्यावर ती गरोदर असतां याच्या आश्रमीं येऊन राहिली. तिच्या दोघां पुत्रांस (लवकुशांस) जें काव्य पढविलें तें सर्वांच्या पाहण्यांत आहेच. त्याच काव्याला 'रामायण' असें म्हणतात. वाल्मीकीला मागील जन्माचे संबंधानें **प्र**चेता व **प्रा**चेतस अशीं नांवें आहेत. चालू मन्वंतरांत प्रथम काव्यकर्ता हा होता म्हणून, यास **आ**दिकवि व त्याचे आंगावर वाल्मीक (वारुळ) वाढलें म्हणून **वा**ल्मीकि व उरफाटा जप करी म्हणून **उ**फराट्या असें लोकांत म्हणण्याची रूढि आहे. हा उरफाटा जप करीत असे त्यासंबंधानें **आ**नंदतनयानें एके ठिकाणीं म्हटलें आहे, 'कैसेंही कीर्तन करितां । कल्याण बरवें आहे॥ **वा**ल्मिकि उफराट्या नामानें । पावन झाला वक्ता मानें.॥'

१. तृप्तेच्छ. २. मोक्षाची इच्छा धरणाऱ्याला. ३. वेदाचें तात्पर्य.

विद्याकलापाठक पूर्ण झाला, न नाम घेतां न शमेल घाला[1]; ।
सारांश नामाहुनि थोर नाहीं, **रामा**! मला अंतरिंबाह्य पाहीं. ॥ २४
जें दृश्य तेथें परिपूर्ण माया अदृश्य तूं एकचि **राम**राया ! ।
भावें भजे, जो गुरुवाक्य मानी त्या तुष्टसी तारिसि मोक्षदानीं[2]. ॥ २५
त्रैगुण्य[3] माया पसरोनि ठेली तूं सच्चिदानंद तुवांचि केली, ।
इच्छावशें झांकिसि हा पसारा, तेव्हां न माया न दुजें उदारा ! ॥ २६
सर्वेंद्रियाचा मन होय राजा, तें गुंतवीं आपुलिया स्वकाजा; ।
मनेंद्रियातें धरिसील जेव्हां **रामा**! सुखी होइन जाण तेव्हां. ॥ २७
जे पातले शरण गा! तुज **राम**राया! ते ठेविले स्वजन नेउनि पूर्ण ठाया ।
हें ऐकुनी शरण मी तुजला रिघालों तूं ब्रीद रक्षण करीं तव दास झालों. २८
जे शांत दांत[4] करुणाकर[5] नामधारी, जे वंद्य चंदन[6]समान परोपकारी, ।
जे आत्मरूप जग पाहति सौम्यदृष्टी[7], ते धन्यधन्य जगतारक योग्य सृष्टी.॥ २९
जे संग सांडुनि जगीं तुजला पहाती, रूपीं तुझें जग म्हणोनि सुखें रहाती; ।
**रामा**! तुज प्रिय खरे तरि तेचि संत तूंही सदा प्रिय तयां असती **अनंत**!३०
देहीं असोनि नसती, तवरूप झाले स्वानंदचिद्रस[8] पिओनि अखंड धाले[9], ।
जे नित्यमुक्त[10] परिपूर्ण[11] मनीं उदास, त्यांचाचि तूं **र**घुपते! तरि होसि दास. ॥३१
वेदांतवक्ते श्रवणाधिकारी जे सत्यवादी शुभ जे विचारी, ।
भूतांतरीं[12] पाहति एक आत्मा वाणी[13] तयांच्याचि वदे महात्म्या. ॥ ३२
जे सुज्ञ वेत्ते[14], विषयीं विरागी[15] चतुर्थ[16] मुक्तिप्रति जे विभागी ।
त्यांचा सदा संग मला घडावा, त्यांचे पदीं भाव सुखें जडावा. ॥ ३३
अनामिकाचे[17] परिपूर्ण भक्त अविंधसंगें[18] रमती विरक्त ।
ते वंद्य, मी दास असें तयांचा, ते गाइल्या होय पवित्र वांचा[19]. ॥ ३४

---

१. डाव, संकट. २. मोक्ष देण्यानें. ३. सत्व, रज आणि तम हे तीन गुण आहेत. ४. इंद्रियांचें दमन केलें आहे ज्यांनीं असे. ५. करुणा+आकर=दया+खाण=दयाखनि. ६. चंदनाचें परोपकारित्व तुकाराममहाराजादिक अनेक कविजनांनीं सुरस वर्णिलें आहे. ७. समान दृष्टीनें म्हणजे आत्मा व परमात्मा एकच म्हणून हें सर्व जगत्स्वरूप आत्मरूपच आहे अशा दृष्टीनें. ८. 'अहं ब्रह्मास्मि' एतद्रूप स्वानंदाचें जें ज्ञान तोच रस. ९. तृप्त झाले. १०. संसारव्यथेपासून कधींही बांधले न जाणारे. ११. ज्ञानानें पूर्ण. १२. प्राणिमात्रीं. १३. सरस्वती. १४. सर्वज्ञ. १५. विषयाच्या ठिकाणीं विरक्त. १६. कैवल्यमुक्तीस. १७. ज्यास नांव नाही असें परब्रह्म; (पक्षीं) अंत्यजादि यांचे भक्त म्हणजे सर्वत्र ब्रह्मदृष्टि ज्यांची असे. १८. ज्यास विंधन नाहीं असें ब्रह्म; (पक्षीं) यवनादि. वरीलप्रमाणें भावार्थ. १९. वाणी.

**ब्रह्मादिदेव**····इच्छिति साधुसंग, तो सत्समागम मलाहि घडो [1]अभंग ।
**रामा**! तुम्ही करितसां बहु साधुसेवा, ते मी सुखें करुनि गाइन संत; देवा!॥
जे भक्त ते तारिसि **जान**कीपती! अभक्त ते दुःख अनेक पावती, ।
[2]तस्मात् तुझी भक्ति मला दिसे बरी, दे आमुतें भक्ति जगत्प्रभो! **हरी**!॥३६
[3]कोणीं करी श्रवण कीर्तन, एक गाय, कोणीं स्मरे, चरणसेवनिं एक धाय, ।
पूजी, नमी, करिति दास्यचि सख्य कैसें! आत्मा निवेदिति **हरी**! तव भक्त कैसे. ॥

नवविध तव भक्ती त्यांतुनी [4]सार [5]साची
ठसलि बहुत चित्तीं आवडी कीर्तनाची, ।
म्हणुनि विनवितों मी आदरें [6]**रा**वणारी!
सततचि मज देईं कीर्तनप्रेम भारी. ॥ ३८

ज्या [7]कीर्तनें **नारद** धन्य केला, ज्या कीर्तनें **वा**ल्मिकि मुक्ति नेला; ।
ज्या कीर्तनें 'तारिसि' घोष ऐसा त्या कीर्तना सांडिन सांग कैसा? ॥ ३९
सारांश कीर्तन [8]कलींत विशिष्ट केलें, मच्चित्त कीर्तनरसा म्हणुनी भुकेलें; ।
मातें असे भरंवसा **ह**रिकीर्तनाचा ऐसाचि हा [9]संबल निश्चय कीं मनाचा.॥४०
तूं [10]सेव्यं, मी सेवक योग्य नातें, तूं [11]गेयं मी गायक तारिं मातें; ।
तूं [12]जाप्य, मी [13]जापक, पूर्णकामा! [14]सायुज्यदाता तरि तूंचि **रामा**! ॥ ४१
मातापिता बंधु सखाहि पाहीं, **रामा**! तुम्हावांचुनि अन्य नाहीं; ।
त्राता जगीं एकचि तूं दयाळा! [15]त्राहि स्वदासाश्रय तूं कृपाळा! ॥ ४२

**शिवविधिरविदेवीइंद्रचंद्रा**दि सारे
सकलहि जगसृष्टी पाहतां हे पसारे, ।

---

१. निरंतर. २. तस्मात्=यासाठीं. ३. ह्या श्लोकांत नवविधा भक्ति सांगितली आहे. नवविधा भक्ति ह्या:–'श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥.' ४. उत्तम. ५. खरी. ६. हे रावणशत्रो रामा! ७. मोरोपंतानें कीर्तनाचें माहात्म्य असें वर्णिलें आहे:–'कर्षणें जशि कृषीवलभुक्ती, कीर्तनें कुशल साधिति मुक्ती;। त्यागिती न बुध मौक्तिकशुक्ति, हे धरा स्वहृदयीं शुचि उक्ती. ॥ कीर्तनेंचि पुरुषार्थ साधिती, पातकें हरिजनां न बाधती; । या युगीं गुण असे असा, रहा स्वस्थधी; कलि नव्हे असार हा. ॥' [मोरोपंतकृत स्फुटप्रकरणें–भाग १ कृष्णामाहात्म्य–सर्ग १ श्लोक ७-८; काव्यसंग्रहग्रंथमाला–पृष्ठ १०९.] ८. कलियुगांत–कलौ तु हरिकीर्तनम्. ९. दृढ. १०. सेवा करण्यास योग्य. ११. गाण्यास योग्य. १२. जप करण्यास योग्य. १३. जप करणारा. परमेश्वर सेव्य व मनुष्य हा सेवक हें वैष्णवांचें द्वैतमत होय. १४. मोक्ष देणारा. १५. रक्षण कर.

क्षणिक असति जाती शेवटीं हे लयासी
उरसि [1]कुशल **रामा**! ब्रह्म तूं कीं [2]उदासी. ॥ ४३
मुळीं शून्य तेथेंचि तूं **राम** एक, तुझी विस्तरे विश्वमाया अनेक, ।
'**[3]अहंब्रह्म**'तें शब्द हा मूळमाया, तिला देसि इच्छा पुढें **राम**राया! ॥ ४४
तेव्हां तें '**[4]महतत्व**' होय सखया! झाले [5]त्रिधा हे गुण
ते **ब्रह्मा हरि शंभु** कीं विचरती सृष्टयादि कर्में खुण ।
भूतें [6]पंच नभादि सर्व दिसती [7]तत्वें तदा जाहलीं
तें ब्रह्मांडहि पिंड दिव्य रचना हे सृष्टि विस्तारली. ॥ ४५
केलें [8]स्थावरजंगमादि जग हें त्वां आत्मइच्छेस्तव
यामध्यें तरि देह हा बहु बरा केला असे मानव; ।
या देहीं **हरि** अर्जिती तरि तया देशी बरी मुक्तता,
येथें जे चुकले तयांसि पुढती [9]चौऱ्यांशिची योग्यता. ॥ ४६
[10]त्रितापतापें बहु तप्त झालों, दयाघना! त्वच्चरणीं रिघालों, ।

---

१. खुशाल, निर्विकार. २. कर्तव्याकर्तव्यातीत. ३. 'अहंब्रह्म'=मीच ब्रह्म असा अहंकार. ४. पुरुषानें (ईश्वरानें) प्रकृतीच्या ठिकाणीं आपली चैतन्यशक्ति स्थापित केली तेव्हां तिच्यापासून अतितेजस्वी 'महत्तत्त्व' उत्पन्न झालें. [भागवत—स्कं० ३ अ० २६ श्लो० १९.] हें महत्तत्त्व जगताचा प्रथम अंकुर होय. (श्लो० २०.) ५. त्रिधा=तीन प्रकारचे गुण. सत्व, रज आणि तम. ६. आकाश, वायु, अग्नि, पाणी, पृथ्वी हीं पंचभूतें. ७. सांख्यशास्त्रप्रणेता जो सुप्रसिद्ध कपिल महामुनि त्यानें आपल्या मातेला—देवहूतीला—प्रकृतीचे विकार जीं चोवीस तत्त्वें व पुरुष धरून एकंदर पंचवीस तत्त्वें यांचें निरूपण केलें आहे. पुरुष, प्रकृति, महत्, अहंकार, तन्मात्रा, एकादशेंद्रियें व स्थूलभूतें यांचेंही वर्णन केलें आहे. हींच जड सृष्टीच्या उत्पत्तीचीं बीजरूप पंचवीस तत्त्वें होत. पुरुषाचे जीवात्मा आणि परमात्मा असे दोन भेद मानतात. पुरुष व प्रकृति यांच्या संयोगापासून 'महत्तत्त्व' उत्पन्न झालें. या महत्तत्वापासून सात्विक, राजस आणि तामस असा त्रिविध अहंकार उत्पन्न झाला. सात्विक अहंकारापासून मन उत्पन्न झालें, राजस अहंकारापासून दशेंद्रियें उत्पन्न झालीं, व तामस अहंकारापासून सूक्ष्मभूतें व महाभूतें उत्पन्न झालीं. 'सांख्यप्रवचन' नामक ग्रंथांत वर्णन आहे तें असें:— 'सत्वरजस्तमसां साम्यावस्था प्रकृतिः, प्रकृतेर्महान् महतोऽहंकारोऽहंकारात्पंच तन्मात्राणि उभयमिन्द्रियम्, तन्मात्रेभ्यः स्थूलभूतानि, पुरुष इति पंचविंशतिर्गणः'. ८. अचलचल पदार्थादि. ९. चौऱ्यांयशी योनींची. (मागें श्लोक २ टीप पहा.) १०. ताप तीन प्रकारचे आहेत, तेः— आधिदैविक (देवतांच्या क्षोभापासून होणारा—जसा वीज पडणें, भूतबाधा, ग्रहपीडा), आध्यात्मिक (मनाच्या क्षोभापासून अथवा शरीराच्या रोगापासून होणारा—जसा खरूज, ताप, भूक, शोक), आणि आदिभौतिक (पृथ्वी, आप्, तेज, वायु आणि आकाश या पंचमहाभूतांच्या क्षोभानें होणारा—जसा भूकंप, अतिवृष्टि, समुद्रमर्यादोल्लंघन.)

नामामृतप्राशन पूर्ण केलें संतापवारें सहमूळ गेलें. ॥ ४७

जें चालतों तें तुज हो प्रदक्षिणा, जें बोलतों स्तोत्र जगाद्यसाक्षिणा! ।
हस्तें घडे तें तव सर्व पूजन, पावो तुला भक्षिन तेंचि भोजन. ॥ ४८

जे बोलवीसी तितुकाचि बोलतों, तूं वर्तवीसी तितुकाचि वागतों, ।
सत्ता तुझी, जें करिशील तें घडो, परंतु मच्चित्त तुझे पदीं जडो. ॥ ४९

त्वां मत्स्यरूप धरिलें **वि**धि तुष्ट केला, **शं**खासुरा वधुनि मुक्तिस शीघ्र नेला; ।
त्याचें कलेवर[1] तरी करिं वागवीसी, मी काय निंद्य? मज दूर कसा धरिसी?॥५०

पृष्ठावरी[2] धरिसि **मं**दर तूं दयाळा! देवासि होय सुख तैं घडि विश्वपाळा! ।
तारावयासि मज कांहींच कष्ट नाहीं, **सी**तापते! मनिं विलोकुनि हेंचि पाहीं.॥५१

**हि**रण्याक्ष नेतां[3] मही, धांवलासी **र**मावल्लभा! संकटीं पावलासी, ।
तदा सूकरा[4]साम्य झालासि **रा**मा! मला भेटि देतां न कैसा रिकामा?॥५२

पिता कोपे जाची[5] निजसुत[6] करी भक्ति म्हणुनी
करी नाना पीडा **र**घुपति! तुझा दास गणुनी[7], ।
तया **प्र**ल्हादाचें ऋण[8] तुजवरी त्यासि जपसी
मला **सी**तानाथा! विसरुनि कसा दूर लपसी? ॥ ५३

**ब**ळी तो बळी जाणुनी तूं कृपाळा! तयाचे गृहीं होसि कीं द्वारपाळा ।
मला निर्बळातें दुजा कोण तारी? पहा **रा**घवा! कोण दुःखा निवारी? ॥५४

**भृ**गुकुळवर[9] **रा**मा! तूंचि झालासि जेव्हां
थर थर थर राजे कांपले सर्व तेव्हां, ।
जिणुनि[10] सकल राजे भूमि निःक्षत्रि[11] केली
मन्मननृप[12] कां हा नावरे? शक्ति गेली? ॥ ५५

पदरज पडतां स्त्रीरूप पाषाण[13] झाला
तव वधु[14] हरतां तो दुष्ट[15] मुक्तांत आला, ।
वनचरगण सारा भक्त हे स्फीति[16] लोकीं
विसरसि मज **रा**मा! ब्रीद नोहे विलोकीं. ॥ ५६

---

१. प्रेत. २. पाठीवर. ३. पातालांत पृथ्वी नेतां. ४. सूकर=डुकर. ५. त्रास देई. ६. प्रल्हाद. ७. समजून. ८. रिण, कर्ज. ९. भार्गववंशावतंसा रामा! १०. जिंकून. ११. क्षत्रियरहित. १२. मनरूपी राजा. १३. येथें 'अहिल्योद्धार' कथेकडे कवीचा कटाक्ष आहे. १४. 'वधू'शब्द बायको अथवा सून या अर्थाचा वाचक आहे. १५. रावण. १६. कीर्ति.

गोकुळीं बहुत दावुनि लीला द्वारकेसि वससी गुणशीला! ।
पांडवांसि सुखकारक होसी, माझिये समइं कां लपतोसी? ॥ ५७
कली पापरूपी भयें व्यापिलासी म्हणोनी सख्या! बौद्ध बोधावलासी ।
कलीमाजि तारी तुझें दिव्य नाम तथापी मला भेटि दे तूंचि राम! ॥ ५८
देहांत हे म्लेंच्छ सदैव सारे [१]गोइंद्रियांतें छळिती पहा रे! ।
आत्माहि तूं कल्कि असोनि सिद्ध, मारीस ना कां खळ हे प्रसिद्ध? ॥ ५९
'[२]दशावतारीं' तुज नाम झालें '[३]अनाम' हें वाक्य असे बुजालें, ।
तूं नामरूपात्मक होसि आत्मा [४]आश्चर्य हें दाविसि तूं महात्मा. ॥ ६०
नामरूप तुजला न गणावें, राघवा! तुजचि शुद्ध ह्मणावें, ।
कर्म तें करितसें तव माया तूं विलक्षण तिला रघुराया! ॥ ६१
जसें जसें कार्य निघेल कांहीं तसें तसें दाविसि सोंग पाहीं, ।
संपादणीची करुनी [५]समृद्धी सारांश केली निजभक्तिवृद्धी. ॥ ६२
पूर्णाधिकारी बहु पुण्य गाठीं [६]निरंजनीं घालिति तेचि गांठी, ।
अनाधिकारी तरणार्थ कैसे रामा! तुझे हे अवतार ऐसे. ॥ ६३
आणीक चोविसं तुझे अवतार देवा! तेची जगा सतत लाविति पूर्ण सेवा, ।
रामा! अनंत तवरूपहि साधु झाले तारावयासि जग कर्मभुमीस आले. ॥ ६४
पूर्वीं तुझे भक्त सख्या! [९]अनंत, अनेक सध्या वसताति संत, ।

---

१. वाणी आणि अवयव यांतें. २. दहा अवतार आहेत ज्याला तो. ३. नामातीत, नामरहित. ४. आश्चर्यकारक. ५. विपुलता. ६. मायारहित. ७. मुख्य अवतार:—१ मत्स्य, २ कूर्म, ३ वराह, ४ नृसिंह, ५ वामन, ६ परशुराम, ७ राम, ८ कृष्ण, ९ बुद्ध आणि १० कल्की असे दहा आहेत. यांशिवाय आणखी चौदा अवतार भागवतकारांनीं वर्णिले आहेत:—१ सनक, २ यज्ञ, ३ नारद, ४ दत्त, ५ कपिल, ६ नरनारायण, ७ हरि, ८ पृथु, ९ ऋषभदेव, १० हयग्रीव, ११ हंस, १२ धन्वंतरी, १३ मोहिनी आणि १४ व्यास. या सर्व अवतारांचें वर्णन मोरोपंतांनीं 'अवतारमाला'नामक स्वप्रणीत काव्यांत केलें आहे. तसेंच या अवताराचें वर्णन पंतांच्या 'मंत्रभागवतां'तही आहे. [मंत्रभागवत—द्वितीय स्कंध.] ८. या श्लोकाचें वृत्त 'वसंततिलक.' याचें लक्षण:—'अभिज्ञातं तभजजैरंतासक्तगुरुद्वयम् । चतुर्दशाक्षरं वृत्तं वसंततिलकं विदुः ॥ २९ ॥ [सुवृत्ततिलकम्—प्रथमविन्यासः], वसंततिलकस्याग्रे साकारे प्रथमाक्षरे । ओजसे जायते क्रांतिः सविकासविलासिनी ॥ २० ॥ आकारेऽपि कृते पूर्वे बंधेऽल्पपदपेशले । वसंततिलकं धत्ते निर्ग्रंथि रमणीयताम् ॥ २१ ॥ [सुवृत्ततिलकम्—द्वितीयो विन्यासः] वसंततिलकं भाति संकरे वीररौद्रयोः । कुर्यात्सर्गस्य पर्यंते मालिनीं द्रुततालवत् ॥ १९ ॥ [सुवृत्ततिलकम्—तृतीयो विन्यासः]. ९. पुष्कळ; (पक्षीं) हे अनंता!

होती पुढें साधु बहूत रामा! सारांश हा [1]पंथ नसे रिकामा. ॥ ६५
कोणीं जगा दाविति [2]संत सिद्धि, कोणी सदा गुप्त, नसे प्रसिद्धी, ।
कोणी वि[3]रागी विपि[4]नीं रहाती, कोणी प्रपंचीं तुजला पहाती. ॥ ६६
कोणी स्वयें बोधिति शिष्यवर्ग, कोणा रुचेनाहि [5]जैनोपसर्ग, ।
अनंतरंगें रमसी मुरारी! साजे तुझें हें तुज दानवारी! ॥ ६७
[6]कोठें माहिषअंतरांत शिरुनी वेदांतही बोळसी,
स्कंधीं कावड वाहसी, निजमुखें कोणापुढें जेविसी, ।
कोठें कागद तारिसी, दळिसि तूं, कोठें पशू ओढिसी,
कोणाचें ऋण वारिसी, परि मला कां [7]हातचा सोडिसी? ॥ ६८
कोणामुळें होसि सुशील नारी, कोठें पिसी तूं विष रावणारी! ।
कार्यें अनेकें [8]करिसी अनंत माझा न पाहें तरि सत्य अंत. ॥ ६९
मला आपणांतूनि बाहेर केलें, म्हणोनी दिसे द्वैत रामा! उदेलें, ।
मुळीं दृष्टि देतां न तें द्वैत राहे असें ऐक्य मीं तूं तरी केंवि साहे? ॥ ७०
पूज्य पूजक जगांत दिसाया भेद कल्पिसि बळें रघुराया! ।
जीव मी तुजचि ईश्वरनाम [10]बद्ध, [11]मुक्त अवघा प्रभु राम. ॥ ७१
मातें जीव करूनि काय सखया! [12]देहत्रयां गोंविलें?
[13]'देहोऽहं' असि बुद्धि जाड्य करुनी [14]कारालयीं ठेविलें, ।

---

१. भक्तिपंथ. २. जन्ममरणापासून शेवटची मुक्ति ती, तपश्चर्या, ईश्वरभक्ती इत्यादिकांची फलप्राप्ति ती. ३. ज्याला इहलोकाच्या वस्तूंसंबंधीं वासना राहिली नाहीं असा ईशभक्त पुरुष. आपण केलेल्या सत्कृत्यांबद्दल फलाची इच्छा न करितां आपण केलेलीं कृत्यें ईश्वरार्पण करीत सदाचरणानें वागणाऱ्या पुरुषालाही 'विरक्त' असें म्हणतात. सुखदुःख, लाभालाभ, जयापजय, शत्रुमित्र या सर्वांना समान मानणाऱ्या पुरुषालाही 'विरक्त' अशी संज्ञा आहे. ४. वनांत. ५. जन+उपसर्ग=जनाचा उपद्रव. ६. ज्ञानदेवांनीं रेडा बोलविणें, एकनाथाच्या घरीं कावडी आणणें, नामदेवाबरोबर भोजन करणें, तुकारामाच्या वह्या तारणें, जनीसवें दळूं लागणें, चोखामेळ्याबरोबर ढोरें ओढणें, दामाजीपंताचें ऋण फेडणें, अर्जुनासाठीं स्त्रीरूप धरणें, मिराबाईसाठीं विष पिणें, इत्यादि भगवल्लीलांस उद्देशून वरील म्हणणें आहे. ७. या श्लोकांतील वर्णन चित्तवेधक असून 'हातचा' हा फार खुबीदार आहे. ८. अनेक. ९. भेदबुद्धि. १०. बांधलेला, दाबलेला. ११. सुटलेला, सोडलेला. १२. स्थूलदेह, लिंगदेह आणि कारणदेह हे तीन प्रकारचे देह. १३. मी देह आहें. १४. कारागृहांत.

तेणें हा भव गोड गोड दिसतो जाईल शे[१]वटीं लया,
तेव्हां कोण दुजेपणासि मिरवी? मीं तूं नसे, [२]पाल [३]यां. ॥ ७२
अज्ञानयोगें न कळेचि धर्म, पुन्हा पुन्हा जन्म पुन्हाहि कर्म ।
असा प्रवाहीं बुडतों [४]भवाचे, कैं सोहळे दाविसि वैभवाचे? ॥ ७३
वैभवा जग म्हणे धनदारा, तें नसो मम मनांत उदारा! ।
ज्ञान मोक्ष मम वैभव साचें तेंचि दे पुरवि [५]आर्त मनाचे. ॥ ७४
तें ज्ञान [६]हाटीं न मिळे कदापी श्रीमोक्ष तो ग्राम नसे तथापी, ।
[७]गुरूविना ज्ञान कधीं न साधे, ज्ञानाविना मोक्ष कधीं न [८]लाधे. ॥ ७५
जयराम! जगत्पति! चापधरा! नयनांत निरंतर बैस बरा, ।
मन चंचळ जाइल हें जिकडे वस दृष्टिपुढें सखया! तिकडे. ॥ ७६
[९]कमलावर! तूं वससी हृदयीं तरि निर्भय मी तुझिया उदयीं, ।
[१०]करुणालय हें तुज नाम असे मजला तुजवांचुनि कोणि नसे. ॥ ७७
[११]गणिका तुजला हृदयांत धरी, सहजें दिधली [१२]गति दिव्य हरि! ।
[१३]शरणागतशोकविनाशकसा जगतीवरि घोष [१४]अखंड असा. ॥ ७८
धांव रे! रघुपते! [१५]अविलंबें, माधवा! पळ मला न विसंबें, ।
जीव भाव धरुनी तुज बाहें, मूर्ति मी मनिं निरंतर वाहें. ॥ ७९
मच्चित्त जेथें करिल [१६]प्रयाण तेथें बसें घेउनि चापबाण, ।
या युक्तिनें हें [१७]त्वद्रूप होय [१८]भिन्नत्व गारा परि [१९]शेखिं [२०]तोयें. ॥ ८०

१. शेवटीं. २. रक्षण कर. ३. या मला (भक्ताला). ४. संसाराचे. ५. इच्छा. ६. बाजारांत. ७. गुरूचें माहात्म्य असें आहे:—'गुरुविणें न घडे परमा गती गति शुकादि गुरूसचि मागती ॥' 'विदलयति कुबोधं बोधयत्यागमार्थं सुगतिकुगतिमार्गौ पुण्यपापे व्यनक्ति । अवगमयति कृत्याकृत्यभेदं गुरुर्यो भवजलनिधिपोतस्तं विना नास्ति कश्चित् ॥ १४ ॥ पिता माता भ्राता प्रियसहचरी सूनुनिवहः सुहृत्स्वामी माद्याकरिभटरथाश्वः परिकरः । निमज्जन्तं जन्तुं नरककुहरे रक्षितुमलं गुरोर्धर्माधर्मप्रकटनपरात्कोऽपि न परः ॥ १५ ॥ [सोमप्रभाचार्यविरचिता सूक्तिमुक्तावली—गुरुप्रक्रम—काव्यमाला—गुच्छ ७, पृ० ३७.] ८. या शेवटील दोन चरणांत 'सार' नामक अलंकार आहे. ९. लक्ष्मीपते! १०. करुणा+आलय=दया+निवास. ११. गणिका=वेश्या (पिंगळा). पिंगळेला स्वकर्मांचा पश्चात्ताप झाला तेव्हां ती विरक्त झाली. ती परमेश्वर हाच उत्तम परपुरुष असें समजून त्याला शरण गेली, तेव्हां तिला उत्तम गति प्राप्त झाली—अशी कथा आहे. १२. मुक्ति. १३. शरणागत+शोक+विनाशक+सा=शरण आलेल्यांचा शोक नाहींसा करणारा असा. १४. निरंतर. १५. विलंबाशिवाय, लवकर. १६. गमन. १७. तुझें (रामाचें) रूप. १८. गारा आणि पाणी यांत फरक दिसतो पण खरोखर पाहतां गारा हें पाणीच असतें. १९. शेवटीं, अखेरीस. २०. पाणी.

देह नश्वर[1], कदापि न राहे, कायसा भरंवसा तरि आहे? ।
जो असें तवचि साधन साधे, साधनें करुनि ऐक्यहि लाधे. ॥ ८१
प्रारब्धयोग बरवा[2] तव दास झालों, रामा! तुझ्या अनुभवें असुनी निमालों, ।
[3]द्वंद्वासि ठाव न दिसे सहजांत गेलें मी व्यापलों सकळ हें निजदृष्टि ठेलें.॥ ८२
हेम[4]भूषण तसा पटतंतु ऐक्य तेंवि तरि ईश्वर जंतु, ।
हाचि भाव ठसतां भ्रम[5] गेला एक राम परिपूर्ण उदेला. ॥ ८३
सर्वेंद्रियें पावुनियां विरामा, सर्वत्र झाला प्रभु एक रामा! ।
तेथें दुजा काय पदार्थ राहे? दुजें म्हणाया तरि कोण आहे? ॥ ८४
जें जें दिसे तें रघुराजरूप द्वैता[6] नसे ठाव निजस्वरूप, ।
सर्वस्वयें आपण एक झाला द्वंद्वप्रकारार्थ असे बुझाला[7]. ॥ ८५
जगाकार भासे परी राम सारा, तयावांचुनी अन्य कैंचा पसारा? ।
जसे बिंदु सर्वत्र एका जळाचे तसे संघ[8] सारे सख्या राघवाचे. ॥ ८६
देवभक्त दिसती द्वय भाव, मुख्य एक अवघा रघुराव. ।
द्वैतभास परि हा भ्रम सारा, एक राम नटला अवधारा[9]. ॥ ८७
एकापासुनि हें अनेक दिसतें, लाटा समुद्रीं जशा
व्यक्ती भिन्न विचित्र भासति; परि वेदीं श्रुती या तशा; ।
भासे जो गुरुशिष्यभेद परि तो आत्माचि[10] सारा असे
झाली दृष्टि अभेद ऐक्य मग तो द्वैतार्थ कांहीं नसे. ॥ ८८
जों द्वैत तों शबल[11]दृष्टि कधीं न मोडे, शुद्ध प्रबोध घडतां निजऐक्य जोडे; ।
ब्रह्मस्वरूप अवघा प्रभु शुद्ध धाम[12], ही बुद्धि जेथ वसली मग तेथ राम. ॥ ८९
नसोनी असे जो असोनी दिसेना स्वयंबोध होतां दुरी तो असेना, ।
असा ब्रह्मरूपीं चिदानंद राम तयाकारणें शीघ्र केला प्रणाम[13]. ॥ ९०

---

१. नाशवंत. २. चांगला, उत्तम. ३. परस्परधर्मविरुद्धपदार्थयुग्म, (शीत उष्ण). ४. सोनें व सोन्याचे दागिने, वस्त्र व वस्त्राचे तंतू हीं ज्याप्रमाणें एकच होत, त्याप्रमाणें देह व परमेश्वर हींही एकच होत. ५. संशय, संदेह. ६. भेदबुद्धीला. ७. समजला. ८. समुदाय. ९. जाणा, समजा. १०. तुझा आत्मा—जीवात्मा; ईश्वराचा आत्मा—परमात्मा; परमात्मा व जीवात्मा भिन्न नाहींत. विद्येच्या उपाधीनें युक्त जें ब्रह्म तो परमात्मा व अविद्येच्या उपाधीनें युक्त जें ब्रह्म तो जीवात्मा. दोहोंची उपाधि माया. तिच्या स्वरूपांत फरक आहे, परंतु तिचें अधिष्ठान जें ब्रह्म तें एकच आहे. ११. गतानुगतिक, अनुकारी. हें 'दृष्टी'चें विशेषण. शबल=चित्रविचित्र, कसरा, यथाप्रत करणारा. १२. तेज. १३. नमस्कार.

स्तंभावांचुनि[1] हें उभें नभ असे, पृथ्वी जळीं कीं तरे,
देहो हा बहु छिद्रभग्न असतां त्यामाजि वायू ठरे।
ऐसा खेळ अचाट दावुनि पहा तूं भिन्न सर्वांहुनी
तूतें स्वानुभवें विलोकिति जगीं नैराश्यवेत्ते[2] मुनी. ॥ ९१
क्षराक्षराहूनिहि[3] भिन्न होसी तो तूं जग व्यापुनि राहतोसी, ।
काष्टांत[4] अग्नी परि भिन्न जैसा रामा! जगीं नांदसि तूंहि तैसा. ॥ ९२
घटा मठा व्यापुनियां निरोळें[5] राहे स्वयें आपण कीं निराळे, ।
सर्वांतरीं राहुनि तूं तसाची वेदांत बोले असि गोष्ट साची[6]. ॥ ९३
योग्यांचिया हृदयिं नांदसि तूं दयाळा! वेदांत राम म्हणुनी कथि विश्वपाळा! ।
सर्वांतरीं वससि यास्तव वेदवाणी, '**सर्वेश्वरोत्तम**'[7] म्हणे तुज चापपाणी[8]!॥ ९४
ते धन्य जे तुज निरंतर चिंतिताती, ते धन्य जे तव गुणास अखंड गाती, ।
ते धन्य जे सतत बोधनिं पूर्ण झाले, ते धन्य जे तुजचि पावुनियां निवाले. ९५
कालत्रयाबाध्य[9] तव स्वरूप जाणेल तो ज्ञान जया अमूप[10] ।
सर्वाद्य[11] हा तूं श्रुतिभाव सारा त्वद्भिन्न[12] तो सर्व तुझा पसारा. ॥ ९६
जैशा घृताच्या[13] कणिका अनेक ज्ञानें पहातां घृत सत्य एक ।
शाखा[14] अनेका तरु एक जैसा सर्वस्वरूपीं प्रभु! तूंहि तैसा. ॥ ९७
आम्नाय[15] '**तत्त्वमसि**' हें तुज वर्णिताहे '**सच्चित्सुखोत्तम**' असें तुज वेद बाहे; ।
तो तूं निरंतर सखा सकलैक राम आनंदरूप अससी परिपूर्ण राम. ॥ ९८
'सत्य[16] ज्ञान अनंत' हे श्रुति वदे तूं राघवा! चिन्मय[17]
उत्पत्ति स्थिति अंत हा भ्रम खरा सर्वत्र तूं अद्वय[18], ।
आद्यंतीं[19] अवघाचि तूं मग विभो! मी तूंचि जालों पहा
आतां काय वदूं? यदुत्तर[20] दुजें साराचि तूं राम हा. ॥ ९९

---

१. खांबाशिवाय. स्तंभ=Stump. २. निराशा जाणणारे. ३. चलअचलाहून. ४. अरणींत. ५. भिन्न. ६. खरोखर, ठीक. ७. सर्व ईश्वरांमध्यें श्रेष्ठ. ८. हे चाप धारणकर्त्या रामा! ९. भूतकाल, भविष्यकाल आणि वर्तमानकाल या तीन कालांनीं अबाधित. १०. पुष्कळ. ११. सर्वांहून पहिला. १२. तुझ्याहून निराळा. १३. तुपाच्या. १४. फांद्या, खांद्या. १५. वेद. १६. 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' असें श्रुतिवचन आहे. १७. ज्ञानमय. १८. एक. १९. प्रारंभीं आणि शेवटीं. २०. याचें उत्तर.

## उपसंहार.

(श्लोक.)

हा **'रामगौरव'** पहा श्रुतिशास्त्रसार, चित्तीं धरा परम सौख्य घडे अपार, ।
श्रीरामकृष्ण [1]गुरुचा मज पूर्ण संग तो हा प्रसाद वदला कवि **पांडुरंग.** ॥ १००

---

# वि[2]श्वनाथकविकृत

## २. [3]सुदामचरित्र.

(श्लोक.)

[4]मंगलप्रद समस्त [5]मंगला, [6]कीर्तिहार हरिचा धरूं गळां, ।
जो [7]कृपाघन [8]सुदामचातका, वर्षला हरि [9]दरिद्रपातका. ॥ १
[10]वृथा गोष्टि ही बोलतां काय वाचा, [11]पुराणश्रुतीची अभिप्रायघाचा ।
वदा [12]वाङ्मनें कृष्ण सर्वार्थ थारे, तरी [13]भक्तिसंपन्न [14]सर्वार्थता रे! ॥ २
परीस चिंतामणि सिंधु काचा, कोठ्यावधी कोठडिया फुकाच्या ।
हा त्या तरी तो हरिनाम बा! गा, [15]कल्पद्रुमाच्या जरि होय बागा. ॥ ३
अघासिनें वर्जित जो सुदामा, दृष्टी न पाहे परि एक दामा ।
चित्तीं हरीचीं दृढ [16]पादपद्में धरी, बरीं मानुनि [17]सौख्यसद्में. ॥ ४
[18]जाया [19]सुशीला पति मानसाची, पतिव्रता केवळ शुद्ध साची ।

---

१. गुरु=अंधकारनिरोधक. 'शब्दगुस्त्वंधकारश्च रुशब्दस्तु निरोधकः । अंधकारनिरोधत्वाद्गुरुशब्दो निगद्यते ॥' [सौरपुराण—अध्याय ६८ श्लोक १०.] या उत्तरार्धावरून रामकृष्ण नांवाचा कोणी साधु पुरुष पांडुरंगकवीचा गुरु असावा असें दिसतें. २. हा कवि वामनपंडितांचा शिष्य असावा असें वाटतें. या कवीस वामनाची काव्यरचनाशैली बरीच साधली आहे, असें त्याच्या वर्णनपद्धतीवरून दिसून येतें. ३. हें प्रकरण श्रीमद्भागवत—दशमस्कंध—अध्याय ८०-८१ यांत आहे. [मोरोपंतकृत कृष्णविजय—उत्तरार्ध पृष्ठें २१६-२४३ पहा.] सुदामचरित हा प्राकृत कविजनांचा आवडता विषय दिसतो. या विषयांवर अनेकांचीं अनेक महाराष्ट्र लहानमोठीं काव्यें आहेत. ४. मंगलकारक. ५. सकल मंगल असा. ६. यशोहार. ७. कृपेचा मेघ. ८. सुदामारूपी चातकाला. ९. दरिद्ररूपी पातकाला. १०. व्यर्थ. ११. पुराणें आणि वेद यांची. १२. वाणी आणि मन यांनीं. १३. भक्तीनें युक्त (तो). १४. कृतकृत्यता (त्याला). १५. कल्पवृक्षाच्या. १६. पदकमळें. १७. सुखाचीं गृहें. १८. बायको. १९. उत्तम स्वभावाची.

उपाय नाहीं जरि [1]जीवनासी, तरी न [2]वंची [3]पतिसेवनासी. ॥ ५
म्हणे, 'जा, या' [4]जाया, 'उशिर झणि [5]जायास न करा,
झणी लाजा लाजा तुज न हरिला गातचि भजा. ।
म्हणा, '[6]दाता [7]त्राता तुजविण [8]अनाथास न [9]दुजा
चला मागा भागा मगहि हरिला जाउनि भजा.' ॥ ६
[10]हरिजना [11]उदरार्थिक [12]कामना, परि न वाटतसे बरवी मना, ।
गृहिणि आग्रह फार करीतसे, द्विज म्हणोनि [13]हरिप्रति जातसे. ॥ ७
स्वभार्येपुढें विप्र बोले सुवाणी, म्हणे, 'त्यास भेटूं कसा [14]रिक्तपाणी?' ।
फिरे चारपांचा गृहीं होय कष्टी, मिळाले प्रयत्नें [15]फवे चार मुष्टी. ॥ ८
वांधावया [16]स्वपदरीं जंव विप्र पाहे, तों ठाव देखत [17]स्ववास [18]सच्छिद्र पां हें ।
तों चौघडी करुनि बांधियले स्त्रियेनें, जातो हरीजवळि पाहिन तो दयेनें. ॥ ९
धन्य आजि [19]हरिदर्शनजोडी, रुक्मिणीसहित पाहिन [20]जोडी ।
पारणें मम घडे नयनांचें, याचि [21]चिंतनिं [22]निरामय नाचे. ॥ १०
तो [23]मोक्षदायक [24]पुरीं [25]द्विजवर्य पाहे, शोभे [26]सुरेंद्रनगरी [27]प्रतिइंद्र पाहे ।
[28]वैकुंठनाथ हरि आपण नांदताहे, ध्यानीं द्विजेंद्र सुख मानुनि नांदताहे. ॥ ११
देखिलें हरिचिया [29]सदनासीं, पाहतां [30]परम सौख्य मनासीं ।
स्वस्थ चालत [31]निवारण नाहीं, भाग्य हें न करवे [32]गणना ही. ॥ १२
दूरूनि देखत असे हरि तो सुदामा, आत्मा च कीं म्हणतसे 'प्रिय हाचि आम्हां.' ।
धांवोनियां झडकरी हृदयीं धरूनी, [33]प्रेमाश्रुबिंदु गळती उभयांवरूनी. ॥ १३

---

१. उपजीविकेला. २. अंतर करीत नसे. ३. पतीच्या सेवेला. ४. पत्नी, भार्या. ५. कृ-
ष्णाकडे जाण्याला. ६. देणारा. ७. रक्षण करणारा. ८. गरीबाला. ९. दुसरा. १०. हरि-
भक्ताला. ११. पोटाला मिळवण्याची. १२. इच्छा. १३. कृष्णाकडे. १४. रिकाम्या हातीं.
गुरु, राजा, आणि देव यांच्या दर्शनास रिकाम्या हातानें जाऊं नये, कांहीं तरी त्यांस दे-
ण्यासाठीं हातांत घेऊन जावें–असें स्मृतिवचन आहे. 'रिक्तपाणिर्न पश्येत राजानं देवतां
गुरुम्' असें एक वचन सुप्रसिद्ध आहे. हाच अर्थ पंतांनीं 'पृथुकोपाख्याना'त दर्शविला
आहे:–'रिक्तपाणिनें न विलोकावा गुरु ऐशी स्मृतिवाणी' [पृथुकोपाख्यान–साकी ११].
१५. पोहे. १६. आपल्या पदरांत. १७. आपलें वस्त्र. १८. फाटकें, भोंकांनीं युक्त.
१९. जोडी=प्राप्ती. २०. दोघेंजणें. २१. चिंतनामध्यें. २२. निर्+आमय=निर्गत+रोग=
चिंतारहित. २३. मुक्ति देणारा. २४. द्वारकेंत. २५. ब्राह्मणश्रेष्ठ–सुदामा. २६. त्याची नगरी
अमरावतीसारखी. २७. (तो) प्रतिइंद्र–दुसरा इंद्र. २८. वैकुंठाचा स्वामी. २९. घराला.
३०. फार. ३१. दूर करणें, नको म्हणणें, मज्जाव. ३२. गणती. ३३. प्रेमाश्रूचे बिंदु.

[१]वंद्य जो [२]सनकादिकनंदना, [३]तो निघे [४]द्विजपदाब्जवंदना, ।
हस्तकें धरुनि आदरें वरी, बैसवी द्विज [५]निजासनावरी. ॥ १४
[६]दिव्य [७]हंसतुलिका [८]मृदु भारी, बैसवूनि निजभक्त उभारी ।
आणवूनि बहु [९]शीतल [१०]वारी, [११]क्षाळुनी [१२]पदें [१३]पथाश्रम [१४]वारी. ॥ १५
दिव्य चंदन [१५]तनूसि चर्चिलें, आदरें द्विजवरासि [१६]अर्चिलें. ।
हार [१७]कल्पतरुच्या सुमनांचे, अर्पि जेंवि निज सौख्य मनाचें. ॥ १६
अन्न [१८]षड्रस [१९]सुधेहुनि गोडी, ब्राह्मणा प्रथम हे बहु गोडी ।
रुक्मिणी परम सावध वाढी, दाखवी पतिस [२०]आदरवाढी. ॥ १७
[२१]बैसका द्विजवरासि पलंगीं, [२२]वीटिकासहित कातलवंगी ।
श्रीहरि परम सादर देतो, सज्जनासी पदवी निज दे तो. ॥ १८
'भेटि हे परम दुर्लभ तूझी, सांग कीं कुशल होइ न माझी ।
अंतरींच नमिलें मज जीणें, भेटि काय दिधलें मज तीणें? ॥ १९
[२३]लज्जाडोहीं विप्र चित्तांत [२४]पोहे, कैसे देऊं? भाग्यवंतास पोहे ।
तों देखिलें ग्रंथिसी कृष्णनाथें, भावार्थें घे दीधलें जें [२५]अनाथें. ॥ २०
धाडिलें म्हणुनि वाट पाहतों, अर्पिशी म्हणउनी च राहतों ।
विप्र तो निज [२६]कुचेल ओढतो, श्रीपती त्वरित गांठ सोडतो. ॥ २१
[२७]पत्र पुष्प फल तोय भक्तिनें, अर्पितां परम तृप्ति भक्ति ने ।
ते फवे त्रिभुवनेश्वरें मुखीं, घालितां; निज कुचेल तो सुखी. ॥ २२

---

१. वंदन करण्याला योग्य. २. सनक सनंदन आदिकरून (ब्रह्मदेवाच्या) नंदना (मानस पुत्रास). ३. येथें वर्णन पर्यायानें केलें आहे म्हणून हें 'पर्यायोक्त' नामक अलंकाराचें उदाहरण आहे. ४. ब्राह्मणाच्या (सुदाम्याच्या) पदकमलाला वंदन करण्याला. ५. आपल्या आसनावर. ६. उत्तम. ७. हंसाचे परांची गादी. ८. मऊ. ९. गार. १०. उदक. ११. धुऊन. १२. पाय. १३. रस्त्यांतील श्रम, चालण्याचे श्रम. १४ नाहींसे करी. १५. शरीराला. १६. पूजा केली. १७. इच्छिलें फळ देणारा वृक्ष त्याच्या फुलांचे. १८. गोड, खारट, कडु, तुरट, आंबट आणि तिखट असे सहा रस आहेत. 'रसो बहुविधः प्रोक्त ऋषिभिः प्रथितात्मभिः। मधुरो लवणस्तिक्तः कषायोऽम्लः कटुस्तथा ॥.'] १९. अमृताहून. २०. आदराची वृद्धि, आदरबाहुल्य. २१. बैठका. २२. विड्याचे पानाची विडी (पट्टी). २३. लज्जारूप डोहांत. २४. तरंगे. २५. गरीबानें. २६. फाटकें (वाईट) वस्त्र. २७. पान, फूल, पाणी. द्रौपदीनें भाजीचें पान दिलें होतें. गजेंद्रानें फूल (कमळाचें) दिलें होतें. बळीनें दान देतांना पाणी हातावर सोडलें होतें. 'पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति' या गीतेंतील श्लोकावर कवीचें लक्ष आहे.

एकदां स्वमुखिं मुष्टिहि ओतिली, [1]मागुती मुष्टिहि भरोनि घेतली ।
[2]रुक्मिणीन मग हातहि घातला, आपुला मग विभागहि घेतला. ॥ २३
कृष्णाची [3]वनिता पयोनिधि[4]सुता सादृश्य [5]सालंकृता
[6]विद्युत्सन्निभ [7]अंबरीं [8]परिवृता [9]चंद्रानना [10]संस्मिता ।
[11]आश्चर्यांबुनिधींत पोहति मुनी कीं पाहती ब्राह्मण
यांचें भाग्य [12]अगम्य ज्यास भजतो सर्वेश नारायण. ॥ २४
सत्य [13]हंसतुलिका सुकुमारा, ठाव तेथ न दिसे सकुमारा ।
ब्राह्मणा निज[14]सुखासन देतो, [15]बाळमित्र कथनें हि वदे तो. ॥ २५
म्हणे, 'आम्ही तुम्ही गुरुसदनिं अभ्यास करितां
कथा झाली कैशी वनिं उपवनामाजि फिरतां ।
तुम्हां आम्हां धाडी [16]गुरुगृहिणि [17]काष्ठांस्तव वनीं
निशा झाली तेथें [18]तम [19]निबिड अदृश्य [20]अवनी. ॥ २६
पर्जन्यवृष्टि अतिघोर तयाच काळीं, [21]दिङ्मोह [22]नेत्रयुगलीं अतिरात्रिकाळीं ।
[23]शीतें प्रकंप सुटला [24]परिहार नाहीं, [25]कें [26]निस्तरेल भय वाटतसे मनाही. ॥ २७
उभयवर्गमनीं गुरुही मनीं, परम संकट पावतसे तिन्ही ।
करिल संकट मित्र[27] निवारण, म्हणुनि पाहतसों [28]तम दारुण. ॥ २८
'झाला' म्हणे, गुरु, अकल्पित घात मोठा, झाल्या [29]जडा अपयशें अपकीर्ति[30]मोटां ।
प्राणाहुनी [31]मदिय आवडता मनासी, कां धाडिलें [32]तयास मूर्खपणें वनासी? २९

---

१. छंदोभंग. 'मागुती भरुनि मुष्टिहि घेतली' असें केल्यास छंदोभंगदोष नाहींसा होतो. हें 'यूथिका'वृत्त आहे. परंतु याच्या चारी चरणांत 'हि' हें पादपूरणार्थक अव्यय आलें आहे. तें काढल्यानें द्विरुक्ति नाहींशी होऊन अर्थांत बदल होत नाहीं. वृत्त मात्र बदलून 'रथोद्धता' होतें. २. हा दोषच. रुक्मिणीनें. ३. बायको. समुद्राची मुलगी—लक्ष्मी—तीच रुक्मिणी झाली होती. ४. सुता=मुलगी. ५. अलंकारांनीं युक्त. ६. वीजेप्रमाणें. ७. वस्त्रीं. ८. वेष्टिलेली. ९. चंद्रासारखें जिचें तोंड आहे अशी. १०. हास्यवदन. ११. आश्चर्यसमुद्रांत. १२. जाणण्याला कठिण. १३. हंसांच्या परांची गादी. १४. आपल्या मऊ गादीवर बसवितो. १५. लहानपणचा सोबती. १६. गुरुपत्नी. १७. लांकडें—सर्पण जमवून आणण्यासाठीं. १८. काळोख. १९. अत्यंत. येथें वृत्तभंग झाला आहे. 'अदृश्य' यांत ऋ हा स्वर आहे त्यामुळें मागल्या अक्षरास दीर्घत्व येत नाहीं. २०. भूमि. २१. दिशांचा मोह. २२. डोळ्यांत. २३. थंडीनें. २४. उपाय. २५. केव्हां. २६. नाहींसें होईल. २७. सूर्य. २८. काळोख. २९. जड. ३०. हा समास चिंतनीय आहे. ३१. माझा. ३२. येथें छंदोभंग झाला आहे.

सां[1]दीपनी गुरु विचारुनियां मनासी, घेओनि शिष्यसमुदाय निघे वनासी ।
तों भेटलों उभयअंतरिं हर्ष मोठा, झाला; हळू उतरल्या अपकीर्तिमोटा ॥ ३०
जाओनि ध[2]र्मसदनीं गुरु पुत्र मागे, होता बुडोनि मृत जो बहु काळ मागें ।
आणूनि देउनि मनोरथ पूर्ण केला, जो मानसीं बहुत काळ असे भुकेला. ३१
हे च म्यां उचित काळ दक्षिणा, कल्पुनी मग करूनि प्रदक्षिणा ।
वंदुनी मग गृहासि पातलों, त्यावरी स्वसदनीं च राहिलों. ॥ ३२
रं[3]तलों पर बहू दिवसांचा, होतसे स्वमनिं आठव साचा ।
हें अपूर्व न गमे मुनिवर्या! कृ[4]ष्णपादरजतत्पर आर्या! ॥ ३३
कर्में अ[5]नंत दृढ ब[6]द्ध अनंत जाती, क[7]र्मानुरूप नियमी जन सर्व जाती.' ।
'ते का[8]ळिंच्या हरि! वदें न अपूर्व गोष्टी, होत्या मुखीं प्रकट त्या सहजेंचि ओष्टीं.'
म्हणे, हरी, 'जें कथिलें तुला म्यां, ठाऊक आहे तुजला सुदाम्या! ।
कुटुंब माझें तुजलागिं ठावें, यांतून कैसें मन हें उठावें? ॥ ३५
यांच्या पोषणतोषणाविण दुजा धंदा नसे बा! मला,
जें उत्पन्न सवें च तें न असतें हें ही कळावें तुला ।
जें जें कृत्य तयासि आपणविणें नाहीं दुजा सोयरा,
मी जाणें दुसराहि जो अनु[9]भवी तो शब्द मानी खरा. ॥ ३६
मागेल तेंहि कळलें धनधान्य कांहीं, देईन दुर्लभ सुरेंद्र[10] अंजादिकांही ।
याकारणें द्विजवरा[11] पुसिलेंच नाहीं, देणार वैभव अगोचर[12] जें मना ही.' ॥ ३७
सुदामयाच्या हरि आ[13]शयाला, जाणोनि कांहीं न वदे तयाला ।
हरीच या तों व[14]चनामृतानें, झाला असा स्त[15]न्य पिऊन तान्हें. ॥ ३८
गोमतीस करि म[16]ज्जन संध्या, आपुल्याचि मग घेउनि चिंध्या ।
श्रीपतीप्रती निरोपचि घेतो, श्रीपती मग निरोपहि दे तो. ॥ ३९
सुदामा स्वचित्तीं विचारूनि पाहे, म्हणे, 'रिक्त हस्तेंचि[17] जातों त्र[18]पा हे ।
परी श्रीहरीची दया पूर्ण मातें, न शीवों दिलें द्र[19]व्यलोभा त[20]मातें.' ॥ ४०

---

१. कृष्णाच्या गुरूचें नांव. २. यमधर्माच्या गृहीं. ३. रममाण झालों. ४. कृष्णपादरजीं लुब्ध. ५. पुष्कळ. ६. बळकट बांधलेले. ७. कर्माप्रमाणें. ८. हें सुदाम्याचें भाषण आहे. ९. अनुभव घेतलेला. १०. देवेंद्र व ब्रह्मदेव व शूकरादिक. ११. ब्राह्मणश्रेष्ठाला. १२. अतर्क्य. १३. हेतूला. १४. वचनरूप अमृतानें. १५. दूध. १६. स्नान. १७. रिकाम्या हातांनीं. १८. लज्जा. १९. द्रव्यलोभाला. २०. अज्ञानाला.

बोलाविला जवळि तो मग विश्वकर्मा[1], आज्ञा करी, हरि म्हणे, 'निज शिल्पकर्मा[2] ।
वेगीं उभारुनि बरी नगरी करावी, संपत्तिनें परम दुर्लभ ती भरावी.' ॥ ४१

होतां आज्ञा हरीची [3]अभिनव नगरी निर्मिली [4]भासमान
नाहीं जोडी त्रिलोकीं अणुभरि न पवे [5]स्वर्गशोभा [6]समान ।
ऐशीं चित्रें विचित्रें [7]मणिमय विविधें [8]हाट [9]भांडार नाना
लोकां आनंद मोठा हरिगुण नटती गायकांच्या तनाना. ॥ ४२

त्यामाजि एक गृह थोर सुदामयाचें, जें राजमंदिर[10]निरूपम भाग्य याचें ।
रत्नें [11]अमूल्य बहु [12]हाटकसंडि तेजें, दूरूनि त्या [13]लकलकी रवि[14]रश्मितेजें. ॥ ४३

अनंत देणें [15]कमलापतीचें, तेथें किती वर्णन संपदेचें? ।
सुदामया जात असे [16]अगारा, झाला पुढें [17]एकसरें नगारा. ॥ ४४
तों देखिली [17]एकसरें पुरी ते, आश्चर्य वाटे मन जें करीतें ।
तों देखिले लोकहि [18]पूरवासी, आले पुढें ते [19]नृपआर्जवासी. ॥ ४५

जी ही कोण पुरी [20]सुदामनगरी राजा सुदामा भला,
होता भिक्षुक हें खरें, [21]परि तया श्रीकृष्णजी तुष्टला ।
त्याला काय दिलें मुठी न [22]पृथुका ब्रह्मण्यभावें तया,
अर्पा अल्पहि आदरें तरि करी संपूर्ण भावें दया. ॥ ४६

[23]अमात्य [24]मंगलतुरेसह सर्व येती, राजा [25]अलंकृत [26]सुखासनिं बैसवीती ।
आरूढतां नृपति आसनिं त्या करीती, केलें तसें च [27]अभिवंदन राजनीती.॥४७
[28]कोशादि [29]वासहयवारणरत्नशाला, [30]पाकालयादि विविधा अठरा [31]विशाला ।
[32]सौभाग्यपूर्ण [33]परिचारक दास दासी. [34]न्यूनत्व एकचि [35]उणें [36]अमितप्रदासी.॥४८
येऊनि त्या [37]स्वभवनीं द्विजराज पाहे, आश्चर्य मानुनि म्हणे, 'हरिची कृपा हे ।

---

१. देवांचा कारागीर. २. कौशल्याला. ३. नवी—सुंदर. ४. शोभायमान. ५. स्वर्गींची शोभा. ६. साम्यता. ७. अनेक. ८. बाजार. ९. द्रव्यकोश, खजिना. १०. उपमारहित. ११. ज्यांची किंमत नाहीं अशीं. १२. सोनें. १३. चकाकी, तेजी. १४. रश्मि=किरण. १५. कृष्णाचें. १६. घरीं. १७. एकदम. १८. शहरांत रहाणारे. १९. राजाचें आर्जव करण्याकरितां. २०. सुदाम्याची नगरी. २१. परंतु. २२. पोहे. २३. प्रधान. २४. शुभ वाजंत्र्यांसह. २५. अलंकार घातलेला. २६. गादीवर. २७. नमन. २८. कोश—खजीना—आदिकरून. २९. वस्त्रशाला, अश्वशाला, गजशाला व रत्नशाला. ३०. स्वयंपाकघर. ३१. मोठ्या. ३२. वैभवानें पूर्ण. ३३. सेवक. जो सेवा करितो तो सेवक. ३४. कमीपणा. ३५. कमी. ३६. पुष्कळ देणाराला. ३७. आपल्या वाड्यांत.

नीराजना[१] करि मुखें स्मितयुक्त[२] राणी, स्वामीस वंदुन म्हणे मधुरस्ववाणी[३]. ॥४९
'हा कृपाघन[४] हरी अवधारा[५], वर्षला[६] निज कृपारसधारा[७]'. ।
तो म्हणे द्विज, 'खरें च बरा हा, भाव तच्चरणिं ठेवुनि राहा. ॥ ९०

**उपसंहार.**

(श्लोक.)

भक्ती न मुक्ति अशि भक्ति सुदामयाची, पाहा विचित्र करणी करुणालयाची[८]।
वर्णून आदर बरा बरवा मनाचा, हा विश्वनाथ निज किंकर[९] वामनाचा. ॥ १

---

# अनामकविकृत

## ३. शुक[१०]रंभासंवाद.

(श्लोक.)

आतां सावध स्वस्थ चित्त करुनी श्रोतेजनीं सादरें
रंभाशूकविवाद पूर्ण रचना ऐका महाआदरें. ।
ऐसी पुण्यकथा सदैव वदतां पापें लया[११] पावती[१२],
नाना दुष्कृत[१३] दूरि होय सहजें, कर्मे[१४] लया पावती. ॥ १
सुरेश्वरें असें विचारिलें तपक्षया
स्वनायिकेसिं धाडिजे तपोधना उठावया ।
असा विचार नारदाप्रती वदे शतक्रतू
'तथास्तु' तो म्हणे, 'त्वरा करूनि धाडिं शीघ्र तूं.' ॥ २
पाचारिली त्रिजगमोहिनीरूप रंभा, सौंदर्य पूर्ण विलसे[१५]; रति धिक्[१६] शोभा ।
तीतें म्हणे[१७], 'परिसिजे, धरुनी शुकासी, तूं जाउनी करिं तपक्षय आक्षपेसी.॥३

---

१. आरती. २. हास्यभरित. ३. आपल्या मधुरवाणीनें. ४. कृपेचा मेघ. ५. पहा, ऐका. ६. पडला—कोसळला. ७. कृपारसाच्या धारा. ८. करुणागृहाची. (कृष्णाची.) ९. सेवक. ११. हें प्रकरण शांतिपर्वांतर्गत 'मोक्षधर्म' नामक पोटपर्वांत आहे. यांत शुकाचार्य व इंद्रानें पाठविलेली रंभा यांचा संवाद आहे. याच कथानकावर वामनपंडित, विठ्ठल व कविकिंकर यांनीं कविता रचली आहे. ११. या शेवटील दोन चरणांत फलश्रुति सांगितली आहे. १२. नाश पावती. १३. पापें. १४. बरीं वाईट कृत्यें. १५. शोभे. १६. रतीचें सुद्धां सौंदर्य तिच्यापुढें तुच्छ होय—असा भावार्थ. १७. इंद्र म्हणे.

[1]ते बोलिली [2]शतदशानयनासि [3]वक्त्रें, मी तापसी क्षय करीन पळार्धमात्रें ।
साधू विरक्त असती [4]पवनाशनी जे, तेही कटाक्षें[5]...... हरिले यती जे ॥ ४
तुम्ही स्वस्थ चित्तें असावें नृपाळा! क्षणार्धें शुका आणितें मी कृपाळा! ।
आम्हां भूलले संतसाधूविवेकी, तुम्ही सर्वदा चित्तिं चिंता त्यजा कीं. ॥ ५
आतां असो सकळ हें परिसें दयाब्धी! आज्ञा किजे मधुकराप्रति, जाय आधीं।
पुष्पें फळीं लसलसीत विराज येथें तैसा सुरेंद्र वदला मग माधवातें. ॥ ६
रंभा निघे झडकरी [6]गमनस्थलासी, सौंदर्य पूर्ण विलसे जशि तेजराशी ।
वक्त्रीं [7]मृगांक न [8]तुळे, लघु अर्कबिंबी, नेत्रांसि [9]मीन न [8]पवे, [10]हरिही [11]नितंबीं. ॥ ७
गंडस्थळीं करिकपोल कधीं न साजे, [12]नासाग्र देखुनि मनीं [13]शुक फार लाजे ।
[14]जंघा सुवर्ण कदलींहुनि वोप[15] देती, तेजें समान न दिसे [16]वनिता दिगंतीं. ॥८

करीं जडीत कंकणें, पदीं अनेक भूषणें
सतेज किंकिणीस अमोल्य कंकरीचिं सूमनें (?) ।
करांगुलींस मूदिका, स्वचित्त रत्न शोभती
मयूरयुक्त [17]नासिकामणी, पाचही विराजती. ॥ ९
माथां चंद्रचुडा, ....मनगटीं, भांगीं टिळा शोभला
बाळ्या, काप विराजती, बिजवरा तो मस्तकीं बिंबला, ।
वेणीला मुदभोवरीजडित ते गोंडे अती शोभती
चरणीं घुंगुर सांखळ्या पइंजणें [18]सप्तस्वरें वाजती. ॥ १०

---

१. रंभा. २. दश शतें (हजार) नयन (नेत्र) आहेत ज्याला त्यास=सहस्रनयनास (इंद्रास). ३. तोंडानें. ४. फक्त वायू भक्षण करून राहणारे. ५. टाका. ६. जाण्याच्या ठिकाणीं. ७. चंद्र. ८. बरोबरी करूं शकत नाहीं. ९. मत्स्य, मासा. १०. सिंहसुद्धां. ११. नितंब=कंबर, कटि. १२. नाकाची बोंडी. १३. पोपट. १४. मांड्या. १५. शोभा. १६. स्त्रिया. १७. नथ. १८. स्वर सात आहेत:—‘निषादर्षभगांधारषड्जमध्यमधैवताः । पंचमश्चेत्यमी सप्त तंत्रीकंठोत्थिताः स्वराः ॥’ (अमरकोश.) ‘षड्जं रौति मयूरस्तु गावो नर्दंति चर्षभम् । अजाविमे च गांधारं क्रौंचो नदति मध्यमम् । पुष्पसाधारणे काले कोकिलो रौति पंचमम् । अश्वस्तु धैवतं रौति निषादं रौति कुंजरः ॥’ १ नि—निषाद—हा शब्द हत्तीचा, याचें नाभिस्थान; २ रि—ऋषभ—हा शब्द गाईचा, याचें नासिकास्थान; ३ ग—गांधार—हा शब्द शेळीचा, याचें स्थान गाल; ४ सा—षड्ज—हा शब्द मोराचा, याचें नाभिस्थान. [‘नासां कंठमुरस्तालु जिव्हां दंतांश्च संस्पृशन् । षड्भ्यः संजायते यस्मात्तस्मात्षड्ज इति स्मृतः ॥’ नाक, कंठ, ऊर, तालु, जिव्हा आणि दांत या सहा स्थानांपासून होणारा तो षड्ज.] ५ म—मध्यम—हा शब्द क्रौंचपक्ष्याचा, याचें हृदयस्थान; ६ ध—धैवत—हा अश्वाचा, याचें ललाटस्थान; ७ प—पंचम—हा

शोभती कुच[1] कसे पदकानें, शीशफूल रवितेजसमानें ।
कुंकुमातळवटीं मृगनाभी[2], दर्पणीं[3] मुख विलोकित ऊभी. ॥ ११
नेत्रीं कज्जल[4] रेखिलें **स्मर** जसें भ्रूचाप सज्जी दृशा
चाले हंसगती[5] कुरंगनयना[6] वा मालत्यंगी[7] कृषा[8] ।
सौंदर्यें **गिरिकन्यका**[9] महिसुतादि[10] .... दिव्यांगना
**सावित्री, शचि** लज्जिता सकळही जाल्याति चंद्रानना. ॥ १२
'आतां करा गे! बहु वेग भारी, केले अलंकार बरे शरीरीं ।
आणीक जे भोग असेति कांहीं, तेही करा गे! न विलंब[11] कांहीं.' ॥ १३
विरूद्या बऱ्या जोडवीं घालितातीं, तसें आंगतोलें बळें बैसवीती ।
अहो पोकळे आंत घालूनि गुंडे, झणत्कारणें हो! करीती वितंडे. ॥ १४
पाई पैंजण घाघुऱ्या, अतिशया ज्या वाजती गंभिरा
वांकी तोडर घालिती, रुणझुणा शब्दार्थ[12] होतो बरा ।
मांजीं[13] त्या लघु किंकिणी अतिशयें मंजूळ ज्यांचा ध्वनी
घाली कंठिंहि सूत्रजीं[14] हिरकणी नाना मणी जोडुनी. ॥ १५
कंठीं हार हमेल हे कलवरे (?) एकावळी घातली
रत्नें जे जडलीं अशींच पदकें सर्वांउरीं[15] शोभलीं ।
मोत्यांचे सर दूलटे उपरि त्या खाब्या गळ्या बांधल्या
चित्तांकावर शोभली गळसरी, दूजा सऱ्या घातल्या. ॥ १६
कानीं तानवडीं विचित्र जडलीं, नेणो कळाकूसरी[16]
बाळ्या आणिक बूगड्या मग तसी घाली बरी भोंवरी ।
बाजूबंदही घातले सुललिता[17] गोंडे तया लाविले
शेंबी आणिक आंवळे तंव बरे त्या आंगिं हो! ओंविले. ॥ १७

---

शब्द वसंतकाळांत कोकिलाचा, याचें कंठस्थान; [नाभीपासून उत्पन्न झालेला जो वायु, ऊर, हृदय, कंठ आणि मूर्धा यांमधून जातो तो पंचम.] हे सात स्वर तंत्रीपासून आणि कंठांतून उत्पन्न होतात.

१. **स्तन**. २. कस्तूरी. ३. आरशांत. ४. काजळ. ५. हंसाच्या गतीनें, हंसाप्रमाणें. ६. हरिणाक्षी. ७. मालती+अंगी=मालतीच्या फुलाचा जिच्या अंगास वास येत आहे अशी. ८. बारीक, सडपातळ. ९. पार्वती. १०. सीता वगैरे. ११. उशीर. १२. ध्वनि. १३. कमरेंत. १४. मंगळसूत्रांत. १५. सर्वांच्या उरांवर. १६. कौशल्य. १७. सुंदर.

करीं कंकणें सुंदरें घालितातीं, तशा [1]मुद्रिका अंगुळ्या शोभवीती ।
अनेका परींचीं [2]चिरें नेसताती, बहू लांब [3]सोगे बरे सोडिताती. ॥ १८
अहो! त्या स्तनीं काय अन्याय केले? म्हणोनी बळें कंचुकीबद्ध झाले? ।
बहू योगियांचे गळा फांस हेही समस्तांसि हें ठाउकें काय नाहीं? ॥ १९
स्वयें थोर हे मैंदे आलेति कैसे? कितींकां गळां बांधले काम फांसे ।
अकस्मात हे प्राप्त झाले तयासी म्हणोनी बळें कंचुकी बांधि त्यांसी. ॥२०

भाळीं कस्तुरि रेखते स्तनतटीं लावोनियां चंदनें
नेत्रीं घालित अंजनें म्हणति हो! ऐसें जगा मोहणें, ।
माथां वीचरती सुगंध बरवीं तेलें बरीं घालिती
बांधोनी सकळीं गुडेवरि कसा त्या केतकी खोंविती. ॥ २१
नाकीं बेसर घातलें अधर जे तांबूल त्यां दीधले
तेणें ते अति रंगले दशनही शोभा बहू पावले ।
पूढें ठेवुनि आरसा रुप तसें पाहोनियां चालली
मार्गीं पंथ क्रमीत रंभा···· पहा ते हंसवेगावली. ॥ २२

गजगती मग चालिल ते सती, पदयुगीं कल किंकिणि गर्जती ।
क्षणभरी नं ललना न विसावली, त्वरिं तपोधन समीप पावली. ॥ २३
पदीं चालतां पैंजणांचेनि नादें, वनीं कोकिला कुंजती मंद नादें ।
जळीं पद्मिनी डोलती [11]भृंगभारें, सुखें चालतां गर्जती तीं मयूरें. ॥ २४
ऐसी वनांत अवलोकित जाय [12]मानें, तों तों सरोवर निकें नलिनीदलानें ।
आरक्त पीत कमळें अति शुभ्र जाती, नाना [13]अलीतति मदें वरि डोलताती. ॥२५
विस्तीर्ण [14]पुष्पवटिका भरल्या फुलानें, वायू सुशीतल [15]सुगंधयुत····तेणें ।
कंदर्पधाम वन शोभत माधवेसी, तों देखिलें स्वपुर तो शुक आश्रमासी. ॥२६
मनीं थोर आनंदली [16]पंकजाक्षी, करी नृत्य नाना विलासें कटाक्षी ।
पदीं नाचतां किंकिणीच्या निनादें, वनीं [17]कोकिळा स्तब्ध झाल्या विनोदें. ॥२७

---

१. आंगठ्या, मुद्या. २. वस्त्रें. ३. पदर, शेवटें, टोंकें. ४. फांसेगार, ठग, नीच. ५. ओंठ, ओष्ट. ६. विडे, पानपट्ट्या. ७. दांतही. ८. या चरणांतील दोन 'न' पैकीं एक 'न' निरुपयोगी आहे. ९. विश्रांति घेती झाली. १०. त्वरेनें, लौकर. ११. भ्रमरसमूहानें. १२. गर्वानें, आढ्यतेनें. १३. भ्रमरपंक्ति. १४. पुष्पोद्यान. १५. गंध=सौरभ, सुवास. ['**गंध**स्तु सौरभे योगे गंधके गर्वलेशयोः । स एव द्रव्यवचनो बहुत्वे पुंसि च स्मृतः ॥' इत्यभिधानात्. शिशुपालवध–सर्ग ८ श्लोक ३० टीका पृष्ठ २३९ पहा.] १६. कमलाक्षी. १७. श्लोक २४ पहा.

नाना स्वरें मधुर गायन गात चाले, को[1]याळ मंजुळ वदे तशि मंद बोले ।
मोरें मृगें विकळ भोंवति भोंवताली, पक्षीकुळें [2]अचळ होउनि सर्व ठेलीं. ॥२८

वसंतासि अत्यंत उल्हास झाला, विकासे फळीं पुष्पगंधारसाला ।
शुकासंनिधा येउनी देवदारा, उभी [3]पल्लवें घालिते मंद वारा. ॥ २९
परी [4]चेतें नोहे मुनीच्या मनासी, म्हणोनी असे प्रेरिलें मन्मथासी ।
विसर्जूनियां ध्यान [5]मुद्रा तपासी, तेव्हां पाहि तो उभी रूपराशी. ॥ ३०
असंभाव्य हा ज्ञानसिंधू तपस्वी, [6]गुणातीत तो ब्रह्मनिष्ठ स्वभावी ।
विवेकें बळें आंवरूनी मनाला, वदूं लागला काय त्या गोरटीला. ॥ ३१
'कवण गांव तुझा तरुणी! असे? कवण कार्य वनाप्रति या असे? ।
तरुण एकलि तूं कवणे गुणें फिरसि [7]भीमभयानक हीं वनें?' ॥ ३२
तंव बोलिली चंचलाक्षी तयातें, म्हणे, 'योग हा सर्व एकांत येथें ।
वसंतें वनीं पुष्पवल्लीफुलानें, सुगंधीत हो गंध उन्माद तेणें. ॥ ३३
[8]अकल्पीत हे लाधली यौ[9]वनांगी, सुखीं स्वस्थ तें [10]मसीं सौख्य भोगीं ।
असे योग हा सर्व संताप पाहें, विना भोग संतापिल्या केंवि होय?' ॥३४

म्हणे शूक, 'चांडाळिणी! जाय आतां.' म्हणे, 'हानि योगा तुझा संग होतां ।
नको गे! वदूं सर्वदा कर्म खोटें, महा तापसी भंगिले त्वांचि [11]नेटें.' ॥ ३५

मग वदे [12]तरुणांबुजलोचनी, धिग्जीत्व [13]नरावृत्तीचे जनीं ।
रतिसुखें भोग न भोगिजे, पशुसमान नर व्यर्थहि [14]जीत जे. ॥ ३६

पाहे सुगंधित तनू मलयागिरानें, जाती फलान्वित लवंग सकर्पुरानें ।
पानें [15]सुपक्व विडिया रतिभोगकाळीं, नेवे तयासि जननी भुमिभार [16]व्याली. ३७
[17]वक्षोज वर्तुळ तयावरि हेमकांती, [18]शृंगोपमावरि नवग्रह विराजताती ।
एकांतभोगसमयीं [19]करिं जो धरीना, तीं मानवें पशुसमानहि व्यर्थ जाणा. ॥ ३८

---

१. कोकिला. २. स्तब्ध, तटस्थ. ३. पदरानें. ४. चेतना, हालचाल, चलनवलनादि क्रिया. ५. मौन. [यच्छति वाचि मुद्राम्=वाचि मौनं ददाति—असा 'मुद्रा'शब्दाचा मौनार्थक प्रयोग संस्कृत काव्यांतही आढळतो. स्तुतिकुसुमांजलि—स्तोत्र ११ श्लोक ७६.] ६. निर्गुण. गुणापलिकडचा. ७. अत्यंत भयंकर. ८. ध्यानीं मनीं नसतां, चमत्कारिक रीतीनें. ९. तरुणी. १०. माझ्याशीं. ११. दृढनिश्चयानें, जोरानें. १२. तरुण आणि अंबुजलोचनी (कमलाक्षी). १३. नरावृत्तीचे (मानवी वृत्तीच जनीं (लोकांत) धिग्जीत्व (जगणें धिःकारयुक्त) आहे. १४. जीवंत. १५. चांगलीं पिकलेलीं. १६. प्रसवली. १७. उरोज, कुच. १८. शृंगाची (शिंगाची) ज्याला उपमा दिलेली आहे त्या स्तनावर. १९. हातांत धरीना.

न ऐ[1]श्वर्य रूपलावण्य तूझें, वृथा वाहसी हृदयीं मांस ओझें ।
किती व[2]र्णिसी पापिणी रक्तगोळे, सुखाशेवटीं लोंबती चर्मझोळे.॥३९
[3]तृषाक्रांत जैसा करीतो [4]असाशा, [5]मृगांबू हरी काय त्याची पि[6]पासा? ।
परब्रह्म आत्मा जयाला सदाही, प्रपंचीं सुखा [7]नातळे, तो कदापी. ॥ ४०
पहा दक्षिणावर्त हे नाभि कैशी, कटी सिंह, [8]जंघा जशी [9]कर्दळीची ।
तनू कोंवळी रम्य हे [10]हेमरंगी, जगीं व्यर्थ [11]जीणें अशी जो न भोगी.॥४१
तूं देख चंद्रवदना नवयौवनांगी, [12]पीनस्तनी [13]मृगदृशा उभि हाटकांगी ।
देवांसि दुर्लभ असे रतिसौख्य माझें, ध्यानें, समाधि, तप, योग उगाचि ओझें?'॥

'मुखें [14]श्लेष्मा, घ्राणीं अशुचि तुळिसी इंदुसि कसें?
म्हणोनी हें तूझें वचन अवघें व्यर्थचि दिसे, ।
[15]भगीं दुर्गंधी हे [16]कृमि बहुत पोटांत असती
रमे ऐशा ठायीं मुनिजन तया व्यर्थ म्हणती.' ॥ ४३

रंभा म्हणे, 'शुकमुनी! [17]वनिता तशा या, तूं जाणसी नृपसुतादिक लोक[18]जाया।
मीं तों तयांसम नसें उदरांत पाहें.' फोडोनियां निज करें मग दाविताहे.॥४४
नाना सुगंध [19]हरिचंदन कस्तुरीचा, [20]जांतीफुलें [21]अगरु कर्पुर केशराचा ।
दाही दिशा [22]परिमळें भरल्या [23]समीरें, प्रत्युत्तरासि वदला शुक तो विचारें.॥ ४५
'योनी अनेक फिरतां बहु शीणलों मी, दुर्गंध मुत्र मळ जो जंतु अखंड वर्मी ।
ऐसा सुगंध उदरीं जरि जाणतों वो! पो[24]ऱ्या तुझ्याच उदरीं तरि जन्मतों वो!'॥

ऐसें उत्तर ऐकुनी स्वहृदयीं रंभा विराली असे,
चित्तीं सुकविराजे[25]मांदि हरिखे, शांती शचीमानसें ।

---

१. ह्या श्लोकांत वृत्ताविपर्यीं घोंटाळा आहे. २. वर्णिसी, वाखाणिसी. ३. तृषित, तहानेला. ४. इच्छा, आशा, असोशी. ५. मृगजळ. ६. तहान, तृषा. ७. स्पर्शत नाहीं, सुख मिळत नाहीं–हा भाव. ८. मांड्या. ९. केळीची. १०. सुवर्णरंगी, सोनेरी. ११. जगणें. १२. पुष्टस्तनी. १३. हरिणाक्षी. १४. शेंबुड. १५. भग=छिद्र, भोंक. १६. किडे. १७. स्त्रिया. १८. जाया=भार्या. १९. एक प्रकारचें मलयदेशांत होणारें चंदन. यालाच 'गोशीर्ष' असें म्हणतात. [**हरिचंदनः**–(इंद्रस्य विष्णोर्वा प्रियं चंदनं) 'घृष्टं च तुलसीकाष्ठं कर्पूरागुरुयोगतः । अथवा केशरैर्योज्यं **हरिचंदन**मुच्यते ॥' (पद्मपुराण). '**हरिचंदन**मस्त्री स्यात्रिदशानां महीरुहे । नपुंसकं तु गोशीर्षे ज्योत्स्नाकुंकुमयोरपि ॥' इति मेदिनी. 'हरि कपिलं तद्वर्णत्वात् । हरेरिंद्रस्य वा चंदनं **हरिचंदनम्**' इति रायमुकुट्याम्. स्तुतिकुसुमांजलि–स्तोत्र ८ पृष्ठ ९५ श्लोक ४ टीका.] २०. जाईचीं फुलें. २१. कृष्णागरु. एका जातीचा चंदन. २२. वासानें. २३. वाऱ्यानें. २४. मुलगा. २५. मांदि=समुदाय.

ते काळींच मनीं समाधिभुवनीं योगासनीं बैसुनी
रंभा दीन, वनीं उभी, विचरुनी शंकीत झाली मनीं. || ४७

**उपसंहार.**

(श्लोक.)

विरक्तासि हा काम बाधूं शकेना गुणातीत योगी कदापि ढळेना ।
जगत्रीं[1] शुकाची अशी कीर्ति झाली शिरीं सूमनीं[2] निर्जरीं[3] वृष्टि केली. ||

---

## मुद्गलकृत[4]

### ४. रुक्मिणीस्वयंवर[5].

(श्लोक.)

केला प्रश्न परिक्षिती[6]क्षितिपती[7] [8]योगींद्र शूकाप्रती
श्रीकृष्णें भिमकात्मजा[9]हरण हें केलें कथीजे स्थिती[10] ।
देखोनी दुतप्रश्न[11] आदर मुखें बोले महाकौतुकें
उल्हासें मग भूपतीप्रति मुनी[12] सांगे महाकौतुकें. || १
येओनी नट[13] नृत्य तो करि सभे, श्रीकृष्णकीर्ति ठसा
ऐकोनि; भिमकात्मजा लय[14] धरी त्या श्रीहरी डोळसा[15]. ।
पाहे चंचळ विव्हळा बहु असें राजा विचारी मनीं
श्रीकृष्णा सगुणा दिली परम हे संकल्प केला मनीं. || २
राजाचे वचनोत्तरें खवळला रुक्मा[16] कुपुत्र कसा?
कृष्णा गोवळआत्मजासि[17] भिमकी पित्रार्थ हा कायसा? ।

---

१. जगत्रयीं. २. फुलांनीं. ३. देवांनीं. [निः+जरा=ज्यांना जरा (वार्धक्य) नाहीं ते निर्जर.] ४. ह्या कवीच्या वडिलांचें नांव अनंत असें होतें (श्लोक १७ पहा). अनंतात्मजकृत 'विठ्ठलस्तुति' (श्लोक ७) आमच्यापाशीं आहे. मुद्गल हाच वरील अनंतात्मज असावा. ५. ही कथा श्रीमद्भागवत–दशम स्कंध–अध्याय ५२-५४ यांत आहे. याच कथानकावर एकनाथ, विठ्ठल, सखारामतनय, नागजोशी, दिनकर, जयरामस्वामी व अमृतराय या कवींनीं काव्यें केलीं आहेत. पैकीं शेवटील तीन अनुपलब्ध आहेत. ६. हा अभिमन्यूचा पुराणश्रोता पुत्र. ७. राजा. ८. योगिश्रेष्ठ. ९. भीमक+आत्मजा=भीमकराजाची मुलगी (रुक्मिणी). १०. सध्या, सांप्रत. ११. येथें कांहीं अपपाठ आहे. येथें 'भुपप्रश्न' असा तर पाठ नसेल ना? १२. शुक. १३. नृत्य करणारा. १४. आपलें ध्यान कृष्णाकडेच लावी. १५. सुंदरा, चपळ. १६. रुक्मिणीचा भाऊ. १७. गवळ्याच्या मुलास. येथें संधि कर्तव्य असून केला नाहीं.

चैद्या[1] नेमिलि रुक्मिणी, परम ते खेदासि ते पावली
कृष्णासीं मग पत्रिका[2] द्विजवराहातीं[3] तया धाडिली. ॥ ३
'श्रीकृष्णा! मनमोहना! निधिगुणा! निर्गूण! गूणातिता[4]!
भक्तोद्धारकरा[5]! कृपा हरिहरा! दीनोद्धरा! अच्युता[6]! ।
पत्नी केसरिची[7] तियेसि करिती जंबूक[8] नावें वरा
ये काळीं जरि पावसी नरहरी! कीर्ती तुझी दुर्धरा[9].' ॥ ४
श्रीकांतें मग वाचुनी बहुश्रुती[10] संतोष तो मानिला
वारू[11] जुंपुनि स्यंदना[12] द्विजवरा आरूढ तो जाहला ।
कौंडण्येपुर पावला हरि त्वरें बाहेरि तो राहिला
ऐकोनी बळराम सैन्य सबळें[13] कृष्णाप्रती पावला. ॥ ५
चैद्यासी सह मागधादि[14] प्रमुखें सैन्यें दळें चालिले
कौंडण्याधिपती तयास नृपती येवोनियां भेटले ।
सन्मानें करुनी तयांसि नमुनी जानीवसा[15] आणिलें
आले ऐकुनि रामकृष्ण नृपती धांवोनि आलिंगिले. ॥ ६
राजा तो सुख मानुनी मग म्हणे, 'जानीवसा येइजे
बोले कृष्ण फुका विरोध, स्थळ हें अंबालयीं देइजे ।
जाणोनी मनिचें तदा बहु बरें मानोनियां भीमकें
अंबेच्या निज स्थानकीं[16] हलहरी[17] नेले महाकौतुकें. ॥ ७
बोले शुद्धमती नृपासि पुढती, 'न्या रुक्मिणी अंबिके[18]'
तें पुत्र श्रवणांतरीं दचकला[19] हें तों दिसेना निकें[20] ।

---

१. चैद्य=चेदिदेशाचा राजा शिशुपाल. २. 'मला स्वीकृत करा' इत्यादि मजकुराची 'श्रुत्वा गुणान्भुवनसुंदर' इत्यादि सात श्लोकांची प्रणयपत्रिका रुक्मिणीनें कृष्णाकडे एका चतुर विप्राबरोबर पाठविली ही कथा भागवत–दशमस्कंध–अध्याय ५२ यांत आहे. [मोरोपंत–कृष्णविजय–अध्याय ५२ पद्यें ३४-४० पहा.] ३. सुदेव नांवाच्या ब्राह्मणाबरोबर. ४. गुणांच्या पलिकडल्या, निर्गुणा. ५. भक्तांचा उद्धार करणाऱ्या. ६. कृष्णा! [अच्युत=विष्णु (कृष्ण). 'भक्तेभ्योऽच्युतपूर्वत्वात् अच्युतः परिकीर्तितः । आश्रितानां च्युतिर्यस्मान्नास्ति सोऽच्युत ईरितः ॥' विवृत्तिसहितं विष्णुनामसहस्रम्. पृ० ८.] ७. सिंहाची. ८. कोल्हा. ९. बहुत, असह्य. १०. बहुविध. ११. घोडा. १२. रथास. १३. बळा (सैन्या)सह. १४. मगधदेशचा राजा जरासंध. १५. जानीवसा=वऱ्हाडी उतरण्याची जागा. १६. घरांत (देवळांत). १७. बलराम आणि कृष्ण. १८. रुक्मिणीची आई. १९. भ्याला. २०. बरें, चांगलें.

श्रीकृष्ण कपटी [1]सुशक्तिसदनीं तो ते स्थळीं राहिला
ऐसा [2]भ्याड बहू म्हणोनि भिमकें धिक्कारुनी टाकिला. ॥ ८
वर्मी खोंचुनि रुक्मया मग म्हणे, 'मी तों न मानीं असें
आतां येतिल रामकृष्ण समरीं लावीन त्यांला [3]पिसें.' ।
ऐसें बोलुनि रुक्मया, [4]भगिनिसी नेलें त्वरें अंबिके
होतां दर्शन स्पर्शनें भिमकिसी माळा दिली कौतुकें. ॥ ९
[5]उल्हासें निघतां पुढें यदुपती [6]न्याहाळिला [7]सत्वरी
दृष्टी देखुनि घाबरी निजकरीं माळा त्वरें सांवरी ।
वीरांचा अभिमान मोह निरसे झुंजोनियां सोडिला
[8]वैदर्भी रथिं वाहुनी [9]नरहरी [10]रामाप्रती पावला. ॥ १०
होती सावध पाहती भिमकिसी तों ना दिसे पैं विरां
हाका देउनि चालिले [11]गवसिती श्रीकृष्णदामोदरा ।
दोनी ते दळभार संगरिं महा संघट्टणीं भीडले
श्रीरामें [12]हल घेउनी [13]धिरविरां [14]घायातळीं आणिलें. ॥ ११
घेओनी हल चालिला तंव जरासंधू पुढें सूदला
तो वांटा म्हण आपुला म्हणुनियां युद्धा पुढें राहिला ।
पाहे सैन्य सभोंवतें हलधरें खंडोनियां पाडिलें
दृष्टी बुद्धि विचारुनी मग [15]जरें [16]गंतव्य आरंभिलें. ॥ १२
वैदर्भीप्रति पावला तंव शिशूपाळा पुढें देखिलें
त्यातें घेउनि मागधें निजदळें चैद्यापुरा पावले ।
रुक्मीया श्रुत होउनी मग तया क्रोधाग्नि तो [17]जाहला
रागें [18]नीकट चालिला हलहरी जेथें असे राहिला. ॥ १३
शस्त्रास्त्रीं वरुषे तया मग हरी सन्नीध तो भीडला
बाणें वर्षत पावला निज हरी देखोनियां भूलला ।

---

१. अंबेच्या देवळांत. २. भित्रा. ३. वेड. ४. बहिणीस. (रुक्मिणीस.) ५. आनंदानें. ६. देखिला. ७. लवकर. ८. विदर्भ देशचा राजा भीम याची कन्या रुक्मिणी. ९. कृष्ण. १०. बळरामाजवळ. ११. पाठलाग करिती. १२. नांगर. १३. शूर वीरांस. १४. घायातळीं आणिलें=घायाळ झालेल्यांमध्यें आणिलें=घायाळ केलें. १५. जरासंधानें. १६. गमन. १७. फार राग आला. १८. जवळ.

सर्वस्वें दुसरा करोनि धरिला [1]वीटंबिला बांधिला
देखोनी दि[2]नरूप राय बळिनें सोडोनियां दीधला. ॥ १४
गेला आपण **भो**जकोटनगरा वस्तीस तो राहिला
ते वेळीं **भि**मकें मनीं निजसुखें **कृ**ष्णासि तो भेटला ।
लग्नासी मु[3]ळ. **मा**धवें **य**दुविरें जागा नि[4]का नेमिला
बोलावूं त्वै[5]रि **द्वा**रकादिकरुनी आणावया धाडिला. ॥ १५
येतां भूपवरें तयासि गजरें घोषें बहू आणिकें
वाद्यांचे गजरें स्वयंवर निकें नेलें महा [6]कौतुकें ।
आज्ञा घेउनि श्री**ह**री **भि**मकिसी नेलें त्वरें [7]**द्वा**रका
ऐसें येउनि **द्वा**रके तंव **ह**री सिंहासनीं बैसका. ॥ १६
[8]वामांकीं **भि**मकात्मजा, मुनिजना देखोनि संतोषला
ते काळीं हरिनें तदां सकळिकां सन्मान तो दीधला ।
**आ**नंतूसुत **मु**द्गल मग मनीं देखोनि संतोषला
ऐशी **‘रुक्मिणिची स्वयंवरकथा’** अष्टादशा नेमिला. ॥ १७

## [9]उपसंहार.

(श्लोक.)

कथा संपली येथुनी सैंवराची, [10]कंथा जाण तूं [11]वाक्यदिव्यांबराची ।
सकाळीं पढे त्यासि मुक्तीसि ठावो, सुखें संपदा नांदती पुत्र रावो ॥

---

१. निर्भर्त्सना केली. २. दीनांप्रमाणें. ३. आमंत्रण. येथें ‘धाडिलें’ हें क्रियापद अध्याहृत आहे. ४. चांगला. ५. त्वरेनें, लौकर. ६. कुतुहलें. [‘**कौतुकं** नर्मणीच्छायामुत्सवे कुतुके मुदि । पारंपर्यागतख्यातमंगलोद्वाहसूत्रयोः’ इति हैमः, ‘**कौतुकं** त्वभिलाषः स्यादुत्सवे नर्महर्षयोः । कुतूहलेऽपि तत्प्रोक्तम्’ इति मेदिनीकरः ॥ ‘**कौतुकं** मंगले हर्षे हस्तसूत्रे कुतूहले’ इति शाश्वतः.] ७. द्वारकेस. ही कृष्णाची राजधानी. हें बेट गुजराथच्या पश्चिमेस आहे. ८. डाव्या मांडीवर. ९. ‘वरदानस्य उक्तिर्या सा काव्य उपसंहृतिः’—ज्या श्लोकांत वरदानाचा उल्लेख असतो त्याला ‘उपसंहार’ असें म्हणतात, या न्यायानें प्रस्तुत श्लोकाच्या द्वितीयार्धांत वरदानाचा उल्लेख आहे. १०. कंथा, गोधडी, रजई. ११. वाक्यरूपी दिव्य अंबराची (वस्त्राची).

# विठ्ठलकविकृत[1]

## ५. नौकाक्रीडनाख्यान[2].

(साकीवृत्त.)

एके दिवशीं कृष्णव्रजवधू[3] वृंदावनिं खेळाया ।
गेलीं असतां, खेळत खेळत जाती रविजाठाया[4]. ॥ १
थाट हरीचा दाट गोपिका पाट नदीचा वाहे ।
तेथें होति एक जुनाटशी नौका पाहुनि, हरि म्हणताहे. ॥ २
'ऐका तुम्हि शशिवदना!' मित्रें म्हणे मदनारि[5] ।
या तरिमध्यें[6] सर्व बसोनी जाउं चला परतीरीं. ॥ ३
कृष्णाप्रति राधिका म्हणतसे नम्रवचन त्या काळीं, ।
'आम्हां नकळे निरगति कैसी यमुना फार खळाळी. ॥ ४
तूं बालक अम्हि सर्वहि अबळा न बसावें उडुपांत[7].' ।
कान्हा त्यांस म्हणे, 'तुम्हि चिंता न करावी हृदयांत.' ॥ ५

---

१. हा कवि बीडकर विठ्ठल, विठ्ठलनाथ व विठ्ठलनृसिंह या कवींहून निराळा होय. ह्याच्या गुरूचें नांव 'केशव.' या कवीनें केलेलीं आख्यानें:–(१) सखूचरित्र, शबर्याख्यान, नौकाक्रीडन व भानुदासचरित्र हीं आमच्यापाशीं आहेत. २. कृष्णानें बालपणीं गोपींसह-वर्तमान यमुनानदीच्या जळांत नौकाक्रीडन केलें त्याचें वर्णन या काव्यांत आहे. म्हणून याला 'नौकाक्रीडनाख्यान' असें अन्वर्थक नांव दिलेलें आहे. एका समयीं गोपी बालकृष्णाला घेऊन नावेंत बसून यमुनाजलांत विहार करण्यासाठीं गेल्या असतां एकाएकीं नौकेला छिद्रें पडून पाणी भराभर आंत शिरूं लागलें, मेघगर्जना होऊन वारा सों सों वाहूं लागला आणि विजा चमकून पंच महाभूतें क्षुब्ध झालीं कीं काय अशी स्थिति प्राप्त झाली. गोपी घाबरून गेल्या. तेव्हां 'नावेचें छिद्र बुझविण्यासाठीं आपल्या चोळ्या आणि वस्त्रें सोडा' असें कृष्णानें त्यांस सांगितलें, त्याप्रमाणें त्यांनीं केलें. तथापि पाणी नावेंत शिरण्याचें राहीना. मग कृष्णानें त्यांस क्षणभर डोळे मिटण्यास सांगितलें. तसें करून डोळे उघडून पाहतात तों आपण यमुनातीरावर आहों आणि आपलीं वस्त्रें कोरडीं आहेत असें गोपींस दिसून आलें. नंतर हा सर्व खेळ कृष्णानें बुद्ध्या करविला असें समजतां त्या विस्मयान्वित मनानें आणि अनन्यभावानें कृष्णाची स्तुति करून, व आपलें मंदमतित्व आणि अल्पत्व जाणून कृष्णपदीं लीन झाल्या–असा कथाभाग या काव्यांत आहे. ३. कृष्ण आणि गोपी. ४. सूर्यतनया, यमुना. ५. मदनारिमित्र= शंकराचा मित्र (कृष्ण). ६. नावेंत, होडींत. ७. नावेंत.

ऐकुनि हरिउत्तरा व्रजवधू बसल्या नौकापोटीं[1] ।
वेष्टित तारांगणीं शोभला शशि जैसा जगजेठी[2]. ॥ ६
तरणिजानिरीं[3] तरणि[4] लोटतां तरुणी बसुनि व्रजाच्या ।
लाजति रतिदमयंतिशारदा पाहतां मुखशशि ज्यांचा. ॥ ७
यमुनेच्या मध्यभागिं नौका जातां काय मुरारी ।
करिता झाला कपट अरीनें[5] आच्छादीत तमारी[6]. ॥ ८
देखुनि तम लोचनिं मग अबला चिंतातुर बहु झाल्या ।
'आतां काय करावें येथें?' कृष्णाकरितां भ्याल्या. ॥ ९
कैसी नाव तरूनी जाइल कैसा वांचेल कान्हा ।
अशा उपायीं कांहिं न देखो विचार करिती नाना. ॥ १०
यापरि चिंता करितां रजनी[7] प्रकट झालि डोहांत, ।
कृष्णानें पवनाप्रति[8] म्हणतां ठाके[9] जोडुनि हात. ॥ ११
आज्ञा करि यदुराज बिडौजा[10], 'वर्षें मेघ तूं चारी.' ।
[11]झंजा मारुत सुटला, मेघहि रिचवति[12] शुंडाधारी. ॥ १२
मेघोदर गर्जना करितसे कडकडती चपळा[13] ते ।
भडभड भडके फुटती तडके धीर नसे अबळांतें[14]. ॥ १३
झाली जळमय रसा[15] दिसतसे गमला कल्प[16] विधीचा; ।
ऐसें करि कौतुक जामात[17] तेव्हां [17]क्षीरनिधीचा. ॥ १४
डळमळ करि [18]वनिं नौका गोपी हरि झांकिति अंचळानें[19] ।
बळकट कवळुनि हृदयीं धरिती हरितें करकमळानें. ॥ १५
पाहे मन गोपिचें यदुपती, 'काय भिती मरणाला, ।
कीं मजला रक्षिती, कृपण जन जैसे आभरणाला[20].' ॥ १६
ऐसें मनिं आणुनी नगारीसुतसारथि[21] करि काये ।

---

१. नौकेच्या पोटांत, नौकेंत. २. जगश्रेष्ठ, सर्वांत श्रेष्ठ. ३. यमुनेच्या पाण्यांत. ४. नाव, होडी. ५. चक्रानें. ६. सूर्य. ७. रात्र. ८. वाऱ्याप्रती. ९. प्राप्त होई, हजर होई. १०. इंद्रा. ११. तुफान, मोठा वारा. १२. रिक्त करतात, ओततात (पाणी). १३. वीज. १४. स्त्रियांतें. १५. पृथ्वी. १६. कल्पांत, प्रलयसमय. १७. कृष्ण. हा 'पर्यायोक्त' अलंकार होय. १८. पाण्यांत. १९. पदरानें, वस्त्रप्रांतभागानें. २०. अलंकारांना, दागिन्यांस. २१. नग+अरि+सुत+सारथी=पर्वत+शत्रु+पुत्र+सारथी=पर्वतांचा शत्रु जो इंद्र त्याच्या पुत्राचा (अर्जुनाचा) सारथी (कृष्ण). हा 'पर्यायोक्त' अलंकार.

नौकेच्या दारुकास[1] छिद्रें पाडी. मग जळ वाहे. ॥ १७
भळभळ वारी[2] आंतचि भरतां, रामाजन[3] बोभाट ।
करित्या झाल्या महाध्वनीला, झाली असि वहिवाट[4]. ॥ १८
मोठें संकट पडलें तेव्हां म्हणती काय करावें? ।
कृष्णा आधीं आपण उदकीं होउनि नग्न मरावें. ॥ १९
झाल्या सिद्ध उड्या टाकाया ऐसा निकर[5] स्त्रियांचा ।
पाहुनि हरि म्हणतसे बुजाया छिद्रें उपाय साचा. ॥ २०
'फेडुनियां सर्वही कंचुक्या दाटा जहाजभंगाजां[6].' ।
कृष्णोक्ती ऐकुनियां नारी काढिति त्यजुनी लाजा. ॥ २१
केला यत्न परी ना चाले, चढलें बहुतचि पाणी ।
बाळा त्या सकळांस विनविती, 'पाव अम्हां शुळपाणी[7]! ॥ २२
'आतां नाव[8] बुडाया कांहीं विलंब उरला नाहीं ।
या कृष्णाप्रति वांचवि गिरिजापति[10]! तूं ये लवलाहीं[9].' ॥ २३
या परि करुणा करिती अबला तों बोले मदनारी, ।
'प्रिय चिर फेडुनि सर्व तुम्हि बुजा[11] जायाला परपारीं. ॥ २४
व्रीडा[12]त्याग करुनि मग नारी मुक्त करिति लुगड्यांतें ।
दाटति छिद्रांमधें, वांचवूं पाहति गोपगड्यातें[13]. ॥ २५
बुजलीं छिद्रें, परि जळ भळभळ नौका भरभर झालें ।
गोपींचा कटिभाग उलंघुनि वारी तें वर चालें. ॥ २६
शौरीच्या कंठा पोंवत[14] निर तेव्हां काय करीती ।
उचलुनि सत्वर व्रजपाळा मग स्कंदावर[15] बसवीती. ॥ २७
निर नौका सारिखीच दिसते जसि घटि पूर्ण जळानें, ।
ऐसा समयो निरखुनि नयनीं काय किजे अबळानें. ॥ २८
मग मदनाच्या[16] जनका[16] स्मरती, 'धांव त्वरें या काळीं.' ।
तों जळ गोपी कंठ व्यापुनी स्पर्शायास कपाळीं. ॥ २९
धांवे तों व्रजवधू ठेविती उचलुनि शिरिं कृष्णाला, ।
आतां ठाव नसे कोठेंही उरला, अंतचि झाला. ॥ ३०

---

१. लांकडाला, फळीला. २. पाणी, जल. ३. स्त्रीसमुदाय. ४. वार्ता, हकीकत. ५. विचार, नेट, आग्रह. ६. छिद्रांत. ७. शंकरा. ८. होडी. ९. सत्वर, त्वरित. १०. शंकर. ११. समजा. १२. व्रीडा=लज्जा. १३. गोपांचा गडी (मित्र) कृष्ण त्यास. १४. पोंचे, लागे. १५. खांद्यावर. १६. कृष्णाला. (मदनाचा बाप.) हा 'पर्यायोक्त' अलंकार.

सद्गद कंठीं, अश्रू नयनीं, करिती स्तुति गजगमना[1]; ।
'केशव! माधव! मुकुंद! विष्णु! नारायण! मधुसुदना! ॥ ३१
वांचविलें, प्रऱ्हादालागुनि आणि नक्र गजेंद्रा ।
गांजीतां, धांवलासि मग तूं लोटुनि मागें खगेंद्रा[2]. ॥ ३२
मंडुकबाळी[3] कढई असतां तापेना तें पाणी ।
द्रौपदिबाळा लज्जानदिंतुनि काढियली निर्वाणीं[4]. ॥ ३३
ऐसा दीनदयाळू होसी ब्रिदें[5] अपुलें रक्षाया ।
वांचविलें नंदालागुनि तूं आला अजगर भक्षाया.' ॥ ३४
यापरि करितां धांवा हरिचा काढियलें रवि चक्रा[6] ।
मरुत निवाला, मेघहि सरला, आज्ञा होतां शक्रा[7]. ॥ ३५
नौका रिक्त[8] जळानें झाली. वोसरला[9] रविजेचा[10] ।
पूर. कडाका होतचि असतां शमला तोहि विजेचा. ॥ ३६
ऐसें कौतुक पाहुनि तेव्हां गोपी लागति पायां ।
हरिच्या वृंदावनासि तेव्हां येउनि अपुल्या ठायां. ॥ ३७
हरि ऐसा नाटकी व्रजजनां दावितसे नवलातें ।
विठ्ठल गुरुचरणांप्रति वंदुनि मागे मुखकवळातें[11]. ॥ ३८

---

१. हत्तीसारखें ज्यांचें चालणें आहे त्या. २. गरुडाला. ३. बेडकी. याविषयीं पुढील उतारा पहा:—"लोहकढईंत भरलें उदक । तळीं प्रज्वळीला पावक । त्यामाजि मंडूकबालक । लाहे तळीं लागलें. ॥ १ ॥ तें संस्कारें स्मरे कृष्ण । तळीं धडकल्या हुताशन । उदक अणुमात्र नोहे उष्ण । तेणें आश्चर्य समस्तां. ॥ २ ॥ पर्वतप्राय जळतां काष्टें । तोयशीतलता न पालटे । आकाशवाणी महा नेटें । गगनोदरीं होसरली. ॥ ३ ॥ म्हणे, 'मंडूक असतां भीतरी । जाळ घालितां अहोरात्रीं । उष्ण नोहेल तिळभरी । रिचवा झडकरी जळातें. ॥ ४ ॥ तळीं रिचवूनियां जळ । कडे काढा मंडूकबाळ । उदक तापेल तात्काळ । हें निश्चयें जाणिजे.' ॥ ५ ॥ तळीं रिचवितां जीवन । पाहती मंडूकबाळ सान । मुखें म्हणे, 'कृष्ण! कृष्ण!' । विस्मित मन जनाचें. ॥ ६ ॥ विष्णुविमान येऊनि पाहीं । दर्दुर केला दिव्यदेही । तो ठेविला वैकुंठगेहीं । [श्रीकृष्णानें] कौतुकें. ॥ ७ ॥" [मुक्तेश्वर—वनपर्व—अध्याय ११ ओंव्या ५८-६४.] ४. शेवटीं, संकटीं. ५. लौकिक, बाणा. ६. सूर्यावर टाकलेल्या सुदर्शनचक्रा. ७. इंद्राला. ८. रिकामी. ९. सरला, निघून गेला, उतरला. १०. यमुनेचा. ११. कवल=ग्रास, घांस.

# चिंतामणिविरचित

## ६. सीतास्वयंवर.[२]

(गीतिवृत्त.)

होते अधीच[३] सीतास्वयंवरोत्सव महीपजन[४] कानें ।
ऐकुनि, गमनोत्सुक तों पाठविलें लग्नपत्र जनकानें. ॥ १

झाली भोगार्ह[५] वयें, गुणेंहि; महिजा[६] नवीन कनकलता[७] ।
यापरि[८] धांवति यावद्भूगत[९] भूपालभृंगजन[१०] कळतां. ॥ २

होते सुरूप आधीं, परि भूषविती स्वदेह कनकानें ।
नृप[११], कीं पाहुनि रूपा द्यावी सीता अम्हांस जनकानें. ॥ ३

येतां नृप जनकानें बैसविले सर्व मांडवामाजी, ।
तों पाहति खिडकींतुनि सीतेसह सर्व मांड[१२] वामा[१३] जी[१४]. ॥ ४

सिंहासनें नृपति ते आक्रमिती, जेंवि केसरी[१५] शिखरें[१६], ।
याला अनुगुण[१७] उपमा हेच मला भासली बरीशि खरें. ॥ ५

पाहत असतां तनया विकसितनयना वरोन वसुधेची[१८] ।
सर्व म्हणति, 'हे धारा क्षितिपतिनयना वरो नव सुधेची[१९].' ॥ ६

चित्तें सीतेवर नृप होते केवळ सभेंत देहांनीं, ।
मग सहज बाह्य विषयीं पदोपदीं अनवधान[२०] दे हानी. ॥ ७

---

१. ह्या कवीनें केलेलें 'ध्रुवाख्यान' (दिंडीबद्ध) प्रसिद्ध आहेच. शिवाय कांहीं पदें आमच्यापाशीं आहेत. ह्या कवीचा जीवनवृत्तांत माहीत नाहीं. २. ही कथा रामायणाच्या बालकांडांत आहे. ह्या कथानकावर, अनंतकवि, वामनपंडित, अमृतराय, विठ्ठल व जयरामस्वामी यांची कविता आहे. परंतु जयरामस्वामिकृत कविता अजून प्रसिद्ध झालेली नाहीं. ह्या काव्यांत कवीनें वृत्तसुखार्थ शब्दांची हवी तशी ओढाताण केली आहे, तरी हें काव्य सरस आणि चित्तवेधक उतरलें आहे. यांतील स्वयंवरवर्णन इंदुमतीच्या स्वयंवरवर्णनाची आठवण देतें. ३. आधींच, पहिल्यापासून. ४. राजेलोक, राजांचा समूह. ५. उपभोग घेण्यास योग्य. ६. सीता. ७. सुवर्णवल्ली. ८. असें वर्तमान. ९. सर्व पृथ्वीवरील. १०. राजे हेंच कोणी भ्रमर त्यांचे समुदाय. ११. नृप [म्हणती] कीं जनकानें रूपा पाहुनि (आमचें सौंदर्य पाहून) आम्हांस सीता द्यावी—असा अन्वय. १२. थाट. १३. सुंदर स्त्रिया. तो मांड सीतेसह सर्व वामा खिडकींतून पाहती—असा अन्वय. १४. हें पादपूरणार्थक अव्यय समजावें. १५. सिंह. १६. गिरिशिखरें. १७. योग्य. १८. पृथ्वीची. १९. अमृताची. २०. दुर्लक्ष्य. 'अनवधान दे हानी' हा भाग सुभाषितरूप समजावा.

मग आणविलें धाडुनि गज हय वृषभाद्यनेक सामानें ।
चाप तयाचें, होतो [1]जो सत्वर तुष्ट देवसा मानें. ॥ ८
कथितां काय पशूची पाहुं नका यातना थको दंडा ।
अणिति असे जन यत्नें शकटशतें [2]भूतनाथ[3]कोदंडा. ॥ ९
त्यजितां सभांगणीं तो जनकें हरचाप सापसा पडला, ।
भूपतिगणही [4]सज्जीकरणव्याधींत साप सांपडला. ॥ १०
तों येउनि [5]चारांनीं कथिलें जनका बहूत [6]मोदानें, ।
कीं [7]तो गाधिज आला ज्या लाजावें बहू [8]तमोदानें. ॥ ११
मग तो सत्वर भूपति जाय पुढें कीं तपःपद घराशी ।
आलें सुकृतें दुर्लभ, तरि गेला सत्य [9]सापदघराशी. ॥ १२
वंदुनि पूजुनि मग त्या जनक पुसे, 'बा! मुनीश! सकुमार ।
सुगुण सुरूप सुलक्षण हे कोणाचे [10]लसत्प्रभ कुमार? ॥ १३
'ज्याचा न शत्रुहृदया त्यजुनि स्वप्नींहि भयद शर थारे ।
[11]त्यालाच हे सुत नृपा! बाप असें मानिती दशरथा रे! ॥ १४
नामें करूनि बापा! [12]सद्गुणसौजन्यधाम हा राम ।
हा लक्ष्मण दोघेही शौर्यश्रीचे नृपा [13]महाराम. ॥ १५
येणेंचि पूर्ण केला [14]मद्यज्ञ वधूनियां [15]अनीक वनीं, ।
याच्याच सतत रिझला भूपा! [16]वाल्मीकभू मुनी कवनीं. ॥ १६
याच्याच [17]मार्गणा ती भूपा! सत्कारि [18]ताटका [19]असुनीं ।

---

१. शंकर लौकर तुष्ट होतो म्हणून त्यास 'आशुतोष' असें नांव आहे. २. शिव. ३. धनुष्या. ४. धनुष्य सज्ज करणें हीच कोणी व्याधी तींत. ५. हेरांनीं, दूतांनीं. ६. आनंदानें. ७. विश्वामित्र. ८. सूर्यानें. (तमोभक्षक सूर्यानें.) ९. स+आपत्+अघ+राशी=विपत्तिसह पापपर्वत. १०. वीजेप्रमाणें सुंदर चमकणारी आहे प्रभा ज्यांची असे. ११. 'त्यालाच हे सुत' व 'ते दशरथा बाप मानिती' असे दोन शब्दसमूह या गीतींत एकाच अर्थाचे वाचक योजिले आहेत, ही वर्णनशैली लक्ष्यांत ठेवण्यालायक आहे. १२. सत्+गुण+सौजन्य+धाम=चांगले गुण व भलाई यांचें घरच. १३. मोठे बाग. १४. माझा यज्ञ. १५. सैन्य. (राक्षससैन्य). १६. वाल्मिकी. १७. बाणा. १८. ताटका सुकेतु नामक यक्षाची कन्या होती. ही मोठी बलवान् असून, जंभपुत्र सुंद याची स्त्री होती. हिला त्यापासून मारीच आणि सुबाहु, असे दोन पुत्र झाले. विश्वामित्रानें रामाकडून हिचा वध करविला. पुढें यज्ञकालीं सुबाहु मरण पावून, रामबाणाच्या पिसाऱ्यानें मारीच उडून समुद्रांत जाऊन पडला. तेव्हांपासून तो लंकेंत जाऊन राहिला. (भा० प्रा० ऐ० कोश.) १९. प्राणांनीं.

पावे सद्गति कीं ते पावति दुर्गति न देति जे असुनी. ॥ १७
येणें सुबाहु वधिला, हें तरि किति शौर्य रामरायाचें. ।
एतत्करेंच सर्वहि राक्षसगण भूवरा! मरायाचे. ॥ १८
जे स्त्री होय [1]शिला तें कौशल याच्याच बा! [2]पदरजाचें, ।
हा तोच नृपा! धरितो [3]घननादाचाहि बाप [4]दर ज्याचें. ॥ १९
भूपवरा! हे आले स्वयंवरमहोत्सवा पहायास, ।
न कळे बाल्यें दुष्कर कीं सुकर [5]ज्याधिरोप हा यास.' ॥ २०
मग तो [6]शौर्यश्रीधर अवडे रघुराज तेंवि जनकमना ।
देश जसा ज्यांत स्त्री वररूपा राजते [7]विजन [8]कमना. ॥ २१
बहुवार रघुवरा मग पाहे वर्णुनि, मनांतही अपणा ।
निंदी, जनक स्मरुनी [9]अविचारकृतेशधन्वभंगपणा. ॥ २२
मग आदरें बसविला सभेंत कौशिक सशिष्य [10]सर्षिगण, ।
तैं तींत शोभती ते रविशशिसे [11]भास्करान्वयाभरण. ॥ २३
गुरुसह सभेंत येउनि बसतां [12]सूर्यान्ववायहीरमणी ।
म्हणति मनीं भूप, 'दुज्या लभ्य न, रामाशिवाय ही, रमणी.' ॥ २४
तैं एक सखी वर्णुनि गुण भूपां दाखवी [13]धराजेतें, ।
तें ऐकुनि तोषविती चित्ता क्षणमात्र विविध राजे ते. ॥ २५

---

आपले प्राण देऊन तिणें रामाच्या बाणाचा सन्मान केला अर्थात् रामाच्या बाणानें ती गतप्राण झाली. ही वर्णन करण्याची शैली प्रेक्षणीय आणि चिंतनीय आहे.

१. अहल्या ही गौतममुनीची पत्नी. हिचें इंद्रानें धर्षण केलें, म्हणून तिला 'तूं शिला हो' असा शाप मुनीनें दिला. पुढें हिच्या प्रार्थनेवरून 'दाशरथी रामाच्या पदरजःकणानें तुझा उद्धार होईल' असा उःशाप दिला. त्याप्रमाणें रामानें तिचा उद्धार केला—अशी कथा आहे. २. पायांच्या धुळीचें. ३. घननाद हा रावणाचा पुत्र. येथें रावण असें न म्हणतां पर्यायानें तोच अर्थ दर्शविला आहे म्हणून येथें 'पर्यायोक्त' अलंकार झाला आहे. घननाद=मेघनाद. अशा रीतीनें विशेषनामें छिन्नभिन्न करण्याचा संस्कृत कवींचा संप्रदाय आहे; त्याचेंच हें अनुकरण. ४. भीति. ५. ज्या+अधिरोप=दोरी+चढविणें. धनुष्याला दोरी लावणें. ६. शौर्य आणि संपत्ति यांनीं युक्त. ७. एकांत. ८. सुंदर. ९. अविचार+कृत+ईश+धन्व+भंग+पणा=शिवाचें धनुष्य मोडण्याचा अविचारानें केलेला पण. १०. ऋषींसह. ११. सूर्यवंशकुलतिलक. १२. अन्ववाय=वंश. १३. सीतेतें.

'[1]हा तूं पहा महा गे! गुणशाली [2]गुर्जरावनीप, कधीं।
न त्यजुनि यास, सीते! विषय करी [3]निर्जरावनीपकधी. ॥ २६
यद्दंडभयें परधनवस्त्रा न शिवोन वायु वावरतो, ।
जो नाथ [4]अवंतीचा रुचल तरी गे! नवा [5]युवा [6]वर तो. ॥ २७
हा [7]शौर्यौदार्यश्रीसदन मदनसा कलिंगनवराजा, ।
सत्वर वर हाच दिसे सीते! तुज योग्यसंग नवरा जा. ॥ २८
हा तरि पहा सुलक्षणशौर्यनिधी नाथ [8]वंगवसुधेचा, ।
हाच तुझा भोग करो, एक जसा [9]देवपुंगव सुधेचा. ॥ २९
हा तैलंगमहीपति ज्याच्या राज्यांत विप्र [10]तांकास ।
प्राशुनि; राखिति अमृतद [11]सुरभीची जेंवि विप्रता कास. ॥ ३०
तो दावितो पहा, वर सारुनि भूपाल [12]अंगदें [13]शाला ।
यातें वरूनि सीते! शाश्वत तूं पाल अंगदेशाला. ॥ ३१
तो निषधनाथ सीते! जो झेलितसे महीप हारमणी, ।
याची हो तूं, हाची येक जगीं [14]रिपुमहीपहा, रमणी. ॥ ३२
हा काश्मीरमहीपति ज्याची पिळदार परम ही पगडी ।
वक्र; तुला हाच दिसे योग्य सये! [15]विजितपरमहीप गडी. ॥ ३३
[16]किंचिद्वक्रितकंधर सखि! तोच नरेंद्र मालवा, वाहें ।
मन्मन याजवळ तुझा [17]ह्रीनें मुखचंद्रमा लवावा हे. ॥ ३४
केरलभूप पहा सखि! बसलासे धरुनि तो कटार करीं, ।
जो बाल्यींच रिपुगणा करिस जसा सिंहतोक ठार करी.' ॥ ३५
यापरि नाना भूपां दावुनि मग ते रघूत्तमा दावी ।

---

१. हें वर्णन वाचून रघुवंशाच्या सहाव्या सर्गातील सुनंदा+इंदुमती यांच्या भाषणाची आठवण होते. मराठी वाचकांस प्रस्तुत प्रसंगाचा परिचय रा० लेले यांच्या रघुवंशाच्या भाषांतरानें होणार आहे. २. गुर्जर+अवनी+प=गुजराथचा राजा. ३. इंद्राचें मन. या राजाचें मत घेतल्याशिवाय इंद्र कोणतीही गोष्ट करीत नाहीं. ४. अवंती=उज्जनीसभोंवतालचा मुलुख. ५. तरुण. ६. पाणिग्रहण कर. ७. शौर्य, औदार्य व संपत्ति यांचें जणु काय घरच. ८. बंगाल प्रांताचा. ९. देवश्रेष्ठ. १०. तैलंगांना ताक, चिंचेचें सार—ज्याला ते लोक फुलसू म्हणतात—इत्यादि आंबट पदार्थ आवडतात हें प्रसिद्धच आहे. ११. कामधेनूची. १२. बाहुभूषणें. १३. शालजोडी. १४. शत्रुनाशक. १५. जिंकिले आहेत शत्रुरूपी राजे ज्यानें. १६. किंचित्+वक्रित+कंधर=ज्याची मान थोडीशी वांकडी आहे असा. १७. लज्जेनें.

तैं सीतेचें किंचित् ऱ्हीनें आंतचि मुखाब्ज[1] मोदा[2] वी[3]. ॥ ३६
'किति मधुर पहा दिसतो सीते! वीरासन[4]स्थ हा राम, ।
धामनिधि[5] श्यामतनु[6] क्षाम[7] नसे कामसा महाराम[8]. ॥ ३७
कुंडलमंडितगंड श्रीखंडक्षोदलिप्तभुजदंड[9] ।
चंडद्युतिकुलमंडन[10] शोभवि यत्तनु अखंड कोदंड. ॥ ३८
भूप त्वदर्थ सारे वहति मनीं जरि वहोत देवाचें ।
ध्यान; परी मन्मानस याचेंनि तुझेंच हो 'तदेवाचें[11].' ॥ ३९
सीता वदे, 'मलाही रुचला राघव शरत्सुधाकर[12] हा ।
परि हे तातपणस्मृतिसवत[13] वदे दाखवून धाक रहा. ॥ ४०
अतिमधुरमृदुलतनु हा रघुनंदन वज्रसार[14] हें चाप; ।
उचली कसा अशा गे! कां फसला घालुनी पणा बाप[15].' ॥ ४१
तों कथिलें, 'घ्या हें शिवधनु सगुण[16] हि भूपजन! करा; ज्यानें ।
करिजेल, तद्वधू ही सीता' हें स्पष्ट जनकराजानें. ॥ ४२
ऐकुनि तें वच पाहुन चंडहि कोदंड नृप विचारांत ।
पडले, किति किति म्हणती,'जाउं पळुन, तरि असे दिन, न रात'. ४३
किति वदति, 'अम्हां बांधुनि सीतावरणोत्सवें न दाव्यानें ।
अणिलें इथें हराया तेज[17], कशाचा विवाह, दाव्यानें. ॥ ४४
थकले ज्यास अणाया अनेक हस्त्यश्ववृषभकासर[18] हा ।
तें धनु सज्ज कराया नृप हो! कसतां कशास कास[19], रहा[20]. ॥ ४५

---

१. मुखकमल. २. आनंदा. ३. प्रसवे. ४. वीरासन—डावा गुडघा मोडून उजवा गुडघा वर करून जें बसणें तें. याचें लक्षणः—'एकं पादमथैकस्मिन् विन्यस्योरौ तु संस्थितम् । इतरस्मिंस्तथैवोरुं **वीरासन**मुदाहृतम् ॥.' ५. तेजोराशि. ६. कृष्णशरीर. ७. सडसडीत, सडपातळ. ८. महा+आराम=फार आनंद देणारा. ९. चंदनाची पूड ज्याच्या बाहुदंडाला चोपडली आहे असा. १०. सूर्यवंशभूषण. ११. मंगलाष्टकें म्हणतांना 'तदेव लग्नं सुदिनं तदेव' हा श्लोक म्हणतात हें प्रसिद्धच आहे. तदेवाचें हो=लग्न होवो. १२. शरदृतूंतील चंद्र. १३. ताताच्या पणाची आठवण हीच कोणी सवत ती धाक दाखवुनी 'रहा' (चूप रहा) असें वदे. १४. वज्रासारख्या कठिणांशानें भरलेलें. १५. तात, जनक. १६. गुण=धनुष्याची दोरी. १७. अभ्रू, मान, कांति, शोभा. १८. हस्ति+अश्व+वृषभ+कासर=हत्ती+घोडे+बैल+रेडे. १९. कास कसणें=कमर बांधणें, सज्ज होणें, कांचा मारणें, तयार होणें. हा शब्दसमूह कोशकारांनीं टिपून घेण्यासारखा आहे. २०. रहा=स्वस्थ रहा, चूप बसा.

सीतामिष करुनि पुढें घालूं पाहे धनुष्यभंग गळां ।
प्राण हराया; कळला जनकाचा बेत हा अम्हां सगळा.' ॥ ४६
किति वदती, 'सीतेस्तव काय म्हणुन हें धनू सजा[1], उचला, ।
पडली न वोस पृथ्वी, मिळेल दुजि स्त्री पुरास जाउं चला.' ॥ ४७
तो रावण नासीर[2]स्थित वाद्यग्रा[3]मं कडकडा गाजे, ।
तैं दचकले नृप तसे पशुहि न ते प्राप्त कडक डांगा[4] जे. ॥ ४८
अभिमुख[5] जाउनि मग त्या बैसविलें अणुनि यातुरायास[6], ।
सत्कारुनिहि नृप म्हणे, 'हार तसा लावुं या तुरा यास.' ॥ ४९
पडतां दृष्टि अकस्मात् दशवदनाचा विरूप काय[7] महा[8], ।
पळती[9] दडती मानुनि सीतेसह सर्व बायका यम हा. ॥ ५०
मग तद्गुरू[10] वदे, 'हा सीतार्थ अला स्वयें च, दे[11] यास, ।
जोड नृपा! सख्य[12], सुता कोणास तरी हवीच देयास[13]. ॥ ५१
परि जनकें सूचवितां मंत्रिमुखें ज्याधिरोप[14] दशवदनें ।
करुनि स्मयें[15] हि विस्मय केलीं प्रोत्फुल्लगल्ल दशवदनें[16]. ॥ ५२
बोले जनका, 'न कशी मत्कीर्ति अली श्रुतींत सुरसा[17]? रे! ।
कीं घातले दशमुखें जिंकुनि कारागृहांत सुर[18] सारे. ॥ ५३
म्यां तों शैलें[19] उचलिला सेश्वर[20] ही भूप जो नगामाजी[21], ।
मग या न कांबटावर शक्ति नृपा! चढल काय गा! मौंजी[22]? ॥ ५४
अणि सांगतों नृपा! हें धनु गुरुचें शंभुचें जरी नसतें, ।
तरि म्यां मघांच उचलुनि मोडुनही टाकिलें किं रे! असतें[23].' ॥ ५५

---

१. सज्य करा. २. सर्व सैन्यांतून शत्रूवर हल्ला करण्यास जें सैन्य पुढें जातें त्यास नासीर असें म्हणतात. ३. ग्राम=समूह. ४. गुरांना डाग देतात हें प्रसिद्धच आहे. ५. सामोरे. ६. राक्षसश्रेष्ठास. ७. शरीर, देह. ८. मोठा, अगडबंब. ९. येथें 'बायका' ह्या कर्त्यांचा दोन क्रियांशीं संबंध असल्यामुळें येथें 'कारकदीपक' अलंकार झाला आहे. १०. शतानंद नामक उपाध्याय. ११. सीता या रावणाला दे. १२. सख्य जोड=मैत्री प्राप्त कर. १३. कन्या ही परक्याला दिलीच पाहिजे. 'अर्थो हि कन्या परकीय एव तामद्य संप्रेष्य परिग्रहीतुः' असें वर्णन शाकुंतल नाटकांत आहे. [अभिज्ञानशाकुंतल–अंक ४ श्लो० २१.] १४. धनुष्य सज्ज करणें. १५. स्मय=हसणें. १६. दहा मुखें. १७. उत्तमा. हें कीर्तीचें विशेषण. १८. देव. १९. कैलास पर्वत. २०. ईश्वरासह, शंकरासह. २१. पर्वतांमध्यें. २२. हें **काव्यार्थापत्ति** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. २३. हें **संभावन** नामक अलंकाराचें उदाहरण आहे.

मग नृप वदे हंसुनि, ‘तुज आली येथेंच **रा**वणा! शंका ।
गुर्वपमानाचि नगोद्धारीं न वदतोस काय निःशंका’. ॥ ५६
मग रोष[1]भरें **रा**वण उचलूं धनुरुत्तमा[2] जंवर धांवे, ।
तों विघ्नार्थ **ह**राचे आरंभीं स्त्रीसमाज वर धांवे. ॥ ५७
लावुनि विंशति[3] भुजही कष्टें तेणें धनू उभें केलें, ।
परि गरिमगुणें[4] **रा**वणबला न गणुनी अनल्प[5] घे झोले. ॥ ५८
तितक्यांत तों, ‘उचलिलें धनु, द्या **सी**तेस, म्यांच शर्वाचें[6]’ ।
गर्वाचें सदन[7] वदे, तों होय म्लान तोंड सर्वांचें. ॥ ५९
परि त्या झोल न साहे, मग धनुसह भूतलीं अपटला, जें ।
दुःख न तें त्यास परी स्मितमुख भूभृद्गणा[8] निपट लाजे. ॥ ६०
**रा**वणगतितें पाहुनि सर्व नृपांच्या भरे उरीं धडकी[9], ।
रडकी होय मुखश्री, म्हणति, न ‘गति आज हो! दिसे धडकी[10].’॥ ६१
हृद्गत[11] धनु मग काढुन सावधही करुनि तोषवी राजा ।
त्या, अणि सचिवा सांगे, ‘उठिव अतां या अशेष[12] वीरां जा’. ॥ ६२
मग तैं सचिवें कथितां, ‘नृप हो! धनुला गुणास योजावें.’ ।
कथुनि निमित्या वदले, ‘न उठूं आम्ही तुम्ही पुढें जावें.’ ॥ ६३
ते नृपदशा विलोकुनि बोले **मि**थिलेश, तप्त रागानें, ।
‘राहो धनु हें ऐका नृप हो! सोडुनि तरी दरा गानें, ॥ ६४
राहो गुणाधिरोपण[13], परि एकहि भूप उचलुं ही न इला ।
शक्त धनुर्वल्लीला[14], झालि कशी हंत वीरहीन इला[15]. ॥ ६५
‘झाली निर्वीर धरा’ हें वच **रा**मा न शल्यसें साहे[16], ।
राहे विमनस्क[17] क्षण, आज्ञेच्छू मग गुरूकडे पाहे. ॥ ६६
‘द्या आज्ञा, या धनुतें उचलुन वोढुन गुणाहि चढवीन, ।
कढवीन हृदय रिपुचें, न वद कुवच हें नृपाहि[18] पढवीन. ॥ ६७

---

१. रागानें. २. धनुश्रेष्ठा. ३. वीस. ४. मोठेपणानें. ५. अनल्प=थोडे नव्हत=पुष्कळ, मोठे. ६. शिवाचें. ७. रावण. येथें **पर्यायोक्ता**लंकार आहे. ८. राजसमूहास. ९. उरीं धडकी भरे=भय वाटे. हा शब्दसमूह कोशकारांस उपयोगीं आहे. १०. बरी. ११. उरावर पडलेलें. १२. बाकीच्या, शिल्लक. १३. दोरी. १४. चापलतेला. लतेचा लवचीकपणा चापांत असतो या सादृश्यावरून चापलता, धनुर्वल्ली इत्यादि शब्द प्रचारांत आले आहेत. १५. पृथ्वी. १६. सहन होई. १७. दुःखी. १८. जनकालाही.

हें जीर्ण धनुष्य किती? न पुरल माझ्या बलास हे[1]मगिरी, ।
परि सा[2]नुकंप द्यावा गुरुजी! कर वरद हा मदीय शिरीं.' ॥ ६८
गुर्वाज्ञा मग घेउनि उचलाया चाप **राम** तो कौं[3]स ।
कसि, तें होय मुनिजना मु[4]द्भर तदधिक तदीय तो[5]कांस. ॥ ६९
मग दडपितां पदाग्रें अग्रीं **रामें** उभेंच तें राहे ।
धनु, म्हणती मुनि भासे [6]जाया मुनिचीच नीट हेरा हे. ॥ ७०
वांकवि वैरिमुखासह कीर्तिसहहि त्या गुणास मग जोडी ।
वोडी **सी**ताचित्तासह [7]**भृ**गुजाहंकृतीसहित मोडी. ॥ ७१
होतां भंग धनूचा कडकड भीम[8] ध्वनी जगीं पसरे ।
[9]घसरे **र**विरथ, विसरे **रा**मजपा **जान**की वरूहि सरे. ॥ ७२
मिटले डोळे, किटले [10]कांन जगाचे, समुद्रही अटले, ।
तुटलें नभ; तों फुटलें ब्रह्मांड, भयें झरे नगा सुटले. ॥ ७३
[11]भयाले दिग्गज, बोले नभ, मेले भीरु, भूमितल डोले, ।
झोले [12]अहिशिर, न्हाले, घर्मभरें लोकपति भया ल्याले. ॥ ७४
धनु [13]मातृहिंसकाच्या शिवलें तें बहुत [14]हस्तराजीवा ।
शुद्ध्यर्थ म्हणुनि [15]वाटे [16]**रा**मकरीं करुनि दे त्वरा जीवा. ॥ ७५
वधिले तद्योगें बहु नृप [17]**रा**में करुनि जित्व[18]राजीवा ।
शुद्ध्यर्थ म्हणुनि वाटे **राम**करीं करुनि दे त्वरा जीवा. ॥ ७६
जातां [19]पण सिद्धिस तो नृप **कौ**सल्यादि सर्व ज्या माता ।

---

१. मेरुपर्वत. २. सकृप. (अनुकंपा=कृपा.) ३. हाच शब्दसमूह मागें ४५ व्या गीतींत आला आहे. ४. मुद्+भर=आनंदातिशय. ५. बालकांस. ६. भार्या. ७. भृगुजाहंकृति=परशुरामगर्व. हें **'सहोक्ति'** नामक अलंकाराचें सुरेख उदाहरण आहे. ८. भयंकर शब्द. ९. यांतील **छेकानुप्रास** चित्तवेधक आहे. १०. हा प्रयोग कोशकारांनीं संग्रह करण्यालायक आहे. ११. यांतील **वृत्त्यनुप्रास** सुरेख आहे. १२. शेषाचें मस्तक. १३. आईला मारणारा (परशुराम) त्याच्या. १४. हस्तकमला. १५. ही **उत्प्रेक्षा** आहे. रामानें धनुष्याचा भंग केला असें नव्हे तर पापी रावणाच्या करस्पर्शानें जडलेल्या पापाच्या क्षालनार्थ चापानें आपला जीव रामाच्या स्वाधीन केला अशी कवीनें उत्प्रेक्षा योजिली आहे. 'वाटे' हा शब्द उत्प्रेक्षा-द्योतक आहे. 'मन्ये, शंके, ध्रुवं, प्रायो, नूनमित्येवमादिभिः । उत्प्रेक्षा व्यज्यते शब्दैरिवशब्दोऽपि तादृशः ॥' [दण्डीकृत काव्यादर्श—परिच्छेद २ श्लो० २३४.] १६. दाशरथि रामाच्या हातांत. १७. परशुरामानें अनेक क्षत्रिय मारले. १८. जित्वर+आजीवा=जयशील, यशस्वी +जीविका, उपजीविका, वृत्ति, वर्तन. १९. नियम.

अणवि दशरथाही कीं [1]हो राघव शास्त्रपूर्व [2]जामाता. ॥ ७७
मग आनंदें जनक स्वसुतेचा [3]सविधि हो! विवाह करी, ।
तैं वाटलें समस्तां पडली साक्षाद्रमा [4]विवाहकरीं. ॥ ७८
जातां विवाह अटपुनि राम स्वपुरास, होय हो! अडवा ।
कडवा बहु तो भार्गव, नृपकुलजलधीस मूर्त जो [5]वडवा. ॥ ७९
तैं रामातें सूचवि लक्ष्मण, 'ते कार्तवीर्यबाहु तरू ।
झाले यत्परशु[6]र्दवीं दशशतही त्वरित जेंवि बा! [7]हुत [8]रू. ॥ ८०
वधितां जेंवि [9]हरीनें [10]पंति कांपति बहु [11]करेणुकापोत ।
तेंवि नृपस्त्री म्हणुनी झाला जो एक रेणुकापोत. ॥ ८१
जेणें रुधिरक्षालित केलि करुनि भूमिभृद्रण [12]कुठार, ।
ज्याचाच ख्यात जगीं एक नृपति [13]शोणितारुण कुठार. ॥ ८२
तो हा गुरुधन्ववधक्षुभितमना पातला असे वाटे ।
जमदग्निसूनु तरि त्या साधुवचें लाव राघवा वाटे.' ॥ ८३
तो भंज्य[14]द्धनुरारवरुष्ट वदे भार्गवर्षि रामातें, ।
'वरिली कोणी शिवधनु मोडुनि [15]भांवर्गवर्षि' [16]रामा ते.' ॥ ८४

---

१. होवो. २. जांवई. ३. विध्युक्त. ४. विवाह=विष्णु (गरुडवाहन). ५. वडवाग्नि. समुद्रांत राहून त्याचें जल शोषण करणारा अग्नि. याची कथा अशी:—और्व नामक एक मोठा भार्गववंशोत्पन्न मुनि होता. त्यास असें कळलें कीं, कार्तवीर्यकुलोत्पन्न राजांनीं भार्गवसंततीचा उच्छेद करून आपल्या कुळांतील स्त्रियांस द्रव्यनिमित्त बहुत पीडा दिली. तेव्हां यानें त्यांच्या नाशासाठीं तपःप्रभावानें भयंकर अग्नि उत्पन्न केला. त्यामुळें क्षत्रियांस फार त्रास झाला, तेव्हां ते और्वपितरांस शरण गेले. नंतर पितरांच्या आज्ञेवरून और्वानें आपला कोपानल समुद्रांत टाकिला. यासच 'वडवाग्नि,' 'वडवानल' असें म्हणतात, कारण याचें मुख वडवे(घोडी)सारखें आहे. वडवाग्नीच्या उत्पत्तीविषयीं दुसरी कथा अशी आहे:—शिवाच्या भालनेत्रांतून निघालेला वह्नि, मदनाला जाळून, विश्वाचा नाश करूं लागला. या अग्नीपासून विश्वाचें संरक्षण करण्याकरितां ब्रह्मदेवानें त्याला वडवेचें (घोडीचें) रूप दिलें. वडवा वह्नीला घेऊन पितामह समुद्राजवळ गेले व लोकहितार्थ वडवेला आपल्याजवळ ठेवण्यास त्यांनीं समुद्रास सांगितलें. अग्नि जरी समुद्राचा स्वाभाविक शत्रु होता तरी समुद्रानें लोकहितार्थ पितामहाचें म्हणणें कबूल केलें व वडवानलाला आपल्याजवळ जागा दिली. (कालिकापुराण—अध्याय ४१ पहा.) ६. दव=अग्नि. ७. ज्वलित. ८. कापूस. ९. सिंहानें. १०. यूथपति. ११. हत्तिणीचे बच्चे. १२. पृथ्वी. १३. शोणित=रक्त. १४. भंज्यत्+धनुर्+आरव+रुष्ट=मोडलेल्या धनुष्याचे आवाजानें रागावलेला. १५. कांतिसमूहाची वृष्टि करणारी, अत्यंत तेजःपुंज, अतितेजस्विनी, विभ्राजमाना. १६. स्त्री, भार्या.

**राम** म्हणे, 'धनु मोडे मत्करयोगें स्वयेंच किडकें कीं ।
नसतां [1]मंतु वदाया **गरु**डाही धरिल काय भिड [2]केकी? ' ॥ ८५
'रे! भंगिलेंस **रामा**! [3]स्र्यर्थ **शि**वधनू न तें [4]अघ स्मरतां ।
परि जाण म्यां न धरिली अजुनी क्षत्रियकुलीं [5]अघस्मरता.' ॥ ८६
**राम** वदे, 'ते च न या द्विजभंगद शक्ति **भार्ग**वा! **रामीं** ।
होइल तें हो, हा तव परशूद्धृत भुजगमार्ग वारा मी.' ॥ ८७
मग मुनि बोले, 'कोपुनि घे नव मच्चाप **राम**! हा मोड ।
मग तुज म्हणेन **रा**घवकुलांत रिपुवातसह महा मोड[6].' ॥ ८८
मग तेंहि धनू चढवुनि दावाया **रा**घव प्रताप [7]संतां ।
ईशत्व हरी मग तो अवलंबी **भृ**गुज विप्र तापसता. ॥ ८९
मग तो निर्विघ्नपणें [8]सवधू श्री**राम** पावला गांवा, ।
गींवा ध्यावा वाटे हाचि मला सत्स्वभाव लागावें[9]. ॥ ९०

---

# [11]चतुरसाबाजीकृत

## ७. [12]बलिदानकथा.

(श्लोक.)

[13]प्रऱ्हादपौत्र बलिराज महा प्रतापी, जो दानशूर वचनीं न फिरे कदापी, ।

---

१. अपराध. २. मोर. हें अर्ध सुभाषितरूप आहे. ३. स्त्री+अर्थ=बायको मिळविण्यासाठीं. ४. पाप. ५. घातुकपणा. ६. अंकुर. ७. साधुजनांला. ८. स्त्रीसह, भार्यैसह. ९. येथें 'दामयमक' आहे. १०. 'इति श्रीज्योतिर्विद्राजजीवसूनुचिंतामणिविरचितः सीतास्वयंवरः समाप्तः' असा अंतिम लेख आहे. यावरून हें काव्य 'चिंतामणिकृत' असावें असें वाटतें. ११. ह्या कवीचें नांव साबाजीराव. ह्याच्या बापाचें नांव विश्वनाथ. हे चतुर असल्यामुळें लोक यांस 'चतुरसाबाजी' असें म्हणूं लागले. हे पुण्यास पेशव्यांच्या पदरीं होते. त्यांची दृष्टी मंद होऊन ते जेव्हां आपल्या गांवीं जाऊन राहिले, त्यावेळीं त्यांनीं आख्यानें व पदें वगैरे पुष्कळ कविता करून लिहवून ठेविली होती. ह्या कवीनें केलेलें 'रावणगर्वपरिहार' हें आख्यान व चार पदें आमच्यापाशीं आहेत. आणखी कविता मिळविण्याचा शोधकांनीं प्रयत्न करावा. अकबरबादशाहाच्या पदरीं कोणी चतुरसाबाजी नांवाचा पुरुष होता. तो ह्या साबाजीहून भिन्न समजावा. १२. प्रऱ्हादाचा पौत्र बळी यानें दैत्यकुलगुरु शुक्राचार्य यांच्या साहाय्यानें विश्वजिन्नामक याग करून इंद्राचें पद बळकाविलें. तें त्यास परत देण्यासाठीं श्रीविष्णूंनीं वामनरूप धारण केलें आणि बटुवेषानें बळीपासून यज्ञ करीत असतां त्रिपादभूमिदानाचें उदक स्वहस्तीं घेतलें. बळीनें उदक सोडतांच वामनानें विराटरूप धारण करून एका पावलांत पृथ्वी

राजे समस्त करभार तयास देती, ऐका तुम्ही कथन हें बरवें सुचित्तीं. ॥ १
पृथ्वी समुद्रवलयांकित जिंकुनीयां, रत्नें अपार धनकांचन[1] आणुनीयां ।
यागासि सिद्ध करुनी तिरिं नर्मदेच्या, ऋत्वीज[2]श्रेष्ठ करिती स्वाहा आहुतीच्या. ॥ २
बळीं यज्ञ[3] हा सिद्ध होतांचि जाणा, सुरेंद्रापदीं[4] मुख्य होईल राणा[5], ।
असें जाणुनी श्रीहरीसी विनंती, करी शक्र येवोनियां म्लानचित्तीं. ॥ ३
कृपाळू घनश्याम[6] सांगे तयासी, 'तुम्ही आपुल्या स्वस्थ जावें स्थलासी; ।
चमत्कार होईल जो यागस्थानीं, विलोकीतसा बैसुनीयां विमानीं.' ॥ ४

(मत्तगयंदवृत्त.)

यावरि ते क्षणिं वामनरूप[7] धरूनि हरी बटुब्राह्मण झाला,
तेज न साहे जसें रविमंडल पाहति विप्र किं सूर्य उदेला[8], ।
दंड कमंडलु कौपिन मेखला[9] पादुका, तोडर वाजति पायीं,
ठेवुनि आहुती तटस्थ पाहाति मौनपणें बलिराजसभा ही. ॥ ५

(श्लोक.)

चिमणा[10] वेशें[11] धरूनियां यदुपती यागाचिया मंडपीं
आला पाहुनियां विरोचनसुतें बद्धांजळी साक्षपीं. ।
प्रार्थोनी हरिला करीं धरुनियां सिंहासनीं बैसवी,
आनंदें करि अर्घ्य[12] पाद्य सुमनें गंधाक्षता तोषवी. ॥ ६

---

आणि दुसऱ्या पावलांत आकाश व्यापून, तिसरें पाऊल बळीच्या मस्तकीं दिलें आणि त्यास पाताळीं लोटिलें. ही कथा श्रीमद्भागवत—स्कंध ८ अध्याय १६-२३ यांत वर्णिली आहे. प्रस्तुत आख्यान बरेंच सुरस आणि सुबोध आहे तरी त्यांत कोठें कोठें छंदोभंग, रूपभ्रंश, स्वरलोप इत्यादि अग्राह्य प्रकार आढळतो, त्यामुळें काव्याची योग्यता कांहींशी उतरली आहे. याच कथानकावर वामनपंडित व विठ्ठल यांची कविता आहे. १३. नातू. प्रऱ्हादाचा पुत्र विरोचन—त्याचा पुत्र—बली.

१. सोनें. २. कुलाचार्य, कुलगुरु. ३. विश्वजिन्नामक याग. ४. सुरेंद्राच्या स्थानीं. ५. राजा. ६. विष्णु. ७. नीचरूप, क्षुद्ररूप. वामन=नीच, ठेंगणा. ८. उदय पावला. ९. कमरपट्टा. मेखला हा कमरेचा दागिना आहे. कमरेच्या दागिन्यांचीं नांवें:—"कांची—सोन्याची एकसरी सांखळी, मेखला—सोन्याची आठपदरी सांखळी, रसना—षोडशपदरी कटिवेष्टण, कांचिदाम—चार बोटें रुंदीचा गोंडे व गुंग्रु असलेला सोन्याचा पट्टा. (देशी हुन्नर—पृष्ठें ४९-५०.) १०. बटु, लहान, वामन. ११. रूप, पोशाख. १२. अर्घ्य=या शब्दाची व्याख्या आढळते ती अशी:—(१) आपः क्षीरं कुशाग्रं च दधि सर्पिः सतंडुलम् । यवः सिद्धार्थकश्चैव अष्टांगोऽर्घ्यः प्रकीर्तितः ॥ [तंत्रग्रंथ.] (२) आपः क्षीरं कुशाग्राणि घृतं मधु तथा दधि । रक्तानि करवीराणि तथा रक्तं च चंदनम् । अष्टांग एष अर्घ्यो वै

पूजा सांग[1] करोनियां म्हणतसे, इच्छीतसां जें मनीं
 मागा, देइन दक्षिणा प्रितिकरें[2], शंका नसावी मनीं.' ।
ऐसें ऐकुनि श्रीहरी म्हणतसे, 'त्रीपाद भूमी[3] जरी
 देशी दान, करोनि सत्य वचना, होईल कीर्ती बरी'. ॥ ७
बली हासुनी काय बोले तयासी, 'त्रिपादा भुमी काय गा! मागतोसी? ।
जरी देश किंवा तरी ग्राम[4] मागा, नसे न्यून भांडारखाना तुझा गा!' ॥ ८
असें ऐकुनी शुक्र बोले बलीसी, 'नव्हे विप्र हा काय गा! भूललासी? ।
महाविष्णु हा नाटकी द्वैत[5] पोटीं, त्रिपादांमधें तीन लोकांस आटी[6].' ॥ ९
शुक्रातें बलिराज सांगत असे, 'ज्या कारणें यज्ञ हा
 तो हा ब्राह्मणवेशधारण करी आश्चर्य कैसें पहा! ।
विश्वाचा जनिता असोनि भिकणें[7] मागावया पातला,
 'नाहीं' हें म्हणणें उचीत न दिसे पाहोनि सांगा मला. ॥ १०
जन्मापासुनि सत्वधीर वचनीं नाहीं कदा भ्रष्टलों[8],
 आतां लोभ धरोनि वाक्य फिरतां दोहींकडे मूकलों. ।
प्रारब्धीं[9] विधिनें असेल लिहिलें तेंही कदा नांटळे[10]
 आतां निश्चय एक हाचि धरणें विष्णूपदासी बळें.' ॥ ११

(सवाई.)

ऐकुनि श्रीहरि बोलतसे, 'मज कांचनद्रव्याचें कारण नाहीं,
 त्रीपदभूमिसि बांधुनियां मठ राहिन स्वस्थ मि येथ सदाही. ।
धार्मिक तूं वचनासि खरें करिं, पावशि उत्तमलोक, बढाई
 सांगति दुष्ट तुला जरि ऐकसि लंडिपणा तुज येइल भाई!'॥ १२
टाकुनि वामनरूप धरीत विशाळस्वरूप कुणासि कळेना,
 तेज जसें शतसूर्यप्रभा[11] पडे यापरि अंबरिं[12] दृष्टि ठरेना; ।
.....................................................
पाहुनि कुंठित होति सुरासुर धाक पोटीं पडे कांहीं सुचेना. ॥ १३

---

भावने परिकीर्तितः ॥ (काशीखंड), (३) रक्तबिल्वाक्षतैः पुष्पैर्दधिदूर्वांकुशैस्तिलैः । सामान्यः सर्वदेवानामर्घ्योऽयं परिकीर्तितः ॥ (देवीपुराण).

१. विध्युक्त, षोडशोपचारयुक्त. २. प्रीतिपूर्वक. ३. तीन पावलें पृथ्वी. ४. गांव. ५. दुजाभाव, दुटप्पीपणा, कपट. ६. भरी, पूर्ण करी. ७. भिक्षा. ८. चळलों. ९. दैवीं. हा चरण सुभाषितरूप आहे. १०. टळत नाहीं. ११. कांति, तेज. १२. आकाशांत. ('अंबरं व्योम्नि वाससि' इत्यमरः, 'अंबरं वाससि व्योम्नि कार्पासे च सुगंधके' इति विश्वः.)

(श्लोक.)

बलीराज आज्ञा करी सेवकांसी, 'तुम्ही जाउनी बोलवा राणियेसी.' ।
त्वरें धांवती सांगती राजदूत, स्वयें सांगती राणियेसी वृ[१]तांत. ॥ १४
सखी पातली घेउनी रत्नझारी, म्हणे, 'राजया! सर्व चिंता निवारीं, ।
करा सत्य संकल्प, सोडूनि पा[२]णी, भला लाभ हा जोडिला च[३]क्रपाणी.' १५

(सवाई.)

यावरि राजपुरोहित आणुनि पूजितसे बटुवामनराया
त्रीपदभूमिसि दान देऊनियां संकल्प सोडितसे नृ[४]पजाया, ।
भा[५]र्गव जाउनि झारिमुखीं बसे गुप्तपणें जलबिंदु पडेना
आश्चर्य पाहाति लोक समस्तहि कृत्रिम वर्म कुणासि कळेना. ॥ १६

(श्लोक.)

शुक्राची करणी हरीसी कळुनी झारीमुखीं दर्भ हा
टोंचीतां नयनासि लागुनि फुटे ता[६]त्काळ तोनेत्र हा. ।
झारीचें मुख मोकळें दिसतसे पाणी पडे तेक्षणीं,
झाला जयजयकार, देव सु[७]मनें वर्षीति स्वर्गींहुनी. ॥ १७

वीशाळरूप हरिनें धरुनी प्रचंड, एके पदें त्वरित आटुनि स्वर्गखंड, ।
दू[८]जा पदासि मग ठेविच मृत्युलोकीं, एका पदासि अ[९]वनी न दिसे विलोकीं. ॥ १८
मग पुसे जगदीश बलीप्रती, 'त्रितियपाद रि[१०]तीं न दिसे क्षितीं' ।
बलि म्हणे, 'पद मस्तकिं ठेवुनी, भरुनि घ्या अवघी पदमे[११]दिनी.' ॥ १९
बलीचे शिरीं पाद ठेवी मुकुंद, तळीं दडपितां विवरद्वारें प्रसिद्ध ।
बली दृढ धरी चरण त्या श्रीहरीचे, कृपा उपजुनी राज्य दिल्हें त[१२]ळींचें. ॥ २०

---

१. वृत्तांत, वर्तमान. २. जळ सोडणें=पाणी सोडणें=त्याग करणें, सर्वस्वी सोडून देणें. [कोणतेंही कृत्य केलें असतां, त्या देय पदार्थावरील दात्याची स्वत्वनिवृत्ति व्हावी म्हणून जळ सोडण्याचा प्रचार आहे त्यावरून जळ सोडणें म्हणजे सोडून देणें असा अर्थ निष्पन्न झाला.] ३. कृष्ण. 'चक्रपाणि' हें तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहिसमासाचें उदाहरण आहे. ज्या वर्णिलेल्या गुणाचें संविज्ञान (चिन्ह, खूण) ज्याच्या विशेष्यांत नित्य सांपडतें तो 'तद्गुणसंविज्ञान' बहुव्रीहि समास होय. येथें हातांत चक्र असणें हा जो गुण सांगितला तो कृष्ण या विशेष्यांत नित्य आढळतो. बहुव्रीहि समासाच्या दुसऱ्या प्रकारास 'अतद्गुणसंविज्ञान' असें म्हणतात. ४. राजभार्या. ५. शुक्राचार्य. ६. तत्क्षणीं. ७. पुष्पें. ८. दुसरा. ९. पृथ्वी. १०. रिकामा. ११. पृथ्वी. १२. पाताळाचें.

**ब**ली भाक मागीतसे श्रीहरीसी, 'तुम्ही राहवें सर्वदा या स्थलासी.' ।
महाभक्त तो जाणुनी वेषधारी, तिथें रा[1]हिला अक्षयी राजद्वारीं. ॥ २१

### उपसंहार.

(श्लोक.)

**ब**लीचें आख्यान श्रवण अथवा पाठ करिती
तयाच्या पुण्याला दुसरि उपमा नाहिं जगतीं. ।
**ब**लीच्या वंशींचे त्रि[2]पुरुष महा भक्त जाहले
तयासाठीं दैवें त्वरित द्वै[3]य अवतार धरिले. ॥ १
म्हणे **वि**श्वनाथसुत परम आनंद भरुनी
अशा भक्तापाशीं निशिदिनिं रहा पाय धरुनी. ।
तयाच्या संसर्गें सकळ तुमचे दोष हरती
हरी संतोषोनी देइल सकलां उ[4]त्तमगती. ॥ २

---

## अनामकविकृत

## ८. [5]सत्यभामाविनोद.

(ओंव्या.)

रात्रीचे अवसरीं । **भा**मा होती गे! [6]मंदिरीं ।
येतां देखोनि श्रीहरी । कवाड झांकी. ॥ १
नवल हा पैं विनोद । **कृ**ष्ण**भा**मा अनुवाद ।
ऐकती त्यां परमानंद । श्रवणीं सुख. ॥ २

---

१. विष्णूनें बलिराजाचें पाताळांत द्वारपालत्व स्वीकारलें—अशी कथा आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वर—रामायण—उत्तरकांड—श्लो० १५८-६२ पृ० १२१.] २. प्रऱ्हाद, विरोचन व बली. ३. नृसिंह व वामन अवतार. ४. कैवल्य, मुक्ति. ५. संस्कृतामध्यें "अंगुल्या कः कपाटं प्रहरति?' 'कुटिले! माधवः' 'किं वसंतो?' 'नो चक्री' 'किं कुलालो?' 'नहि, धरणिधरः.' 'किं द्विजिव्हः फणींद्रः?' । 'नाहं घोराहिमर्दी' 'किमपि खगपति?' 'नों हरिः' 'किं कपींद्रो?' इत्येवं सत्यभामाप्रतिवचनजितः पातु वः पद्मनाभः ॥" असा एक प्रश्नोत्तररूप मंगलवाचक सुभाषितपर श्लोक आहे त्याचें हें प्रकरण भाषांतर आहे. याच विषयावर कविता 'लघुकाव्यमाला—भाग १—पृ० ७३-७५ यांत छापली आहे. ६. मंदिर=बैठक, महाल, दिवाणखाना. ['**मंदिरं** नगरेऽगारे मंदिरो मकरालये' इति विश्वः.]

हरी उभा ठाकोनि द्वारीं । [1]बोटें प्रहरण करी ।
भामा म्हणे, 'तूं कोण? रात्रीं । लोटीसी द्वार?' ॥ ३
'[2]कंदर्पाचा जो सारथी । [3]माधव जाण निर्गुती ।
बहु नेट नेटलों क्षिती । तोचि मी जाण.' ॥ ४
'हेमंत नाहीं सरला । वसंत कोठुनी आला? ।
जाईं जाईं तूं गा! वहिला । [5]नुंवडीं दार.' ॥ ५
'सत्य ऐकें गे! सुंदरी! । जो मी जनां सुखकारी ।
तोचि मी गे! तुझे द्वारीं । [6]चक्री मी जाण.' ॥ ६
भामा बोले पैं टवाळ, । 'चक्र धरितो को[7]ल्हाळ ।
तुज मज नाहीं बोल । जाईं तूं परता.' ॥ ७
पुन्हा बोले यदुवीर, । 'जाणें मी गे! [8]महीधर ।
भामा म्हणे तूं [9]फणीवर । चाटिसी जिव्हा.' ॥ ८
'सत्य ऐकें गे सुंदरी! । [10]भुजंग मी संहारीं.' ।
'[11]खगपती तूं गा! निर्धारी.' । म्हणती भामा. ॥ ९
पुन्हा बोले रमावर, । 'नव्हे मी [11]खगेश्वर ।
[12]हरी मी गे! साचार । तुझिये द्वारीं.' ॥ १०
'वानर तूं [13]निर्धारी । वास तुझा वृक्षावरी ।
जाईं जाईं वनांतरीं । येथोनि आतां.' ॥ ११
[14]शशांकवदना वंदोनी । झडकरी उठोनी ।

---

१. बोटानें. [दार ठोठावी.] २. मदनाचा वसंत हा जिवलग मित्र होय. कोणत्याही पुरुषाला आपल्या जाळ्यांत ओढावयाचें असलें तर मदन वसंतासह त्याच्याकडे जातो अशी समजूत आहे. शंकराला कामातुर करण्यास जेव्हां मदन गेला होता तेव्हां त्यानें आपणास साहाय्य करण्याकरितां येण्याची वसंतास विनंति केली होती असें कुमारसंभवांत आहे. ३. माधव=(१) वसंत, (२) कृष्ण. ४. खरोखर. ५. न+उघडीं=उघडीत नाहीं. [येथें 'न' मधील 'अ'काराचा लोप म्हणजे परसवर्ण झाला आहे. अशा रीतीनें 'न' मधील 'अ' नाहींसा झाल्याचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतात.] ६. ज्याच्या हातीं चक्र आहे तो. (कृष्ण, कुंभार.) ७. हा 'कुलाल' शब्दाचा अपभ्रंश आहे. ८. राजा; (पक्षीं) सर्प, शेष. ९. सर्प-श्रेष्ठ, शेष. १०. सर्प. ११. गरुड. १२. कृष्ण; (पक्षीं) वानर. ['हरिश्चंद्रार्कवाताश्वशुकभेकयमाहिषु । कपौ सिंहे हरेऽजेऽंशौ शक्रे लोकांतरे पुमान् ॥' इति मेदिनी.] १३. खरोखर, निश्चयपूर्वक. १४. शशिमुखी.

द्वार उघडिलें धांवोनी । लागली पायीं[1]. ॥ १२

स्तवन करीतसे भामा, । 'अगा! ये गा! पुरुषोत्तमा[2]! ।

शिणलासी तूं मेघश्यामा! । एवढा वेळ.' ॥ १३

'सत्यभामे! चिटवाळे! । सज्जनासी सोवाळे ।

भवगुणें प्रारब्ध लोळे । कमलापती.' ॥ १४

---

## कृष्णानंदनिमग्नकृत[3]

### ९. राधाविलास[4].

(गीतिवृत्त.)

'राधाविलास' गाऊं वंदुनि भावें तदीय पायांस ।

आयास सर्व सांडुनि सेवूं हरिप्राप्तिच्या उपायास. ॥ १

एके दिवशीं गेली श्रीराधा नंदभाजसदनासी[5] ।

आनंदलि अवलोकुनि शरदिंदीवरसुहास्यवदनासी. ॥ २

---

१. पायीं लागणें=पाय धरणें, शरण येणें, वंदन करणें. हा शब्दसमूह कोशकारांनीं टिपून ठेवण्यायोग्य आहे. २. कृष्ण, नरोत्तम, पुरुषश्रेष्ठ. ३. कवीचें नांव समजत नाहीं. कवीनें आपणास 'कृष्णानंदनिमग्न' असें विशेषण लावून घेतलें आहे यावरून हा कृष्णभक्त असावा, असें दिसतें. ४. या काव्यांत वृषभानुकन्या राधा आणि भगवान् श्रीकृष्ण यांच्या विलासाचें वर्णन केलें आहे म्हणून याला 'राधाविलास' असें अन्वर्थक नांव दिलें आहे. या काव्यांत कृष्णाचें यौवनधारण, राधाकृष्णविलास, विपरीतनिधुवन, राधापति अनया याचें स्वगृहागमन, राधेची धांदल, कृष्णप्रार्थना, त्याचें बालरूप धारण, राधा व अनया यांचें संभाषण इत्यादि विषय सुरस वर्णिले आहेत. याच कथानकावर वामनपंडितांनीं कविता केली आहे. [वामनपंडितकृत कवितासंग्रह–भाग २–पृष्ठ १-१३ पहा.] ५. नंद+भाज+सदनासी=यशोदेच्या घरीं. येथें 'पर्यायोक्त' नामक अलंकार झाला आहे. याचें लक्षणः—(१) ध्वनिताभिधानं पर्यायोक्तिः' असें 'काव्यानुशासन' नामक अलंकारग्रंथांत आहे. [काव्यमाला ४३, काव्यानुशासन–पृ० ३६], (२) 'गम्यस्यापि भंग्यन्तरेणाभिधानं पर्यायोक्तम्' [काव्यमाला ३५, अलंकारसर्वस्वम्–पृ० १११], (३) 'प्रकारांतरमाश्रित्य तद्विवक्षितवस्तुनः। सुचारु कथनं यत्र पर्यायोक्तं तदिष्यते. ॥ [मंदारमरंदचंपू–व्यंग्यबिंदु १०–श्लो० १०८.] मोरोपंतांच्या कवितेंत या अलंकाराचीं शेंकडों उदाहरणें आढळतातः–(१) हाय! कवी तोहि म्हणे ज्याच्या मातेसि शंभुसायक वी. ॥ [आदिपर्व–अध्याय २३ गीति ३६], (२) अवतरला उतराया जो दुःसह दुष्टभार महिवरला । अहिवरलास्यपटु प्रभु करुणोक्तें द्वारकेंत गहिवरला. ॥ [सभापर्व–

सर्वज्ञ प्रभु जाणे राधेच्या भक्तिरससदोघास[1] ।
ध्याया घांस विसरला; लागे अन्योन्य वेध[2] दोघांस. ॥ ३
माय यशोदा बोले, 'काय मुकुंदा[3]! उगाच पाहासी? ।
जेवीं झरझर, चर्वण करिं बा! ताकामधें च लाह्यांसी.' ॥ ४
चळला[4] जेंवि नं[5] राहे, दावी मग ऋक्षवृक्षखगथारे[6] ।
पारावतशुकपिकबकुकलहंसहि पाहुनी न हरि थारे[7]. ॥ ५
राधेसि म्हणे, 'घे गे! पाहूं दे तुजकडेस येतो का?' ।
आनंदूनि करें कर धरि उचलि झणी उरस्थळीं तोका[8]. ॥ ६
'छळिलें' म्हणे यशोदा, 'तुजजवळी हा अमंद[9] हंसतो कीं ।

अ० ५ गी० ८०], (३) केलेंचि धन्य दर्शनदानें येऊनि कानना, मातें, । अजि! देवेश! निवावे बहु हे सेवूनि कान नामातें. ॥ [वनपर्व–अ० १३ गी० ५५], (४) त्वद्बंधूंचीं झालीं युगपत् शून्योत्सवें महागेहें, ॥ [विराटपर्व–अ० १ गी० १७८], (५) जेणें किरातरूपी प्रभुसीं केला प्रसिद्ध बाढ कली । तो मजकडे स्वपादें कांचनमय पादपीठ बा! ढकली. ॥ [उद्योगपर्व–अ० ५ गी० ६], (६) ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दररक्तचक्षुच्या पातें । तो तूं आंगें मारूं पाहसी मज दावुनि प्रतापातें. ॥ [भीष्मपर्व–अ० १० गी० १०२], (७) ज्याच्या श्रीपददास्यें पावे तोखा सदा रमा जाया । हरि तो मना नराचा होउनि तो खासदार माझा या. ॥ [द्रोणपर्व–अ० १० गी० ४४], (८) योगीश्वरसा साक्षात् जो पाहे सर्व संजय ज्ञानी । तो ये पुरासि चिंतित जें गावें पादकंज यज्ञांनीं. ॥ [द्रोणपर्व–अ० १ गी० २], (९) नेतें भवाब्धिच्या जें धात्यासि पलीकडील कांठीं तें । श्रीमुख रागें पाहे ती घालुनि भोंवयांत गांठीं तें. ॥ [हरिवंश–अध्याय २६ गी० ६८], (१०) बा! त्वत्प्रताप हरितो तम सर्वहि जेंवि नाथ दिवसाचा. ॥ [ब्रह्मोत्तरखंड–अ० २ गी० २८]. ६. शरत्+इंदीवर+सुहास्य+वद नासी=शरदृतूंतील कमलाप्रमाणें उत्तम हास्ययुक्त वदन ज्या कृष्णाचें होतें त्यास पाहून.

१. भक्तिरसाच्या सत् (उत्तम) ओघास. २. वेध लागणें=ध्यास लागणें. हा शब्दसमूह कोशकारांस उपयोगी आहे. ३. कृष्णा! [भक्तांस मुक्ति देतो, म्हणऊनि मुकुंद नाम हें त्याला । नामार्थदीपिका.] ४. चित्त अस्थिर झालें. ५. 'न' या पदाचा काकाक्षिगोलक-न्यायानें 'जेवि न' व 'राहे न' असा संबंध लाविला पाहिजे. ६. आश्वल+झाडें+पक्षी+समूह. ७. स्थिर न होई, शांतचित्त न होई. ८. बालका, कृष्णा. ९. हळू नव्हे, मोठ्यानें. ['अ' हा आगम (१) सादृश्य, (२) अभाव, (३) भेद, (४) अल्पता, (५) अप्राशस्त्य आणि (६) विरोध इतक्या सहा अर्थांचा बोधक आहे म्हणून सांगितलें आहे. ह्या अर्थांचीं उदाहरणें:—(१) अब्राह्मण, अभिक्षु, (२) अज्ञान, अक्रोध, अनंग, (३) अपट, (४) अनुदरा (कृशोदरी, तनुमध्यमा), (५) अकाल, अकार्य. (६) अनीति, असित, असुर. या सर्व अर्थांचा समावेश पुढील पद्यांत आहे:—['तदसादृश्यमभावश्च तदन्यत्वं तदल्पता । अप्राशस्त्यं विरोधश्च नञर्थाः षट् प्रकीर्तिताः ॥.']

[1]राधामुखचंद्राची [2]कृष्णचकोरासि काय रुचि तोकीं.' ॥ ७
खेळवुनी कांहींसा बोले, 'या नंदनासि घ्या, मामी! ।
[3]कांत घरासी आला असेल, जातें स्वकीय [4]धामा मी.' ॥ ८
राधेपासुनि माता घे, स्तन देतांचि एकदां पीत ।
[5]चळला, पुनश्च वळला, यालागीं नंददार [6]दापीत. ॥ ९
'फार खवळला राधे! काय करावा उपाय? राहील ।
कैसा? आतां वाटे घेतां तूं तुजकडे न पाहील.' ॥ १०
'ये' राधिका म्हणे, उडि मातेपासून नंदसुत टाकी, ।
गगनांतुनि [7]हंस जसा उतरे [8]मानसतडागसुतटाकीं. ॥ ११
'झाल्या उशीर, मत्पति आल्या [9]तोंडील आजि मज माये! ।
[10]स्वल्पहि अंतर पडतां क्रोध मनीं मग कदापि न समाये.' ॥ १२
सांगे [11]व्रजेश्वरी तिस, 'निजसदनांला मुकुंद ने, जा, गे! ।
मागेल कांहिं तरि दे, चपळाच्या रक्षणीं सये! [12]जागें. ॥ १३
कोपेल कांत जरि, तरि एथिल हें वृत्त जाहलें सांग ।
कृष्णासि खेळवूनी करितां गृहकृत्य ही घडे [13]सांग.' ॥ १४
आनंदमूर्ति [14]योगिध्येया राधेसि लाधली [15]ठेवी, ।

---

१. येथें राधेच्या मुखाशीं चंद्राचा अभेद कल्पिला आहे व कृष्णाचा चकोराशीं अभेद कल्पिला आहे, म्हणून येथें **'रूपका'**लंकार झाला आहे. २. चकोरपक्षी चंद्रकिरणपान करून उपजीविका करितो असा समज आहे. याविषयीं 'जोत्स्ना पेया चकोरैः' इति सुभाषित प्रसिद्धच आहे. चकोर=या शब्दाचा विग्रह असा आहे:—'चकति चंद्रामृतपायित्वाद्विषं प्रतिहंति, चक् तृप्तौ प्रतिघाते च चकोरः । चकति तृप्यते ज्योत्स्नाया इति **चकोरः** ॥ इति स्वामी' [काश्मीरमहाकविश्रीजगद्धरभट्टकृत स्तुतिकुसुमांजलि—पृष्ठ १२३ स्तोत्र ९ वें, श्लोक ४९ राजानकरत्नकंठविरचित टीका.] ३. भ्रतार (अनया). ४. गृहा. ५. 'चळला' व 'वळला' या दोन क्रियांचा संबंध 'हरि' या एक कर्त्यासीं असल्यामुळें येथें **'का**रकदीपक' अलंकार झाला आहे. ६. रागावे, दटावी. ७. पक्षिविशेष. [**'हंसो** विहंगभेदे स्यादर्के विष्णौ हयांतरे । योगिमंत्रादिभेदेषु परमात्मनि मत्सरे ॥' इति विश्वः, 'खगयोगिभिदो**र्हंसो** निर्लोभनृपसूर्ययोः । विष्णौ प्राणे चात्मनि च' इति मङ्खः.] ८. मानससरोवरीं वास करणें हंसांस फार आवडतें असा कविसंकेत आहे. मानस+तडाग+सु+तटाकीं=मानससरोवराच्या उत्तम कांठावर. ९. रागावेल, मारील. १०. थोडेंसें न्यून पडतां. ११. यशोदा. १२. दक्ष अस. १३. यथास्थित, विध्युक्त, सांगोपांग. १४. योग्यांनीं ध्यान करण्यास उचित. १५. निधि, ठेवा, खजिना.

नेउनि निजसदनाला शयनस्थळिं मंचकावरी ठेवी. ॥ १५
स्थिर चित्त तिचें झालें, निरीक्षितां [1]कोटिकामकमनीया ।
मदनें विव्हळ होउनि बोले, 'ऐसा [2]रुचे [3]वैर मनीं या.' ॥ १६
अनुपम सुकांत परि हा रतिरस नेणेचि [4]कीं [5]युवा नाहीं ।
तरणें [6]विलाससिंधुस युवनौकेनें घडे न यानांहीं.' ॥ १७
[7]राधापूर्वाराधन जाणुनि [8]सर्वज्ञ लागला वाढूं ।
जो कां [9]प्रणतसुरद्रुम इच्छित राधेस [10]कामफल वाढूं. ॥ १८

---

१. कोटिमदनाप्रमाणें सुंदर कृष्णाला पाहून. २. आवडे. ३. भ्रतार, पति. ४. कारण. [**कीं** हें अव्यय विकल्प, प्रश्न, आधार(कारण) इत्यादि अर्थ दर्शवितें.] ५. तरुण. ६. विलाससिंधुस युवनौकेनें तरणें घडे, यानांहीं न [घडे]–असा अन्वय. येथें **उ**पमालंकार आहे. ७. राधेनें पूर्वजन्मीं केलेलें ईश्वराराधन. ८. सर्वज्ञ हें नांव **वि**ष्णुसहस्रनामांत विष्णूला दिलेलें आहे. ['सर्वहि जाणे यद्वा सर्वज्ञ असूनि जाणता जो कीं । यास्तव **स**र्वज्ञ असें नाम तयालागिं जाहलें लोकीं.' ॥ ५३ ॥ [नामार्थदीपिका–पृ० ५१] सर्वं जानातीति सर्वज्ञः.] या अर्थात 'सर्वज्ञ' हें पद साभिप्राय आहे म्हणून येथें '**प**रिकरा'लंकार झाला. याचें लक्षणः–(१) 'विशेषणसाभिप्रायत्वं परिकरः' [काव्यमाला ३५, अलंकारसर्वस्व–पृ० ९४], (२) 'साभिप्रायविशेषणैरुक्तिः परिकरः' [काव्यमाला ४३, काव्यानुशासन–पृ० ४२], (३) विशेषणैर्यत्साकूतैरुक्तिः परिकरस्तु यः' [काव्यमाला २४, काव्यप्रदीप–पृ० ४३३], (४) 'विशेषणानां साभिप्रायत्वं परिकरः' [काव्यमाला १२, रसगंगाधर–पृ० ४८३], (५) 'परीकरः **प**रिकरः साभिप्राये विशेषणे' [मंदारमरंदचंपू–व्यंग्यबिंदु–पृष्ठ १३०.] या अलंकाराचीं उदाहरणें:—
(१) मी अबला भीरु कसी साहों त्या गाधितनय तेजातें? । भ्यालासि असा दुःसह मानुनियां तूंहि सुरपते! ज्यातें. ॥ [आदिपर्व–अ० ११ गी० २२], (२) 'मी बाहुकसूत' असें सांग, रहा तत्समीप सेवकसा, । या व्यसनीं सेव्य नव्हे रविवंशज तो मनुष्य देव कसा? ॥ [वनपर्व–अ० ४ गी० ६८], (३) कीं पतित पति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे । आली जी लंकाश्री तीचा तो सांजनाश्रु पथ वाटे. ॥ [वनपर्व–अ०१२ गी० १४],(४) होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव, हो! । येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुम्हां सदाशिव हो.॥ [वनपर्व–अ०१३ गी० २७],(५) साधु म्हणति, हा होय द्रोणप्रियशिष्य, होय हरदास, । होय अजितसख, म्हणतिल घन 'गुरुजी' या शरप्रकरदास. ॥ [विराटपर्व–अ० ६ गी० २५], (६) रथचक्र उद्धरूं दे श्रुतिशास्त्रज्ञा महारथा कुळजा, । साधु न हाणिति अरिला पाहति अधृतायुध व्यथाकुळ ज्या. ॥ [कर्णपर्व–अ० ४८ गी० ६५], (७) त्यजि राज्यातें, दावपरिवृता जेंवि जग अरण्यातें, । शरणागत तो बहुमत झाला त्या विश्वशरण्यातें. ॥ [पंचशतीरामायण–साकी २०७, काव्यसंग्रहग्रंथमाला–रामायणें–भाग ३, पृष्ठ ६८.] ९. भक्तजनांनीं इच्छिलेली वस्तु देणारा, भक्तकामकल्पद्रुम. १०. सुरतरूपी फल, निधुवन हेंच फल.

वृषभानुजा किशोरी[1] तैं तिजला वर्ष पूर्ण चवदावें ।
कृष्ण किशोर हि पंध्रावर्षात्मक मूर्तिमान नव दावे[2]. ॥ १९
हरि तो स्वकरेंकरुनी मुक्त करुनि कंचुकीस झुडकावी, ।
तो ती उरोजकंजें रतिचतुरा[3] तत्करास झिडकावी. ॥ २०
प्रार्थिति योगी ज्या हृद्ग्रंथिविमुक्तिस हठादिनिकरानें[4] ।
तो कंचुकिची सोडी गांठ सखीच्या बळें निज करानें. ॥ २१
'हें काय' म्हणे, 'निशिचें कृत्य कसें हो! दिसा च साधेल ।
लाधेल सौख्य सुरतीं, परि येतां कांत कर्म बाधेल. ॥ २२
कृष्णापांगविलोकन[5] हासाद्यद्भुत[6] विलोकुनी क्रीडा ।
झाली सिद्ध रमाया, उत्सुक दावूनि थोडकी व्रीडा[7]. ॥ २३
'होऊं नका उताविळ धीर धरा हो! क्षणैक जाऊं द्या ।
उघडें दार पहा हो! लावुनियां अर्गळेसि[8] येऊं द्या.' ॥ २४
झडकरि उठोनि राधा द्वारा लावुनि विलाससद्माला. ।
आलीला[9] आलिंगुनि चुंबी तन्मुखशरत्सुपद्माला[10]. ॥ २५
सन्मंचकिं सुमनांचे सेजेवरि शोभतात दोघें तीं ।
हरिचर्वित तांबूला मुखिं मुख घालूनि जाहली घेती. ॥ २६
राधाउरोजयुगुला मर्दुनियां बाळचंद्र करजांचे ।
करितां शांतविलीं जे भवभयतसा नितांत कर ज्याचे. ॥ २७
मग कुंदकुड्मलद्युति[11] हरिनें बिंबाधरीं खुणा केली, ।
राधा म्हणे, 'प्रियतमा! कधिं ही अभ्यासिली सुरतकेली?' ॥ २८
नीवीमोक्ष[12] विलक्षण कमलेक्षण[13] रति विलक्षणी कृतिचा ।
नव संगमा विलोकुनि हस्त धरी राधिकाभिनव पतिचा. ॥ २९
कृष्णकरणऐक्यसुखें राधा भावी मनांत हर्षानें ।
मासऋतूनें अयनें पति यावा सावकास वर्षानें. ॥ ३०
हरिची मरकती[14] द्युति कंजाक्षीवरि तशी तिची कांती ।

---

१. बाला. २. दाखवी. ३. 'रतिचतुरा' हें तत्कराचें विशेषण. ४. हठयोगादिकांच्या योगें. ५. कृष्णाचें डोळे मारणें. ६. हास+आदि+अद्भुत=हंसणें इत्यादि अद्भुत क्रीडा. ७. लाज, लज्जा. ८. अडसर. ९. आलेलीला. १०. तत्+मुख+शरत्+सु+पद्माला=शरदृतूंतील उत्तम कमलाप्रमाणें ज्याचें तोंड आहे त्यास. ११. कुंदपुष्पाच्या कळीसारखी कांतिरक असा. १२. निरी सोडणें. १३. कमलाक्ष. १४. मरकत रत्नाप्रमाणें ज्याची कांति.

त्या एकांतींचा रस वर्णी **गौरी मुकुंद** सत्कीर्ती. ॥ ३१
**रा**धा**कृ**ष्णश्रीमत्सुरतानंदाप्रमेय जो भर तो ।
ब्रह्मांडीं जीवांच्या हृदयीं मोदाप्रती तयीं भरतो. ॥ ३२
तत्पति तशांत येउनि द्वारीं हाका तिला न कां मारी? ।
मनिं कामिनी म्हणे, 'हा रतिसिद्धित **रुद्र** कां न **का**मारी?' ॥ ३३
[1]उठली, घाबरली, **वृ**षभानुसुता हात ठेवुनी भाळीं ।
बसली, प्रार्थी **ज**गदंबेस, म्हणे, 'संकटांत सांभाळीं.' ॥ ३४
'कैशी दैवें[2]गती ही जावें कां **नं**दभाजसदनाला? ।
कां आणावा सदना, 'ने' म्हणतां फु[3]ल्लपद्मवदनाला? ॥ ३५
मर मर **मा**रा! घोरा माराया काय योग केलास? ।
शिशुमूर्तीविषयीं रे! हृदयीं कैसा तरी उ[4]देलास?' ॥ ३६
चिंतार्णवीं निमग्ना, भीरु भयें नेत्र[5]पक्ष्म हीं नुचले ।
**ह**रिच्या कृपाकटाक्षें जावें त्यालाच शरण हें सुचलें. ॥ ३७

---

१. येथें उठली, घाबरली, बसली, प्रार्थी व म्हणे या क्रियांचा एकाच वृषभानुसुता ह्या कर्त्याशीं संबंध असल्यामुळें **'कारकदीपका'**लंकार झाला आहे. कर्ता एक असून त्या कर्तृकाराचा संबंध अनेक क्रियांशीं असतो तेव्हां **'कारकदीपक'** अलंकार होतो. याचीं उदाहरणें पंतांच्या काव्यांत अनेक आहेत:-(१) ज्ञहि अज्ञहि जन तारी नामें कामादि शत्रुही मारी। स्वयशें भवभय वारी करि भक्तमयूरघन दया भारी.॥४६॥[काव्यसंग्रहग्रंथमाला—मात्रारामायण—भाग पहिला.] (२) जटायु मूर्च्छित क्षतार्त देखतां गळां पडे, रडे पुसे कथी परंतु मृत्यु सांगतां घडे । दडे मुहूर्त पूर्व शोक यापुढें मनीं जडे, अडेचि धैर्य, तोय दे निघे शुगब्धिचे कडे. ॥ २२ ॥ [पंचचामर—रामायण.[ याचें लक्षण:-(१) 'सकृद्वृत्तिस्तु धर्मस्य प्रकृताप्रकृतात्मनाम् । सैव क्रियासु बह्वीषु कारकस्येति दीपकम् ॥' [काव्यप्रदीप—१० उल्लास १७ कारिका पहा], (२) 'एककारकगानां तु क्रियाणां कालभेदत: । गुंफनं क्रियते यत्र तत्र कारकदीपकम्. ॥' [मंदारमरंदचंपू—व्यंगबिंदु—पृष्ठ १३९.] २. आतां राधा दैवावर हवाला ठेवून आपलें समाधान करूं पाहात आहे. दैववादाचा **पं**तांनीं सुद्धां आश्रय केला आहे:——(१) न चुकेचि भावि [आदिपर्व—अ० १४।११], (२) माद्री म्हणे न म्यां, नरदेव नियतिनेंचि भुलविला साचा । [आदिपर्व—अ० १९।११], (३) भावि चुकेनाचि जें भलें खोटें [सभापर्व—अ० ३।६२], (४) समर्थ न कोणीही सुज्ञ भावि टाळाया, [सभापर्व—अ० ४।१०१], विधिनें श्रीराममुखींहि भरविला पाला [सभापर्व—अ० ७।५५]. ३. कृष्णाला. ४. उत्पन्न झालास. ५. डोळ्याची पापणी.

झाला म्हणे, 'शिशु, युवा, तो आतां तोक कां न होईल[1]? ।
कामानला विज्ञवि तो, भय वारुनि, अभय कां न देईल[2]? ॥ ३८
प्रार्थी, 'हा! कामारी! द्वारीं पति वाटतें कळेना कीं ।
लघु तनु धरावया मन माधवजी! अजुनि कां वळेना कीं? ॥ ३९
त्रिभुवनकमनीयत्वा[3] तुमच्या पाहूनि आजि न फसावें ।
तरि लागतें कशाला मन हें घोरींत घालुनि बसावें?' ॥ ४०
गोविंद म्हणे, 'करणें शिशुचा युव साधलेंचि आजाला; ।
तूं तरि सांग सखे! कीं युव तो शिशु कोणते स्थळीं जाला?' ॥ ४१
राधा म्हणे, 'खरें जी! तरुणाचा तो कधीं न पाहीला ।
कोण असा तरि निमिषें शिशुचा युव होउनीच राहीला. ॥ ४२
या ब्रह्मसृष्टिविश्वांतिल मूल न हें मला कळों आलें. ।
म्हणउनि वैकुंठपते! शरण चरणपंकजाप्रती आलें. ॥ ४३
हें व्रत तुमचें, देवा! भक्ताला संकटांत रक्षावें ।
तरि भक्तांत अली ही कृपाकटाक्षें गणूनि लक्षावें ॥ ४४
लघु हो अथवा देवा! ही दासी निजपदासि सदया! ने.' ।
ऐकुनि करुणावाणी अभिनव केलें दयार्द्रहृदयानें. ॥ ४५
तत्क्षणिं देखत देखत शिशु झाला दुडदुडां पुढें रांगे, ।
मुदितमना मग राधा आलिंगुनि वदन चुंबि अनुरागें. ॥ ४६
हरिच्या पदप्रसादें जी झाली [11]संकटाब्धिला तरती ।
निर्भयचित्तानें [12]दे निजपतिला युक्तिनें च उत्तर ती. ॥ ४७

---

हें प्रश्नालंकाराचें उदाहरण आहे. बोलणारा प्रश्न विचारतो, पण त्याला त्या प्रश्नाचें ाहीत असून त्याजविषयीं त्याचा निश्चय अगोदरच झाला असतो अशा स्थळीं हा होतो. याला इंग्रजींत Erotesis असें म्हणतात. या अलंकाराला साहित्यशास्त्रवेत्ते मान देत नाहींत. २. अर्थात् 'अभय देईल' हें उत्तर. ३. त्रिभुवनांतील सौंदर्यास. ांत.५. तरुणाचा [शिशु] कधीं न पाहिला—असा अन्वय. ६. भक्तांत अली (आली)= ली. ७. कौतुक. ८. दयार्द्र आहे अंतःकरण ज्याचें त्या कृष्णानें. पर्यायोक्तालंकार. तच्चित्ता. १०. प्रेमानें. ११. संकटरूपी समुद्राला. १२. दे=देती झाली. हें येथें दर्शक रूप आहे. 'घे, ने, ये, हो, इत्यादि एकारांत व ओकारांत धातूंचीं कर्तरि वि- तीयपुरुषीं एकवचनीं रूपें कवितेंत कधीं कधीं स्वार्थीं तृतीयपुरुषीं एकवचनीं वर्त- ळीं व कधीं कधीं भूतकाळीं योजितात' असा नियम आहे. [पद्यरत्नावली—पृष्ठ ९० ाचीं उदाहरणें:—(१) **घे** इक्षु वारण जसा करपुष्करानें, (२) असें देखतां **ये** कृपा

'झालें जागी, उठलें, आलें, थांबा कवाड [1]ऊघडतें ।
आगमसमयीं कधिं ही न निजें परि तें च आजि मज घडतें.' ॥ ४८
राधादासीऐसा श्रीला दुर्लभ हि कृष्णएकांत ।
लगबग उघडी दारा, गृहांतरीं कर धरूनि ये कांत. ॥ ४९
'निज आली, गृहिं नाहीं मनुष्य दुसरें, म्हणूनि दाराला ।
लावुनि, घेउनि निजलें मंचकिं नंदात्मजा उदाराला. ॥ ५०
'केव्हां आलां न कळे, द्वारासी [2]भागलेत [3]हांकांनीं ।
नाहीं पडों दिला कीं निद्रेनें एक शब्द हा कानीं.' ॥ ५१
सप्रेम गोप हरिला घेउनियां वदन चुंबि आनंदें ।
'हें पुत्ररत्न लाभे केलें तरि पुण्य काय गे! नंदें ? ॥ ५२
मी कार्याला जातां तूं अससी एकली च गृहवासी ।
कांते! [4]कालक्रमणा आणित जा नित्य वासुदेवासी.' ॥ ५३
'म्हणतां परी कदाचित् कृष्णासह मी निजेन अवचट कीं ।
रागें भराल, सत्य हि जरि वदल्यें तरि म्हणाल ही [5]लटकी. ॥ ५४
जेववितां कृष्णाला येतां तुम्हि जरि उशीर लागेल ।
उघडाया दाराला; मनिं सहजचि कामबंधु वागेल.' ॥ ५५
'शंका नाणीं, [6]आणीं.' गोप म्हणे, 'क्रीडणार्थ हरिला गे! ।
राहिन उभा किं परतुन येइन तुजला उशीर जरि लागे.' ॥ ५६
आनंदे हरि, राधा [7]दध्योदन जेववूनि कृष्ण कडे ।
घेउनि, निघे गजगती नेला गोविंद नंदराणिकडे. ॥ ५७
बोले व्रजेश्वरीला, 'ये ये घे हा मुकुंद सत्वरशी ।
हा वेळ गुंतलें कीं कृतकृष्णाद्भुत सुशील सत्वरसीं.' ॥ ५८
'राधे!' म्हणे यशोदा, 'त्वद्गृहिं खेळे करी न [8]रुदनातें ।
काल क्रमेल तव ही नित्य अशी नेत जा स्वसदनातें.' ॥ ५९
'मारा हाक मला जरि जेवीना घेतली [9]खेळ रिकामी ।

---

माधवातें, (३) हें हायन चवदावें हो, (४) न दे पाठि कोणीच राया बळी रे, (५) मागून ये दूरुनि चक्रपाणी, (६) तदुपरि हरिभेटी ये विदर्भेंद्र तेथें.

१. येथें 'कारकदीपका'लंकार आहे. २. दमलेत, थकलेत. ३. हांका मारून. ४. कालक्रमण होण्यासाठीं. ५. खोटी. ६. कृष्णातें आणीं—असा भावार्थ. ७. दहींभात. ८. रडत नाहीं. ९. हट्ट, छंद.

नेइन माधव येउनि गृहकृत्यीं गुंतलें न जरि मामी.' ॥ ६०
न्यावा हरिला प्रतिदिनिं न्हावा तद्गृहिं युवा क्षणैकानें ।
भगवद्रतिरससमग्ना भाग्यवती स्पर्शली न धाकानें. ॥ ६१
कृष्णानंदनिमग्ना राधेचा वर्णवे न भाग्यविधी ।
म्हणउनि [1]व्रजौकसांचें [2]भाग्यस्तवि राहिला उगा च विधी. ॥ ६२

---

## [3]श्रीज्ञानदेवकृत

## १०. [4]पंचीकरण.

(ओंव्या.)

### अध्याय पहिला.

**ॐ नमो जी आद्या । वेदप्रतिपाद्या ।**
**जय जय स्वसंवेद्या । आत्मरूपाय नमः ॥**

---

१. व्रज हेंच आहे ओकस् (घर) ज्यांचें ते. २. भाग्य वर्णन करण्यांत. ३. 'जो ज्ञानराज भगवान् श्रवणीं सुज्ञान दे, वदे वाचा । अवतार गमे अकरावा कां सुज्ञान देवदेवाचा. ॥ २ ॥' [मोरोपंत—सन्मणिमाला.] ज्ञानेश्वर महाराजांचा जन्म शके ११९७ श्रावण वद्य ८ स आळंदी येथें झाला. आणि हे शके १२१८ कार्तिक वद्य ८ स आळंदी येथेंच समाधिस्त झाले. निवृत्तिनाथ, ज्ञानदेव, सोपानदेव, मुक्ताबाई हीं अनुक्रमें चारी भावंडें इतर साधारण मनुष्य कोटींतील माणसें नव्हतीं. सुप्रसिद्ध भगवद्भक्तशिरोमणि श्रीएकनाथ यांनीं यांच्यावर एक पद केलेलें आहे. तें यांच्या अधिकाराविषयीं साक्ष देत आहे. तें असें:— (पद) तीन अक्षरें **'निवृत्ति'**, जो जप करी अहोरात्रीं; तया सायुज्यतामुक्ति, ब्रह्मस्थिति सर्वकाळ ॥ १ ॥ चारी अक्षरें **'ज्ञानदेव'**, जो जप करील धरूनि भाव; तयासी ब्रह्मपदीं ठाव, ऐसें देवाधिदेव बोलियला ॥ २ ॥ **'सोपान'** हीं तीन अक्षरें, जो जप करील निर्धारें; त्यासि ब्रह्म साक्षात्कारें, तृप्ति होइल तात्काळ ॥ ३ ॥ **'मुक्ताबाई'** चतुर्था मोक्षदा, जो जप करील सदां । तो जाईल मोक्षपदा, सायुज्यसंपदा जेथें वसे ॥ ४ ॥ ऐशीं हीं चवदा अक्षरें, जो ऐकेल कर्णविवरें, कीं उच्चारील मुखद्वारें, त्यासि ज्ञानेश्वर प्रत्यक्ष भेटे ॥ ५ ॥ **एकाजनार्दनीं** प्रेम, जो जप करील धरूनि नेम; त्यासि पुन्हा नाहीं जन्म, ऐसें **जनार्दन** बोलियला ॥ ६ ॥ ४. पंचीकरण म्हणजे सूक्ष्म किंवा शुद्ध (पंच) भूतांपैकीं प्रत्येक भूतांत, इतर चार भूतांचे कांहीं नियमित अंश घालून तयार झालेलें मिश्रण. 'तद्भोगाय पुनर्भोग्यभोगायतनजन्मने । पंचीकरोति भगवान् प्रत्येकं वियदादिकम् ॥ २६ ॥ द्विधा विधाय चैकैकं चतुर्धा प्रथमं पुनः । स्वस्वेतरद्वितीयांशैर्योजनात्पंच पंच ते ॥ २७ ॥' [विद्यारण्यसार्थपंचदशी—तत्त्वविवेक—प्रथम प्रकरण—पृष्ठ ६.]

शुद्ध[1] निखिल[2] ब्रह्म[3] । तेथें चैतन्य[4] इच्छा आगम । महत्तत्त्व[5] माया उगम । ओंकार[6] उद्भवला. ॥ १ ॥ शुद्ध चैतन्य तेंची निराकार । तेथें इच्छा तेचि माया साहंकार[7] । तेंचि अहं अर्धमातृका ओंकार । पुरुष[8] प्रकृति[9]. ॥ २ ॥ शुद्ध ब्रह्म तें इच्छावशें । अविद्या[10] पातली जीव दशे । जेंवी महदाकाश[11] घटाकाशें[12] । भिन्न दिसे. ॥ ३ ॥ सप्त[13] द्वीप परमात्मा ईश्वर । त्वंपदें[14] जीवात्मा सविकार । जो सत्स्वरूपाचा विसर । ते अविद्या बोलिजे. ॥ ४ ॥ पूर्ण चैतन्य म्हणिजे परमात्मा । पृथक चैतन्य म्हणिजे जीवात्मा । त्रिगुणभूत साधनात्मा । प्रपंच बोलिजे. ॥ ५ ॥ अर्ध मातृकापासुनी तीन मातृका । अकार उकार मकार

---

१. मायेच्या मिश्रणानें गढुळ झालेलें नाहीं असें, स्वच्छ. २. यच्च यावत्, संपूर्ण. ३. ब्रह्मादि देवांच्या ठायीं, मनुष्यांच्याठायीं, गवाश्वादि पशूंचे ठायीं आणि आकाशादि पंचभूतांचे ठायीं जन्मस्थितिलयांस (हेतुभूत सर्वत्र) व्यापून असणारें जें चैतन्य तें. (चतुर्मुखेंद्रदेवेषु मनुष्याश्वगवादिषु । चैतन्यमेकं ब्रह्मातः प्रज्ञानं ब्रह्मम्यपि ॥ २ ॥ (विद्यारण्यसार्थपंचदशी–महावाक्यविवेक–पृष्ठ ४९.) ४. चेतना, सजीवपणा. ५. गुणत्रय १ सत्व २ रज ३ तम यांची साम्यावस्था, मूळ माया. ६. ॐकारांत १ अकार २ उकार ३ मकार ४ थी अर्धमात्रा ५ वें शून्य. अकार=ब्रह्मदेव, उ०=विष्णु; म०=रुद्र; अर्धमात्रा=मूलमाया, शुद्धसत्वात्मक माया; ५ वें शून्य=निरंजन ब्रह्म, मायारहित एकांत. मिळून मानला जातो. ७. त्रिविध अहंकार १ सात्विक २ राजस ३ तामस यांसह+माया=शुद्धसत्वात्मक माया. देश काल वस्तु परिच्छेदरहित परिपूर्ण असा परमात्मा, तत्वज्ञानास अधिकारी अशा देहाचे ठायीं बुद्धीचा साक्षी होऊन प्रकाशत असणारा. (परिपूर्णः परात्मास्मिन्देहे विद्याधिकारिणि । बुद्धेः साक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते ॥ ३ ॥ विद्यारण्य सार्थपंचदशी–प्रकरण पांचवें–पृष्ठ ४९.) ८. परमात्मा चैतन्य. ९. शुद्ध सत्वात्मक माया यावत् जडसमुदाय (प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि । विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् (भगवद्गीता–अध्याय १३ श्लो० १९). १०. मायेची स्वरूपें दोन आहेत, शुद्धसत्वात्मक आणि अशुद्धसत्वात्मक; शुद्धसत्वात्मक मायेपासून त्रिविधाहंकार मिश्रित ॐकार झाला. व याच मायेच्या ठिकाणीं प्रतिबिंबित भासणारी अशुद्धसत्वात्मक माया=अविद्या, ही होय; याच मायेमधें प्रतिबिंबित जो चिदात्मा तोच जीव होय. (सत्वशुद्ध्यविशुद्धिभ्यां मायाविद्ये च ते मते । मायाबिंबो वशीकृत्य तां स्यात्सर्वज्ञ ईश्वरः ॥ १६ ॥ अविद्यावशगस्त्वन्यस्तद्वैचित्र्यादनेकधा । सा कारणशरीरं स्यात् प्राज्ञस्तत्राभिमानवान् ॥ १७॥ विद्यारण्य पंचदशी–प्रथमप्रकरण–श्लो० १६-१७.) ११. आकाशें चार आहेत. १ महदाकाश २ घटाकाश ३ जलाकाश, ४ अभ्राकाश, महदाकाश=ज्यामध्यें सूर्य, चंद्र, नक्षत्रें, प्रकाशमान होतात अशी अवाढव्य पोकळी. (सार्थपंचदशी–पृष्ठ ५३.) मोठें आकाश. १२. घट=घडा=आंतील पोकळी. १३. सप्तद्वीपांची नांवें. १ जंबुद्वीप, २ शंखद्वीप ३ कुशद्वीप ४ क्रौंचद्वीप ५ श्वेतदीप ६ पुष्करदीप ७ शाल्मदीप. १४. जीव हा शब्द.

आइका । तेथें जन्म हरिहरब्रह्मादिकां । हे पिंडरचना परियेसा. ॥ ६ ॥ मूल प्रकृति देह मातृका ओंकार । परा[1] वाचा अभिमानी सर्वेश्वर । सर्वसाक्षी अवस्था हा विचार । तेथें बोलिला असे. ॥ ७ ॥ माया देह रुद्र अभिमानी । पश्यंती[2] वाचा मकारू जननी । प्रलय अवस्था तियेस्थानीं । हे बोलिली असे. ॥ ८ ॥ हिरण्यगर्भ[3] देह उकार मातृका । विष्णु अभिमानी मध्यमा वाचा देखा । स्थिति अवस्था हे तेथिंची टीका । बोलिली असे. ॥ ९ ॥ विराट् देहीं ब्रह्मा अभिमानी ऐका । सृष्टी अवस्था आकार मातृका । वैखरी वाचा उद्भवली सकळिकां । वेदांची तेथें. ॥१०॥ उत्पत्ति स्थिति संहारू । हा तिहीं देवांचा व्यापारू । आतां सांगणें पुढती विस्तारू । जीवात्मयाचा. ॥ ११ ॥ आतां सांगों पिंडरचना । जे त्रिपंचकाची विवंचना । कवणापासाव कवणा । विस्तार जाहला असे. ॥ १२ ॥ सात्विक अहंकारापासुनि देखा । जन्म जाहला अंतः[4]करण पंचका । आकळित वाणी बोलीं ऐका । विस्तारु हा. ॥ १३ ॥ मन बुद्धी चित्त अहंकारु । अंतःकरण सर्व व्यापारु । येणेंचि विवेक संसारु । आत्मयासी. ॥ १४ ॥ राजस अहंकारापासुनि इंद्रिय पंचकु । श्रवण घ्राण चक्षु रसना त्वकु । शब्द स्पर्श रूप रस गंधकु । हे विषय पांच. ॥ १५ ॥ वाचा पाणी चरण । उपस्थेंद्रिय गुदस्थान । या इंद्रियांचें देहीं वर्तमान । सुष्ट दुष्ट कर्में वर्तणें. ॥ १६ ॥ तामस अहंकारापासाव । आकाश जाहलें निरवयव[5] । तेज जाहलें वायोपासाव । प्रकाशरूप ॥ १७ ॥ तेजापासाव आप जाहलें जाणा । आपापासाव पृथ्वि रचना । पंचभूतें पंचवीस गुणा । विस्तारुनी सांगेन. ॥१८॥ वर्ण पिंवळा घर स्वाधिष्टान । मुख जिव्हा स्वाद गोड जाण । आहार रसु शस्त्रें परशु अंकुश खुण । बोलिली असे. ॥ १९ ॥ अस्थी मांस रोम नाडी त्वचा । हा अंश पृथ्वीचा साचा । स्थानें भूक आहार तयांचा । स्वाद सांगणें. ॥ २० ॥ लाळ मूत्र शुक्र[6] शोणित । स्वाद गुण आपाचा म्हणिजत । घर

---

१. चार वाचांतील पहिली वाचा. २. दुसरी वाचा. ३. ब्रह्मांडांतील देहचतुष्टयास कारण जो सूक्ष्म देह तो. मायाप्रतिबिंबित जो ईश्वर, तैजस=जीव, तो जेव्हां लिंगशरीराचा अभिमानी होतो तेव्हां त्याला हिरण्यगर्भ असें म्हणतात. 'बुद्धिकर्मेंद्रियप्राणपंचकैर्मनसा धिया । शरीरं सप्तदशभिः सूक्ष्मं तल्लिंगमुच्यते ॥ २३ ॥ प्राज्ञस्तत्राभिमानेन तैजसत्वं प्रपद्यते । हिरण्यगर्भतामीशस्तयोर्व्यष्टिसमष्टिता ॥ २४ ॥' [विद्यारण्य सार्थपंचदशी—प्रकरण पहिलें—पृष्ठ ६.) ४. १ मन २ बुद्धि ३ चित्त ४ अहंकार ५ अंतःकरण. ५. अवयवरहित. ६. जारज, अंडजादि प्राण्यांच्या शरीरांत असणारी धातु. (रेत.)

नाभि वर्ण श्वेत । मुख तयाचें उपस्थान. ॥ २१ ॥ स्वाद क्षार आहार मैथुन । शस्त्र सुरी येथुन जाहलें आपाचें व्याख्यान । आतां सांगेन तेजाचे गुण । विस्तारुनी सर्व ही. ॥ २२ ॥ क्षुधा तृषा निद्रा आळसु । हा तेजाचा अंशु । वर्ण [1]राता तयाचा निवासु । हृदयस्थानीं पैं असे. ॥ २३ ॥ मुख नेत्र देखणें आहारू । स्वाद तिखट शस्त्रमाला हा तयाचा व्यापारु । आतां सांगेन पुढील विस्तारू । वायुतत्वाचा. ॥ २४ ॥ धावणें वळणें आकुंचन । पसरणें आणी निरोधन । हे वायूचे गुण जाण । निर्धारेंशी परिस पैं. ॥ २५ ॥ घर कंठस्थानीं वर्णनील सुवट । मुख नासिक स्वाद आंबट । शस्त्र [2]बोढेण [3]खांडें आहार [4]पैरिमळु चोखट । हें बोलिलें असे. ॥ २६ ॥ क्रोध लज्जा भय द्वेषु । मोहो आकाशाचा अंशु । त्याचा असे [5]रहिवासु । ललाट प्रदेशीं. ॥ २७ ॥ मुखें आहार श्रमणें ऐकणें । वर्ण काळा स्वाद कडू जाणें । शस्त्र धनुष्यबाण हीं आकाशाचीं लक्षणें । बोलिलीं असे. ॥ २८ ॥ आप निजे पृथ्वी बोले । तेज देखे वायू चाले । आकाश आइके डोले । तें आपुले ठायीं. ॥ २९ ॥ आतां सांगणें आणिक विचारु । यांचा पृथक् पृथक् व्यापारू । साक्षित्वें निर्धारू । बोलिला असे. ॥ ३० ॥ प्राण व्यान आणि अपान । उदान देहीं व्यापक समान । [6]नाग [6]कूर्म [6]कर्कशु [6]देवदत्त [6]धनंजय जाण । दश पवन हे पाहें. ॥ ३१ ॥ प्राण श्वासोच्छ्वास येरझारा करी । व्यापार अन्नोदक आहारीं । व्यान रसधातूनें शरिरीं । पुष्टता दिसे. ॥ ३२ ॥ अपानें मलमूत्र सारणें । उदानें देहांतकाळीं प्रकटणें । समानें सर्व संधि लवणे । लवती सदां. ॥ ३३ ॥ नागु वसे तालुका कमळीं । कूर्म नेत्रीं सदां न्याहाळी । कर्कशें कर्णमंडळीं । लुब्ध जाहला असे. ॥ ३४ ॥ देवदत्त मुखामाजी वसे । धनंजय नासिकीं वसे । हे पांचही पवन ऐसे । ब्रह्मांडीं वसती. ॥ ३५ ॥ जांभई देवदत्ताची । शिंक धनंजयाची । कर्कशु हास्य रूदनींची । स्थिति बोलिली असे. ॥ ३६ ॥ नागुपांचातें [7]गिंवसी । कूर्म उन्मळी नेत्रांसी । दशपवनांची करणी ऐशी । जाणिजे पैं. ॥ ३७ ॥ कर्कशु आकाशाचा· नागवायूचा । कूर्म तेजाचा । देवदत्त आपाचा । पृथ्वीचा धनंजयो. ॥ ३८ ॥ ऐसी हे प्राण साखळी । वर्तत असे देहाच्या मेळीं । प्राणेंविना कदा काळीं । जीव भाव न

---

१. तांबडा. २. ढाल. ३. तलवार. ४. सुगंध. ५. वास्तव्य, राहाणें. ६. पांच वायूंचे पांच सूर=ध्वनी. हींच नांवें कित्येक वीरांच्या शंखांस दिलेलीं असत. अर्जुनाचा देवदत्त नांवाचा शंख होता. 'पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः' [भगवद्गीता—अ०१श्लो०१५.]
७. गिवसणें=सांपडणें, प्रकट होणें, शोधणें.

दिसे. ॥ ३९ ॥ ऐसिया रचिल्या प्रपंच शाळा । सांगितल्या साक्षित्वें सकळा । या प्रपंच वृक्षाचा निर्वाळा । [1]प्रणव बीजापासुनियां. ॥ ४० ॥ ऐसा हा [2]तत्व योगु । [3]छत्तिसाव्या भागाचा [4]क्षेत्रें [5]यौगु । [6]हें [7]जाणें तौं [8]आध्यात्मि पांगु । [9]येरु तो मंदमतिया. ॥ ४१ ॥ तत्वांचे पांच पांच गुण । मागें सागितलें प्रमाण । तो विभाग [10]वांटणें जाण । एक एकासि देउनी. ॥ ४२ ॥ अस्थि मांस त्वचा ।

१. ॐकार. २. वास्तविक, सत्य, स्वरूपाची प्राप्ति करून घेण्याचा योग=अप्राप्त वस्तूची प्राप्ति करून घेण्याचें साधन. ३. पंच महाभूतें व त्यांच्याच पासून उत्पन्न झालेले प्रत्येक तत्वाचे पांच पांच मिळून 'पंचवीस, गुण आणि लिंगदेहसंबंधीं 'पांच' ज्ञानेंद्रियें 'पांच कर्मेंद्रियें' एकूण 'पसतीस तत्वें, आणि छत्तिसावें तत्व परमतत्व= अधिष्ठान, शुद्ध निखिल ब्रह्म. ४. लिंगशरीर=याला क्षेत्र म्हणजे शेत असें नांव आहे. हें माझें असें म्हणणारा जो त्याला क्षेत्रज्ञ=शेतकरी असें ती गोष्ट जाणणारे म्हणतात. ५. प्रत्येक क्षेत्रामध्यें जो क्षेत्रज्ञ तो (छत्तिसावें परमतत्व=परेश भगवान्) असें जाणणें. ('इदं शरीरं कौंतेय क्षेत्रमित्यभिधीयते। एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥ क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत । क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥ [भगवद्गीता–अध्याय १३.] ६. हें ज्ञान. ७. जाणें तौं परियंत. ८. शरीर, इंद्रियें आणि प्राण यांपासून होणारें दुःख, शरीरस्थित त्वंपदवाच्य आत्मा. यांच्या ठिकाणीं पांगु=पघळलेला, ओशाळगत. ९. तत्वज्ञान होईपर्यंत येरु=तो मंदमती जो तो, अध्यात्मीं पांगलेलाच असावयाचा. १०. पंच महाभूतांतील प्रत्येक भूताचे बरोबर दोन दोन भाग करून त्या भागांपैकीं एक तसाच ठेवून बाकी राहिलेल्या प्रत्येक भागाचे पुन्हा चार चार समभाग पाडले तेव्हां अर्थातच हा एक अष्टमांश झाला. नंतर प्रत्येक भूताचे पूर्वोक्त अर्ध राहिलेल्या भागांत दुसऱ्या प्रत्येक अर्धकाचा चतुर्थांश=वरील $\frac{1}{8}$ भाग मिसळून पांचा पांचांचें असें प्रत्येक भूत तयार केलें. यालाच पंचीकरण म्हणतात. (विशेष समजुतीसाठीं खालील कोष्टक पहा.)

पंचीकरणाचें कोष्टक.

(सूक्ष्मभूतें) (स्थूलभूतें)

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| $\frac{1}{2}$आकाश | $\frac{1}{8}$वायु | $\frac{1}{8}$तेज | $\frac{1}{8}$जल | $\frac{1}{8}$पृथिव | आकाश |
| $\frac{1}{2}$वायु | $\frac{1}{8}$आकाश | $\frac{1}{8}$तेज | $\frac{1}{8}$जल | $\frac{1}{8}$पृथिव | वायु |
| $\frac{1}{2}$तेज | $\frac{1}{8}$आकाश | $\frac{1}{8}$वायु | $\frac{1}{8}$जल | $\frac{1}{8}$पृथिव | तेज |
| $\frac{1}{2}$जल | $\frac{1}{8}$आकाश | $\frac{1}{8}$वायु | $\frac{1}{8}$तेज | $\frac{1}{8}$पृथिव | जल |
| $\frac{1}{2}$पृथ्वी | $\frac{1}{8}$आकाश | $\frac{1}{8}$वायु | $\frac{1}{8}$तेज | $\frac{1}{8}$जल | पृथिव |

रोमनाडी पृथ्वीचा । आपीं मांसांश तेज तत्वाचा । नाडी वायुसी. ॥ ४३ ॥ रोम दिधले आकाशीं । अस्थि ठेविल्या आपणापाशीं । या परी पांचांसी । पृथ्वी मिळाली. ॥ ४४ ॥ स्वेद मूत्र लाळ रक्त । आणि शुक्लित[१] । आपीं मूत्र तेजीं रक्त । लाळ वायुसी. ॥ ४५ ॥ वीर्य तें आकाशीं । शब्द पृथ्वीसीं । आप पांचांसी । मिळालें ऐसें. ॥ ४६ ॥ क्षुधा तृषा आळसु । मैथुन निद्रा तेजाचा अंशु । क्षुधा तेजासी तृषा दिधली आपासी । मैथुन वायूसि दिधलें. ॥ ४७ ॥ निद्रा दिधली आकाशासी । आळस दिधला पृथ्वीसी । तेजाची वांटणी ऐसी । पांचांठायीं. ॥४८॥ धांवणें निरोधन वळणें । आकुंचन पसरणें । आकाशासि दिधलें पसरणें । धांवणें आपणा पैं. ॥४९॥ निरोधन दिधलें तेजासी । वलन दिधलें आपासी । आकुंचन पृथ्वीसी । वायूनें दिधलें.॥५०॥ मोहो लज्जा राग । भय द्वेषु चांग । हे आकाशाचे विभाग । पांचांठायीं दिसती पैं. ॥ ५१ ॥ भय राहिलें आकाशीं । द्वेष दिधला वायूसी । राग दिधला तेजासी । लोभ तो आपीं राहे. ॥ ५२ ॥ मोहो दिधला पृथ्वीसी । हे पांचांची वांटणी ऐसी । हें कळल्यावीण प्राण्यांसी । प्रत्यया नये. ॥ ५३ ॥ लिंगदेहाचीं[२] तत्वें जाण । तीं वांटीन त्याचें प्रमाण । एक चित्तें करून । परिसावें. ॥ ५४ ॥ पंचभूतांचे विषय गुण । शब्द स्पर्श रूप रस गंध जाण । अंतःकरण घेऊनि आपण । वावरतसे. ॥ ५५ ॥ अंतःकरण मन बुद्धि चित्त अहंकार । पांचांचेंही पंचक श्रोत्र । वाचा पंचक मेळें सर्वत्र । वर्तत असे. ॥५६॥ या सूक्ष्म भूताचा विचारु । एकएकाचा पंचविध प्रकारू । परस्परेंसी पावला तो विचारू । आइकें रचना. ॥ ५७ ॥ यांत पृथ्वीचे पांच गुण । अहंकार अपान प्राण । गंध गुद जाण । हे पृथ्वीचे. ॥ ५८ ॥ अहंकार दीधला आकाशीं । अपान दीधला वायूसी । घ्राण दीधलें तेजासी । गंध आपासि दीधला. ॥ ५९ ॥ स्वेद आपुलें स्थान आवरी । पृथ्वी मिळाली यापरी । असों आतां आपाचे गुण याचपरी । मिळाले कैसे. ॥ ६० ॥ चित्त आणि प्राण । जिव्हा रस शिश्न । चित्तासी वायूसि प्राण । जिव्हा तेजीं. ॥ ६१ ॥ रस ठेविला आपानें जाण । पृथ्वीसि दीधलें शिश्न । मिळणी आपाची हे खुण । सांगीतली. ॥ ६२ ॥ तेजाचे गुण तद्रूप । बुद्धी उदान चक्षु रूप । पाद-

१. रेत. २. पांच कर्मेंद्रियें, पंच प्राण, पांच ज्ञानेंद्रियें, मन, आणि बुद्धि मिळून सत्रा एकूण शरीर झालें, यालाच वेदांती लिंगशरीर म्हणतात. (बुद्धिकर्मेंद्रियप्राणपंचकैर्मनसा धिया । शरीरं सप्तदशभिः सूक्ष्मं तल्लिंगमुच्यते ॥ २३ ॥ (विद्यारण्य सार्थपंचदशी—प्रथम प्रकरण—श्लो० २३.)

सहीत समीप । वांटुनि दिधले ऐसे. ॥ ६३ ॥ बुद्धिगुण आकाशीं । उदान दीधला वायूसी । चक्षू आपणापाशीं । तेजें ठेवियलें. ॥ ६४ ॥ रूप आपीं दीधलें । पाद पृथ्वीसी लेविलें । आतां ऐक वहिलें । वायूचे पांच गुण.॥६५॥ मन समान त्वचा जाण । स्पर्श पाणी वायूचे गुण। आकाशीं दिधलें मन । समान आपुले ठायीं. ॥ ६६ ॥ त्वचा दीधली तेजासी । स्पर्श दीधला आपासी । पाणी पृथ्वीसी । वायूनें दीधलें ऐसें. ॥ ६७ ॥ आकाशाचे पांच अंकुर । अंतःकरण व्यान श्रोत्र। शब्द वाचा सार । आकाशाचे गुण. ॥६८॥ अंतःकरण अंश आपुला । व्यान तो वायूसि दीधला। श्रोत्र अंशु ठेवी ठेविला । तेजापाशीं. ॥ ६९ ॥ शब्द आपाच्या ठायीं । वाचा दिधली या परि पांचा ठायीं। ऐक्य रूपें पाही । अंतःकरण [1]वावरे. ॥ ७० ॥ पांचांचे पंचवीस गुण । तेंही [2]वावरेचें लक्षण। हा पंच योग कळल्याविण । योग साध्य नव्हेचि पैं. ॥ ७१ ॥ इति श्री**पंचीकरण** महावाक्य जाण । **ज्ञान**-देवविरचित पूर्ण । विवंचना निवडून । सांगीतली पैं. ॥ ७२ ॥

---

## अध्याय दुसरा.

शरीर मार्गें वर्ते त्रिशून्याचा । तिहींसी तिवडा ॐकाराचा । चौथें निःशून्य भव बंधाचा । ठावोचि पुसे. ॥ १ ॥ तरी प्राण आणी अपान । दोन मावळती तें त्रिशून्य । चौथें व्यापक गहन । मोक्ष मुक्तिपद तें. ॥ २ ॥ अधः-शून्य आणि मध्य शून्य । ऊर्ध्व शून्य चतुर्थ शून्य। शुद्ध चैतन्य तें निःशून्य। शून्य न बोलिजे. ॥ ३ ॥ अधःशून्य म्हणिजे अकारू । मध्यशून्य म्हणिजे उकारू। ऊर्ध्वशून्य म्हणिजे मकारू । ॐकार तेंचि चैतन्य. ॥ ४ ॥ या चहूं शून्याहुनी परतें । तें [3]सोहं ब्रह्म जाण निरुतें । तेथें शून्य हा शब्द वर्ते । [4]आणियें म्हणुनि. [5]॥ ५ ॥ इयें शून्यें बोलियली चतुर्विध । आणीक पिंडीं चार प्रसिद्ध। तो तूं ऐक विनोद । गुरुपुत्रा! श्रवण किजे. ॥ ६ ॥

---

१. वास करी. २. व्यापार करणारी, घडामोडी करणारी=माया, अविद्या तिचें. ३. सोहं=सः अहम् (तो मी) ब्रह्म. ४. 'अणोरणीयान' (लहानाहून लहान) 'एषोऽणुः' (हा अणु आहे) 'सूक्ष्मात् सूक्ष्मतरं, (सूक्ष्माहून अतिसूक्ष्म) इत्यादि श्रुतींवरून (अणुवादि आत्म्याचे ठायीं अणु अशी कल्पना करितात (अणोरणीयानेषोऽणुः सूक्ष्मात्सूक्ष्मतरंत्विति । अणुत्वमाहुः श्रुतयः शतशोऽथ सहस्रशः ॥ ८० ॥ 'विद्यारण्य, 'सार्थपंचदशी, श्लो० ८० चित्रदीप पृष्ठ ६१) याच शब्दास अनुरूप ज्ञानोबांचें पद (काव्यसंग्रह—अनेककविकृत पदसंग्रह भाग १ पद ६ पृष्ठ ४ पहा.) ५. शरिरास मी असें म्हणणाऱ्या जीवाचे ठिकाणीं.

**अधःशून्यमनोभूतमूर्ध्वशून्यं च मारुतः ।**
**मध्यशून्ये च जीवात्मा चतुर्थं ब्रह्म निश्चयः ॥ १ ॥**

अधःशून्य म्हणिजे मन चंचळ । उर्ध्व शून्य तें पवनु सर्वबळ । मध्य शून्य जीव चौथें केवळ । परब्रह्म जाणिजे तें. ॥ ७ ॥ तें निर्गुण निराकार । निष्प्र[1]पंच निरा[2]धार । निः[3]संग निर्विकार । पूर्ण घन तें ओळखें. ॥ ८ ॥ आणिक एक [4]तार्किकांचें मत । ॐकारा वरुतें शून्य बोलत । परि तें जाणावें [5]जीवद्भूत । प्रमाण युक्त नव्हे. ॥ ९ ॥ [6]क्षर तो [7]चिदाकाश [8]सर्वभूत । [9]अक्षर तो [10]निर्गुण [11]कूटस्थ । या क्षराक्षराची [12]व्यावृत्त । तो पुरुष [13]उत्तम. ॥१०॥ जो क्षराक्षरातीतु । पुरुषोत्तम विख्यातु । वेदशास्त्रपुराणभरितु । नाम नामातीत जो. ॥ ११ ॥ ऐसें हें [14]तत्वमसि महावाक्य । जाणीतल्या जीवेश्वरासि ऐक्य । आणी [15]प्रणव-बीजीं गुणत्रयपंचक । तें पंचीकरण बोलिजे. ॥ १२ ॥ ब्रह्मसागरीं तरंग आले । ते निजस्वरूपासी विसरले । अविद्या जीवत्व नांवें ठाकलें । देहादिकीं. ॥ १३ ॥ जैं होय ज्ञानसूर्याचा प्रकाशु । तैंचि [16]द्वैत[17]संन्यासु । शुद्धांश जाहलिया ब्रह्मीं [18]सौरसु । ऐक्य भावा. ॥ १४ ॥ इति श्री महावाक्य-

---

१. संसाररहित. २. आधाररहित, आश्रयरहित. ३. संगरहित, विकाररहित. ४. तार्किक हे एकमतवादी आहेत. नित्यज्ञान, नित्यप्रयत्न, नित्यइच्छा, इत्यादि गुण ईश्वराला आहेत. म्हणून तो असंग नव्हे कारण असंगाला नियंतृत्व अयोग्य आहे असें तार्किक मानतात. (नित्यज्ञान प्रयत्नेच्छा गुणानीशस्य मन्वते । असंगस्य नियंतृत्वमयुक्तमिति तार्किकाः ॥ ९ ॥ सार्थपंचदशी—चित्रदीप—पृष्ठ ६५.) ५. जीवेश्वरपण=जीव हाच ईश्वर, आत्मा असें मानणें तें. ६. नाशिवंत. ७. चैतन्यरूप आकाश अथवा ब्रह्म. ८. सर्व प्राणिमात्रांच्या ठायीं व्यापून असणारा. ९. अविनाशी, शाश्वत, नित्य असणारें तत्व. १०. गुणरहित. ११. कांहीं विकार न होतां एकाच स्वभावानें जो कालास व्यापक असतो तो. (आत्मा, आकाश इ०.) १२. वेढलेला. १३. उत्तम पुरुष त्यालाच परमात्मा म्हणतात, तोच सर्वकाळ राहाणारा सर्वश्रेष्ठ, तो त्रैलोक्याला व्यापून त्याचें धारण पोषण करतो. (उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः । यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥ (भगवद्गीता—अ० १५ पृष्ठ २४.) १४. 'सदेव सौम्ये दग्र आसीदेकमेवाद्वितीयम्' या श्रुतीनें सृष्टीच्या पूर्वीं जी स्वगतादि भेदशून्यरहित सद्वस्तु होती ती आतांही तशीच आहे असें दाखविण्यासाठीं येथें तत्पदाचा उपयोग केला आहे. (तत्वमसि) म्हणून तत्पद=सद्वस्तु. असि=हें क्रियापद 'तत्' आणि 'त्वम्' या दोन्ही पदांचें ऐक्य सांगितलें. (तत्वमसि हें वाक्य सामवेदांत छांदोग्य श्रुतींत आहे.) 'श्रोतुर्देहेंद्रियातीतं वस्त्वत्र त्वंपदेरितम् । एकता ग्राह्यतेऽसीति तदैक्यमनुभूयताम्. ॥ ६ ॥ सार्थपंचदशी विद्यारण्य–पृष्ठ ५०.) १५. प्रणव=ओंकार. १६. ईश्वर आणि आपण जीव वेगवेगळे आहों असें समजणें. १७. न्यास करणें=नाहींसें करणें. १८. अभिप्राय.

**पंचीकरण । ज्ञान**देव वदे जाण । ऐकतां होय पूर्ण ज्ञान । हे **नि**वृत्ति-कृपा. ॥ १९ ॥

---

## अध्याय[1] तिसरा.

**आधारे लिंगनाभौ प्रकटितहृदये तालुमूले ललाटे**
**द्वे पत्रे षोडशारे द्विदशदशदले द्वादशार्धे चतुष्के ।**
**वासांते बालमध्ये डफकठसहिते कंठदेशे स्वराणां**
**हंक्षंतत्वार्थयुक्तं सकलदलगतं योगमार्गे प्रसिद्धम् ॥ १ ॥**

आधार चक्र गुदस्थानीं वर्ण राता । रिद्धिसिद्धि आणि **गणे**श देवता । ईश्वर दैवत्य चतुर्थदळीं अवस्था । जपु सहा शतें ॥ १ ॥ स्वाधिष्ठान लिंग-स्थानीं पीतवर्ण । अग्नि ऋषि **ब्र**ह्मा दैवत जाण । आपण सावित्रि शक्ति षड्-दळीं स्मरणें । जप सहा सहस्र ॥ २ ॥ मणिपूर चक्र नाभिस्थानीं वर्णनिळा । **वि**ष्णु दैवत्य आणि **क**मळा । वायु ऋषी त्या द्दश दळा । जप सहा सहस्र ॥ ३ ॥ अनुहत चक्र हृदयस्थानीं । **उ**मा शक्ति देवता **पि**नाकपाणी । सूर्य ऋषी द्वादश दलमणि । जप सहा सहस्र ॥ ४ ॥ विशुद्धचक्र कंठस्थान शुभ्रवर्ण । तेथें जीव दैवत अविद्या शक्ति जाण । वक्त ऋषी षोडश दळीं स्मरणें । जप सहस्र एक ॥ ५ ॥ अग्निचक्र ज्योतिवर्ण भूवांतरी । तेथें हंस ऋषी माया शक्ति अवाधरी । परमहंस देवता त्या द्विपात्रीं । जप सहस्र एक ॥६॥ सहस्र दल ब्रह्मरंध्र निर्धारीं तेथ । गुरु दैवत्य ऋषि परमदैवत । तेथें ज्ञा-नशक्ति उर्ध्वं द्वारें संचरत । पवनु संचे. ॥७॥ सहस्र दळ तें अहंकाराचें मूळ । अनेकवर्ण नानाध्वनि निर्मळ । सहस्र एक जपु सोहंबीज केवळ । तें गुरुस्थान म्हणिजे. ॥ ८ ॥ 'वं' पासुनी 'स' अंतरीं,[2] । हीं बीजाक्षरें जाणावीं आधारीं । 'ब' पासुनी 'ल' भीतरी, । हीं स्वाधिष्ठानीं. ॥ ९ ॥ 'ड' पासुनी 'फ' पर्यंत जाण । मणिपुरीं बीजांचें गणन । 'क' पासुनी 'ठ' पर्यंत जाण । अनुहत

---

१. या अध्यायांत 'योगशास्त्रोक्त सप्तचक्रें आणि त्या त्या स्थानच्या देवता, जप, चक्रांची नांवें इत्यादि भाग उघड करून सांगितला आहे. २. योगशास्त्रोक्त 'अ'पासून 'ज्ञ'पर्यंत ५२ मूलबीजाचे ६ मंत्र षड्चक्रांत होणारे यांत कोणच्या चक्रांत कोणच्या बीजमंत्राचा अजपा नांवाचा जप होतो हें सांगितलें आहे.

चक्रीं. ॥ १० ॥ निवांत चक्रीं मातृका सोळा । ‘ह’ पासुनी ‘क्ष’ पर्यंत अ-ग्निकमळा । ‘ज्ञ’ हें सोज्वळ सहस्रदळा । उरलें तें बीज. ॥ ११ ॥ ऐसें हें अजपा बावन[1] अक्षरी बीज । यामध्यें सोहं शब्द तो मंत्र निज । एकवीस स-हस्र सहा शतें जप सहज । श्वासोच्छ्वासीं. ॥ १२ ॥

---

## अध्याय चौथा.

त्रिपुटी[2] श्रीहाट गोल्हाट । पादुका तळीं औटपीठ । भ्रमर गुंफा ब्रह्मरंध्र[3] सेवट । तें स्थान ‘कें’ आत्मयाचें. ॥ १ ॥ मुखीं बोलिजे त्रिकुट । तेथें पृथ्वी तत्व ऋषी श्रेष्ठ । आचार लिंग ऋग्वेद प्रकट । पाहें तेथें खुण. ॥ २ ॥ तेथें ग्रासूनि अवस्थांची परि । कमलासन देव अवधारी । हे समस्त हेमवर्ण साजिरी । दिसते सुरग. ॥ ३ ॥ रसने नेहटीं श्रीहाट स्थान । तेथें आप ऋषी नांदे आपण । गुरुलिंग यजुर्वेद कारण । पाहें तेथें हे खूण पैं. ॥ ४ ॥ तेथें पाहें पश्चिम अवस्था । आणि कमलावल्लभ देवता । क्षीरवर्ण या समस्तां । शोभावती ॥ ५ ॥ चक्षुस्थानीं गोल्हाट कमळ । तेथें तेज ऋषी करि झळाळ । व लिंगीं सामवेद केवळ । असे तेथें. ॥ ६ ॥ सुषुप्ती[5] अवस्था तियेस्थानीं । आणि देवता पिनाकपाणी । हेम झळाळ समस्त मिळोनी । दिसती सुरंग. ॥ ७ ॥ ययांतीं अग्नि वोढियण पूर्णगिरि । तेथें वायु ऋषी बोले नानापरी । जंगमवेद उच्चारी । अथर्वण जो. ॥ ८ ॥ तेथें तुर्यावस्था चौथी । आणि ॐकार देवता म्हणती । हीं अवघीं नीलवर्ण शोभती । समस्त तेथें. ॥ ९ ॥ श्रोत्रस्थानीं गुंफा भ्रमर । तेथें आकाश ऋषी महाथोर । प्रसाद लिंगीं होय उच्चार । सूक्ष्म वेदाचा. ॥ १० ॥ तेथें अवस्थाते उन्मनी[6] बाळी ।

---

१. अजपा या नांवाचा ५२ मूलबीजोक्त योगशास्त्रांत जप सांगितला आहे. या मंत्राच्या सिद्धीनें जो ब्रह्म साक्षात्कार होतो तेंच अजपाजप ब्रह्म होय. २. या अजपा ब्रह्मांडांतील त्रिपुटी (१ श्रीहट २ गोल्हाट ३ औटपीठ) ही होय. ३. तालुस्थान, दहावें द्वार. ४. ककार मुख=ब्रह्मरंध्र. (यालाच कित्येक महाराष्ट्र कवींनीं काकीमुख असें म्हटलें आहे.) ५. गाढनिद्रा, योगनिद्रा. ६. तत्वं बीजं हटक्षेत्रमौदासिन्यं लयं त्रिभिः । उन्मनीराकल्पलतिका सद्य एवोद्भविष्यति ॥ ४ ॥ एकं सृष्टिमयं बीजं एका मुद्रा च खेचरी । एको देवो निरालंबो एका मुद्रा मनोन्मनी ॥ ५॥ शंखदुंदुभिनादं च न शृणोति कदाचन । काष्टवज्जायते देहो उन्मन्यावस्थया ध्रुवम् ॥ ६ ॥ (हटप्रदीपिकायां चतुर्थाध्याये आत्मारामयोगींद्रेणोक्तम्.)

आणि सदाशिव देवता जवळी । यासी कृष्णवर्णाची झळाळी । मिरवत असे. ॥ ११ ॥ सहस्रदलीं ब्रह्मरंध्र भुवन । तेथें नाहीं वेद अवस्था वर्ण । तेथें सर्वांसी लय होय जाण । गुणवंताशीं. ॥ १२ ॥ तेथें कोटि प्रकाशती प्रभाकर । आणि वोप[1] देती कोटि चंद्र । ते समाधिसुख सेजार । परात्परभुवन. ॥ १३ ॥

---

## अध्याय पांचवा.

सांगणें[2] आतां पवनक्रिया अवधारीं । इडा पिंगळा सुषुम्ने माझारी । यांचीं भिन्न सामर्थ्यें शरीरीं । ते पवन छिद्रीं. ॥ १ ॥ वाम इडा दक्षिण पिंगळा । मध्यें सुषुम्नात्रिवेणी मेळा । तेथें सर्व अमृत संजीवनीचा कळा । ते सेविल्या अमरत्व पाविजे. ॥ २ ॥ उष्णकाळीं पोळलिया उष्णें करुन । तो अर्ध चंद्र ऊर्ध्वं करी पवन । तरी शीतळता होय प्राण । संतोष मानिजे. ॥ ३ ॥ शीतकाळींही पिडलिया त्वचा । तो अधः[3]सूर्य उर्ध्व करी पिंडींचा । तरी आ-

---

१. कांति. २. ज्ञात्वा सुषुम्ना सद्भेदं कृत्वा वायुं च मध्यगम् । स्थित्वा सदैव संस्थाने प्राणरंध्र निरोधयत् ॥ १७ ॥ पवनो बाध्यते येन मनस्तेनैव बाध्यते । हेतुद्वयं तु चित्तस्य वासना च समीरणः ॥ २० ॥ तयोर्विनश्य एकस्मिन्नुभावमिव नश्यति । यत्रैव लीयते वायुर्मनस्तत्रैव लीयते ॥ २१ ॥ (हटप्रदीपिकायां चतुर्थाध्याये–आत्मारामयोगींद्रेणोक्तम्). ३. योग्यांला आपल्याच देहांतील सूर्यचंद्रादिकांचीं स्थानें प्रकाशित करून शीतउष्णादिकांची बाधा निवारण करतां येते. यासंबंधानें निवृत्तिनाथ, ज्ञानोबा इ० यांनीं एक चमत्कार एका प्रसंगीं करून दाखविल्याविषयीं एक आख्यायिका प्रसिद्ध आहे ती अशी:—विसोबा नांवाचा एक ब्राह्मण बार्शी येथील देशपांड्या आणि कुलकर्णी होता. हा मोठा नास्तिक व पाखांडी असे. प्रसंगवशात् निवृत्तीनाथ वगैरे भावंडें बार्सी गांवीं गेलीं होतीं. हीं संन्याशाचीं मुलें अशा संबंधानें त्यावेळीं ब्राह्मणमंडळीकडून यांचा मोठा तिरस्कार होत असे. यांच्या साधुत्वाविषयीं आणि साक्षात्काराविषयीं जिकडे तिकडे आख्या पसरली होती. ती विसोबा देशपांडे यांस न खपून द्वेषबुद्धीनें, यांची फजिती करण्याचा त्यानें निश्चय केला; आणि एक दिवस बार्सी गांवांत सर्व लोकांस ताकीद देऊन असा बंदोबस्त करविला कीं, ‘स्वयंपाक करण्यास यांना लांकूड, अग्नि, धान्य वगैरे कांहीं मिळूं नये.’ ज्ञानोबाचे धाकटे बंधु सोपान यांनीं एका ब्राह्मणाकडे मांडे भाजलेले पाहिले आणि ते खाण्याची इच्छा झाल्यामुळें त्या ब्राह्मणाकडे मांड्यांविषयीं विनंति केली. पण ब्राह्मणानें तिचा धिःकार केला. ही गोष्ट निवृत्तिनाथांस समजल्यावर त्यांनीं पिठाची वगैरे सिद्धता करून मांडे तयार करवून आपल्या बंधूची इच्छा तृप्त करण्याविषयीं तयारी केली होती; पण त्याच दिवशीं विसोबानें गांवांतील लोकांकडून यांना कांहीं साहित्य

श्रयो न लागे अग्नीचा । प्रावर्ण कदांही नलगे. ॥ ४ ॥ क्षुधाकालीं क्षुधित होतां प्राण । ते सत्रावीचें[1] कीजे दोहन । देहींची निवर्ते भूक तहान । भोजनाची चाड[2] नाहीं. ॥ ५ ॥ परी हें देहीं साधलें नाहीं कवणा । वावगाच करिती बोलाचा उगाणा[3] । नानावेष धरूनि जाणा । नाडीत असती. ॥ ६ ॥ ऐशिया पवनाभ्याशीं प्रवर्त्तोनी । कळावें वचन आत्मज्ञानीं । धरूनि भाव अंतःकरणीं । अमर व्हावें. ॥ ७ ॥

---

## अध्याय सहावा.

असो हें आतां एक अवधारीं । अष्टदलकमल असे हृदयसरोवरीं । तेथें मन्मथ भ्रमण करी । निरंतर पैं नांदे. ॥ १ ॥ पूर्व दल श्वेतवर्ण जाणा । तेथें प्रवेश होय जरि मना । तरी धैर्य औदार्य पुण्यवासना । उपजे शरीरीं. ॥ २ ॥ अग्निदलीं वर्ण बोलिजे रांता । तेथें मनाची होय जरी स्थिरता । तरी आलस्य चिंता । शोक उपजेना. ॥ ३ ॥ दक्षिण दलीं वर्ण काळा । तेथें मन अनुसरे जे वेळां । तरी क्रोध द्वेष दुष्ट वासनें वेगळा । नव्हे देह तो. ॥ ४ ॥ नैर्ऋत्य कोनींचें पातें, । बोलिजे निमे तेथें । मन मधुकर खेळवीतें । पुत्र स्नेह मोह-

---

सिद्धूं नये अशी तजवीज केली होती. माळावर एका कुंपणांत हीं भावंडें उतरलीं होतीं तेथें माध्यान्ह काळाच्या सुमारास विसोबा हा जाऊन चोरून पाहूं लागला; कीं आतां पुढें हीं काय करणार. 'पोटोबापुढें विठोबा काय करतो तो पाहूं;' अशा हेतूनें गुप्तपणें पाहात राहिला. इकडे माध्यान्हकाळचा समय येतांच कांहीं साहित्य नाहीं असें पाहिलें आणि निवृत्तिनाथांनीं आपल्या शरीरांतील सूर्य प्रकाशित करून आपण पडून राहिले. नंतर मुक्ताबाईनें त्यांच्या पोटावर मांडे तयार करून घेतले आणि भक्षण करूं लागलीं. हा चमत्कार विसोबानें पाहतांच तो जागचे जागीं थिजून गेला आणि पश्चात्ताप होऊन तो त्या आवारांत जाऊं लागला; तेव्हां निवृत्तिनाथाचें भोजन चाललें होतें. व आवाराची ताटी उघडी होती. विसोबानें आंत येऊं नये म्हणून निवृत्तिनाथांनीं ताटी बंद असा उच्चार केल्याबरोबर आपोआप ताटी बंद झाली. (या प्रसंगाचे ताटीबंद म्हणून यांचे कांहीं अभंग आहेत). आणि विसोबाचा प्रवेश आंत होईना तेव्हां विसोबा निवृत्तिनाथांस शरण जाऊन 'मी पतित अपराधी आहें, मला मुक्त करा' अशी प्रार्थना केल्यावरून निवृत्तिनाथांस त्याची दया आली. आणि त्यांनीं विसोबास खेचरी नांवाची मुद्रा देऊन ब्रह्मोपदेश केला. खेचरी मुद्रा दिल्यामुळेंच पुढें तो विसोबा खेंचर या नांवानें मोठा भगवद्भक्त होऊन प्रसिद्धीस आला. हाच नामदेवाचा गुरु होय.

१. सत्रावी कळा ज्ञानशक्ति, अमृतसंजीवनी. २. इच्छा. ३. अनुभव, झाडा. ४. तांबडा.

जाळें गुंतला. ॥ ५ ॥ पंचमदलकमल पिंवळावर्ण बोलिजेत। तेथें मन जैसें विचरत। तरी क्रीडा विनोद आल्हाद भरित। सुखिया होय. ॥ ६ ॥ वायव्य कोनींचें पातें श्यामवर्ण जाणावें। तेथें मन जरी स्थिरावे। तरी तीर्थासि वाटतें जावें। साधुदर्शनासी. ॥ ७ ॥ उत्तर पाकोळिका बोलिजे पीतवर्ण। तेथें जरी संचार करी मन। तरी अष्टभोग सुख जाण। करूं उपजती. ॥ ८ ॥ ईशान पांकोळिका बोलिजे गौरवर्ण उत्तम। तेथें जरी मनासी होय विश्राम। तरी श्रवण कीर्तन धर्म। उपजे देहीं. ॥ ९ ॥ मनासी प्रवेश जाहलिया संधीं। मध्यें स्थिरावलीया निद्रा समाधी। तैं आत्मा पिंडे रोग व्याधीं। कां विश्रांति उपजे. ॥ १० ॥ ऐसें एका प्रहराचें प्रमाण। मन कळिकेशीं भ्रमर करी अनुसंधान। ऐसें अष्टदल[1] कमल ज्ञान। बोधिलें एका. ॥ ११ ॥ एवं हें परमार्थसाधन। परोपकारार्थ निवेदन। वसिष्ठराम[2]संवादकथन। म्हणे ज्ञानदेवो. ॥ १२ ॥

---

## अध्याय सातवा.

ऐसा हा मनमार्ग विचारितां, । हा जीव सुखदुःख भोगितां। तरी कर्म काय करिजे तत्वता। बोलिजती. ॥ १ ॥ म्हणोनि हें सांगावयाची कुडें[3]। कां जें सदा जीवासि सुखदुःख आवडे। तरी मनाचेनि संगें सुख भोगाकडे। केंवि जाय. ॥ २ ॥ तरी पाकोळिका सांग पालटूनि मनीं। तरी इंद्रियनेम करिती पिंडज्ञानीं। आणि संगरहित होउनी। स्मरणें मुक्ती पावले कीं. ॥ ३ ॥ आतां एका तार्किकाचा पक्ष। म्हणती वस्तुतें शाश्वत न मानी मोक्ष। म्हणती वस्तु देखिजे प्रत्यक्ष। इहीं डोळां. ॥ ४ ॥ तरी भूचरी खेचरी चराचरी। चौथी बोलिजे अगोचरी। ते दृष्टिद्वारें लक्षितां निर्धारी। मानिती मोक्ष. ॥ ५ ॥ चराचरीतें आडवे दृष्टी पाहाणें। भूचरी नाकाचे अग्रीं लक्ष

---

१. अष्टदल हें हृदयस्थानीं मानितात. त्याच्या ८ पांकळ्या मानितात. (साधारण व्यवहारांत बोलण्याची चाल आहे 'काय बुवा त्याच्या मनाच्या पांकळ्या वारंवार बदलतात,) तें हेंच कमल होय. २. हा पवनयोग योगवासिष्ठ यो० वा० श० प्र० स० ७८ श्लो० ८ नामक ग्रंथांत वसिष्ठानें रामास सांगितला आहे. याच ग्रंथांवर श्री रंगनाथ स्वामी निगडीकर यांनीं रंगनाथी योगवासिष्ठसार नामक टीका केलेली प्रसिद्ध झाली आहे. त्यांतील मनोलय प्रकरण पृष्ठ २९ पासून ३४ पहा. ३. वाईट, वांकडें, खोटें.

लावणें । खेचरी आकाशीं लक्ष लावणें । तिमिरातें. ॥ ६ ॥ गोचरी म्हणिजे दृष्टीची मिळणी । अंतर अवलोकिती बैसोनि आसनीं । म्हणती वस्तु दृष्टीं तत्वज्ञानी । आपणासी. ॥ ७ ॥ परी हें अवघेंचि [१]खंडज्ञान । जंववरी देहीं असे वर्तमान । हें नासलिया नाहीं दर्शन । डोळियांचें. ॥ ८ ॥ विदेह वर्ततां दृष्टी नासे । मग कोणीच पदार्थ न दिसे । हातीं धरूनि वागविती माणसें । आंधळे म्हणोनि. ॥ ९ ॥ म्हणूनि निजवस्तु सर्वांहुनी सार । पाहतां वेदांसी अगोचर । देखिलिया नाहीं सार । देहधर्मेचि. ॥ १० ॥ त्यासि नाहीं क्रोध द्वेष काम राग । मद मत्सर स्त्री विषयसंग । त्या देखणियां नाहीं भंग । घटमटभोगीं. ॥ ११ ॥ आणि वस्तु देखिजे डोळां । तरी लाहिजे ब्रह्मानंदाचा सोहळा । तरी विषयसुख आगळा । कां सेविजती. ॥ १२ ॥ जैसें परिसाचें जाहलिया स्पर्शन । लोहाची जरी न फिरे कालिमाहीण । तरी काय मानावें साचपण । परिस योगाचें. ॥ १३ ॥ म्हणोनि बोलतां दूषण असे । जे कांहीं डोळां परवस्तु दिसे । मग तया सूर्यप्रकाशाचें असे । काय काज तया. ॥ १४ ॥ तरि हें अवघें [२]मृगजळ । वाउगेच शब्दाचे पाल्हाळ । जे देखणें परवस्तु केवळ । तया अनंत डोळे. ॥ १५ ॥ जरी परवस्तू देखणें घडे । तरी सर्व दैन्य दरिद्र विघडे । कुकर्मीं पडिले बापुडे । अनाथ जीव हे. ॥ १६ ॥ म्हणोनि आधीं वस्तु शास्त्रें पाहिजे । मग निष्ठेकरूनि पाविजे । तरीच त्या परब्रह्मीं मिश्रित होइजे । जेंवी लवण जळीं. ॥ १७ ॥ जैसी [३]कीटकभ्रूण जळुका । तियेसी पालटुनि भिंगुटिये जवळिका । तैसें देखिलिया ब्रह्मव्यापका । मग जीवदशा कैंची. ॥ १८ ॥ जैसें [४]अंजन सूदलिया पायाळा । भूमि फोडूनि निधान दिसे डोळां । तैसी वस्तू देखिलिया कवण वेळां । [५]वेव्हसाव मग नाहीं. ॥ १९ ॥

---

१. अर्धवट, अर्धकच्चें. २. सूर्याच्या माध्यान्ह काळच्या किरणांमुळें भासणारा पाण्यासारखा भास. हें पाणीच असें समजून मृगें धांवधांवून थकतात, पण पाणी मुळींच नसतें, यावरून याला 'मृगजल' म्हणतात. ३. कीटक=कीडा. भ्रूण=बालक. (कुंभारीण नांवाची एकजातीची भिंगुटी ही आपल्या घरट्यांत एक लहान किड्याचा सुरवंट नेऊन त्याला टोंचून टोंचून आपल्या रूपाला पोंचविते. ४. एकप्रकारचें सिद्धांजन. जो मनुष्य पायाकडून उत्पन्न होतो त्याचे डोळ्यांत हें घातलें असतां भूमिगत द्रव्याचा ठेवा त्याचे दृष्टीस पडतो असा समज आहे. ५. व्यापार, घडामोड, व्यवसाय.

# जनार्दनकृत[1]

## ११. रामस्तुति.

(श्लोक.)

देव सर्व इंद्रादि धेनुयज्ञपाशा, त्रास देत दैत्यराज लंकनाथ नित्यशा ।
भूनिमित्य ब्रह्मदेव शेषशायि[2] वीनवी, रामराज भक्तकाज वेषधारि[3] लाघवी[4]. १
भानुवंशि पूर्णब्रह्म रामरूप शोभलें, ताटिकेसि मोक्षदान, अध्वरासि[5] रक्षिलें. ।
अहल्येसि उद्धरोनि गौतमासि तोषवी, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी. २
त्र्यंबकासि[6] मोडितांचि दैत्य देव कांपती, माळ घालि भूमिजा सुमन[7] सूर[8] वर्षती ।
पाहतांच वीर्य शौर्य[9] शक्तिही न भार्गवीं, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी. ३
पितृवाक्य सत्यनेम दावि भाव हा जना, निघे वनाप्रतीच शीघ्र सूरकार्यसाधना[10] ।
सितेसह पंचवटीवासी तटीं जान्हवी, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी. ४
मृगवेष[11] राक्षसासि मारि नीच हस्तकीं, रामशुद्धि[12] देवरासि[13] पाठवितां जानकी ।
सीता नेत लंकनाथ आदिशक्ति वैष्णवी, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी. ५
अनेक भक्त तारुनी सुग्रिवासि गौरवी, वाळि मारि, रामचंद्र कपिसैन्य आणवी ।
सीताशुद्धितें आणुनी शिळा सेतु बांधवी, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी. ६
रावणासि बोधनार्थ शिष्ट राम पाठवी, गर्वरासि[14] नायकेचि मृत्यु त्यासि वोढवी ।
सकुटुंब रावणासि स्वर्गसुखा बोळवी, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी. ॥ ७
वासवादि दिग्पती करोनि [15]बंधमोचना, राज्यपदीं चिरंजीव[16] स्थापिलें बिभीषणा ।
सितेप्रती दिव्य[17] देत कीर्तिघोष गाजवी, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी. ॥ ८

---

१. एकनाथाचे गुरुबंधु जनीजनार्दन यांचें नांव जनार्दन असें होतें. परंतु एकनाथाच्या वेळच्या भाषेची सरणी व ह्या प्रकरणाची शैली यांमध्यें महदंतर असल्यामुळें हा कवि कोणी निराळा असावा. जनार्दनकृत (१) दामाजीपंतचरित्र–१० आर्या व (२) कांहीं पदें इतकी कविता आमच्यापाशीं आहे. २. भगवान्, श्रीविष्णु. ३. मनुजवेषधारी. ४. क्रीडा करणारा. ५. विश्वामित्राच्या यज्ञाला. ६. त्र्यंबकचापाला. ७. पुष्प. ८. देव. ९. [रामाचें] शौर्य, वीर्य पाहतांच भार्गवीं शक्तिही न–असा अन्वय. रामाचें शौर्य व पराक्रम पाहून भार्गवरामाला शक्ति नाहींशी झाली, भार्गवरामाची कंबर खचली. १०. देवांचें कार्य साधण्यासाठीं, रावण मारण्यासाठीं. ११. मारिच नामक राक्षसास. 'नीच' हें राक्षसाचें विशेषण. १२. रामाचा शोध करण्यासाठीं. १३. दिरास (लक्ष्मणास). १४. फार गर्विष्ठ (रावण). १५. रावणानें सर्व देवांस बंदींत घातलें होतें त्यांस रावणाला मारून रामानें मुक्त केलें. १६. सतत, चिरंतन. १७. दिव्य देणें=अग्नींतून बाहेर येणें.

**अयोध्येसि येउनी भेटि भरतबंधुची, पट्टाधीश रामराव ध्वजा यश कीर्तिची ।**
**करी दया जनार्दना तरीच देह सोडवी, रामराज भक्तकाज वेषधारि लाघवी.९**

---

# [1]रामचंद्रमल्हारकृत

## १२. [2]सुभद्राहरण.

(श्लोक.)

विमल दिव्य कथा शुक[3]भारती, मुनि [4]मनें श्रवणासि [5]उभारिती ।
सकळशास्त्रविचारसमाज तो, हरिचरित्रकथारस माजतो. ॥ १
म्हणतसे मुनिलागिं [6]परिक्षिती, 'हरिकथारस हे मज रक्षिती ।
[7]अखिल [8]अर्थ तुझ्या मुखसारसा, कथिं पुसेन [9]तयांतुनि [10]सारसा. ॥ २

---

१. ह्या कवीविषयीं कांहीं माहिती उपलब्ध नाहीं. ज्या वहींतून हें प्रकरण उतरून घेतलें ती सुमारें ६०।७० वर्षांपूर्वींची जुनी आहे. २. ही कथा इतकी सुप्रसिद्ध आहे कीं, तिजविषयीं येथें कांहीं लिहिण्याची जरूर नाहीं. असें असून ह्या कथानकावर कोणीही कविता लिहिली नाहीं ही आश्चर्याची गोष्ट आहे. ही कथा श्रीमद्भागवत–दशमस्कंध अध्याय ८६ यांत आहे. [मोरोपंतकृत कृष्णविजय उत्तरार्ध अध्याय ८६; काव्यसंग्रहग्रंथमाला–पृष्ठें २८८-२९४ पहा.] शिवाय ही कथा व्यासप्रणीत महाभारतांतर्गत आदिपर्व–अध्याय २१९-२२१ यांत आहे. [मोरोपंतकृत आदिपर्व–अध्याय ३७ गीति ४२-६९: काव्यसंग्रहग्रंथमाला–पृ० २१४-२१७ पहा.] परंतु भागवतांतील कथेंत व भारतांतील कथेंत फरक आहे. ३. भारती=वाणी. ४. भक्तीनें, मनोभावानें. ५. ध्यान लावून ऐकण्यास तयार होती. श्रवण उभारणें–हा शब्दसमूह कोशकारांस उपयोगी आहे. ६. अभिमन्यूला उत्तरेपासून झालेला मुलगा (परीक्षिति). परीक्षिती असें नांव पडण्याचें कारण:–परि (सभोंवतीं) ईक्षते (पाहतो) तो परीक्षित्. पूर्वीं माता उत्तरेच्या गर्भांत असतां जी कृष्णमूर्ति पाहिली होती ती ह्याच्या मनांत नेहमीं घोळत असे, तेव्हां कोणी पुरुष भेटला असतां तो 'गर्भांत दिसलेला पुरुष तर नसेलना' असा विचार मनांत येऊन त्याजकडे निरखून पाही म्हणून त्याला 'परीक्षित्' असें नांव पडलें. ७. परीक्षिति राजा शुकमुनीला म्हणतो:–अखिल अर्थ (हरिकथांचा सर्व अर्थ मतलब, तात्पर्य) तुझ्या मुखसारसा (तुझ्या मुखकमलांत वास करीत आहेत, तुला माहीत आहेत, तुला येत आहेत.) तयांतुनि (त्या कथांतून) सारसा (उत्तम, चांगल्या) पुसेन (विचारीन) [त्या] कथीं (सांग)–असा अर्थ. ८. अर्थ=उद्देश, भावार्थ. ['**अर्थः** प्रकारे विषये वित्तकारणवस्तुपु । अभिधेये च शब्दानां वृत्तौ चापि प्रयोजने ॥' इति विश्वः. '**अर्थः** प्रयोजने वित्ते हरे त्वभिप्रायवस्तुपु । शब्दाभिधेयविषये स्यान्निवृत्तिप्रकारयोः ॥' इति विश्वलोचनः.] ९. 'तयां मुनि! सा रसां' असाही पाठ आहे. १०. सरस, रसयुक्त, उत्तम.

सुभद्रासती[1] माय[2] माझ्या पित्याची[3], वैरी[4] पार्थ हो[5] कीर्ति अद्यापि त्याची ।
स्वसा[6] रामकृष्णादिकांलागिं[7] होती, कथा सांग[8] कैसी ? मुनींद्रा ! अहो ! ती.'॥ ३
'ऐकें नृपा !' म्हणतसे मुनिवर्य वाचे, 'जे सुप्रताप तव पूर्वजवैभवाचे ।
राजश्रितांवरि[10] विशिष्ट[11] गुणीं विराजे, ज्याला समस्त निजसेवक तेंवि[12] राजे[13]. ॥ ४

करी तीर्थें यात्रा विविध सकळ हिंडोनि वसुधा[14]
प्रभासातें[15] आला परमविजयी पांडवसुधा[16] ।
अनायासें तेथें जन वदति ऐकें मनवरी[17]
स्वमामाची[18] कन्या अतिचतुर उद्दाम[19] नवरी. ॥ ५

मातापिता स्वजनबंधु वडील मानें[20], जे आथिले[21] सकळ साधन विक्रमानें[22] ।
त्यांचा विचार नसतांचि सुयोधनातें, ना तें धरीत[23], हलधारक होय नीतें[24]. ॥६

---

१. सती=सुचरित्रा स्त्री, विमलयशा, साध्वी. २. आई, माता. ३. अभिमन्यूची. येथें अभिमन्यूची असें सरळ न म्हणतां पर्यायानें तोच अर्थ जाणविला आहे म्हणून येथें **'पर्यायोक्त'** अलंकार झाला. ४. पाणिग्रहण करी, लग्न करी. ५. 'जो' असाही पाठ आहे. ६. बहीण. ७. बळराम व कृष्ण यांची. राम=बळराम. 'राम' शब्द बलराम, बलदेव या अर्थी योजिला आहे. कित्येक शब्दांचीं दोन दोन रूपें असतात, एक मोठें व एक लहान. केव्हां केव्हां शब्दाचें समग्र रूप न योजितां त्याचा अवयव योजण्याचा संप्रदाय 'शब्दा अवयवेष्वपि वर्तंते' या न्यायानें आहे:—भीम=भीमसेन, सत्या=सत्यभामा, राम=बलराम इत्यादि. तसेंच पुढील श्लोकांत अशा प्रकारच्या कांहीं शब्दांचा संग्रह केला आहे:—'गोदा गोदावरी नद्यां मथुरा मथुरापुरी । कविकं कविकायां च स्याद्गवेधौ गवेधुका ॥' [शब्दभेदप्रकाश]. ८. 'स्वसा रामकृष्णादिकांला अहो! ती' असाही पाठ आहे. ९. 'सांग' या एकवचनी क्रियापदाचा कर्ता 'मुनींद्र' हा असून त्याला 'अहो!' हें अनेकवचनी संबोधन लाविलें आहे. हा प्रकार चिंतनीय आहे. 'निरंकुशाः कवयः' या न्यायानें असे दोष क्षम्य आणि वंदनीय आहेत. १०. राजाच्या आश्रितांवर. अर्जुन त्या आश्रितांहून श्रेष्ठ होता—असा भाव. येथें कवीनें 'राजाश्रित'च्या ठिकाणीं 'राजश्रित' असें रूपांतर केलें आहे. ११. असामान्य, असाधारण, उत्कृष्ट. १२. येथें निजसेवक व राजे यांत साम्य मानल्यामुळें **'उपमा'** नामक अलंकार झाला आहे. १३. जो (अर्जुन) सर्व राजांपेक्षां श्रेष्ठ होता, ते राजे केवळ अर्जुनाचे सेवकच होते—असा भावार्थ. १४. पृथ्वी. १५. द्वारकेजवळील तीर्थास. १६. पांडवश्रेष्ठ. येथें 'सुधा' हा शब्द कवीनें 'श्रेष्ठ' या अर्थी योजिला असावा. १७. बातमी, मात. (?) १८. वसुदेवाची. येथेंही **'पर्यायोक्त'** आहे. १९. येथें 'उद्दाम' या शब्दाचें कांहीं स्वारस्य दिसत नाहीं. २०. मानानें, योग्यतेनें. २१. प्राप्त करून घेतले होते. २२. पराक्रमानें. २३. न धरणें=मनास न आणणें, अमान्य करणें, मान्य न करणें. २४. तें न मानल्यामुळें (वडील माणसांचें अनुमो-

[१]वंचावया हलधरासि उपाय केला, 'आणूं' म्हणे, 'हरुनी [२]यादवकन्यकेला.'।
[३]दंडीयतीगति उभारुनि [४]भव्य साची, [७]द्वारावतीस मग चालत [५]सव्यसाची. ॥ ७
आला [६]गुडाकेश कुशस्थळीला, टाकी यती सर्व [८]गृहस्थलीला ।

---

दन नसतां त्यांची अवज्ञा केल्यामुळें) तें नातें (सुभद्रासुयोधनविवाह) हलधारक होय. (एखाद्या नागऱ्यानें—हलधरानें—ठरविल्याप्रमाणें झालें—कार्यसिद्धि घडून आली नाहीं, वेत फसला.)

१. फसवाया. २. सुभद्रेला. 'पर्यायोक्त' अलंकार. ३. त्रिदंडीयतिगति. [याच्या उजव्या हातांत तीन दंडांचा एक झालेला असा दंड असतो. मन, वाणी आणि देह यांचें दंडन (शमन) ज्यानें केलें असा संन्यासी. ज्याच्या वाणीनें, मनानें आणि देहानें यथानुक्रम निषिद्ध कथन, असत्संकल्प आणि निषिद्ध व्यापार यांचा त्याग केला आहे असा संन्यासी; मनोदंड, कायदंड आणि वाणीदंड करणारा पुरुष. 'वाग्दंडोऽथ मनोदंडः कायदंडस्तथैव च । यस्यैते निहिता बुद्धौ त्रिदंडीति स उच्यते ॥' मनुस्मृति—अध्याय १२ श्लो० १०.] ४. मंगलदायक व खरी अशी. ५. अर्जुन. ६. अर्जुन. [गुडाकेश=हा शब्द प्रस्तुत पद्यांत अर्जुन याअर्थीं योजिला आहे. या पदाचा शब्दार्थ 'गुडाका' म्हणजे निद्रा आणि 'ईश' म्हणजे स्वामी. ह्याचा उपयोग 'हृषीकेश' शब्दाप्रमाणें केवळ विशेषनामाप्रमाणें समजावयाचा. 'निद्रेचा स्वामी' म्हणजे निद्रारूप भ्रांतीचा अथवा अज्ञानाचा नियंता, दमनकर्ता. निद्रा ही एक भ्रांती आहे, तेव्हां अशा भ्रांतीस जिंकून जो सदासर्वदा सावध, दक्ष असतो त्यास 'गुडाकेश' असें म्हणावें; परंतु अशा प्रकारची 'गुडाकेश' शब्दाची व्याख्या घेतली असतां तिची संगति सदासर्वदा अर्जुनाच्या व्यवहाराशीं मिळेल असा नेम नाहीं. कारण, अर्जुनाचीं कांहीं कृत्यें अदक्षताद्योतक आढळणार आहेत, तेव्हां 'गुडाकेश' हें नांव अर्जुनास अर्थानुरोधानें यथार्थपणें लागू पडत नाहीं; परंतु अर्जुनव्यतिरिक्त इतरांस 'गुडाकेश' असें म्हणण्याचा व्यवहार नाहीं, म्हणून तें विशेषनाम समजावें. पाश्चिमात्य गीर्वाणभाषाभिज्ञ पंडितांनीं प्रस्तुत शब्दाचा अर्थ कल्पनेनें बसविला आहे तो असा:—गुडा म्हणजे गुळवेल, तिच्या गांठीसारखे ज्याचे केश गुंतलेले आहेत तो 'गुडाकेश'. हा अर्थ काल्पनिक असल्या कारणास्तव त्याजविषयीं जास्त लिहिण्याची आवश्यकता नाहीं. प्रस्तुत शब्दावर **शंकरानंदसरस्वती**कृत गीतेवरील टीकेंत पुष्कळ मोठें व्याख्यान केलें आहे, यांत 'गुडाक' म्हणजे 'शिव' आणि 'ईश' म्हणजे 'स्वामी' यांचा बहुव्रीहि समास करून 'गुडाक आहे ईश ज्याचा तो' गुडाकेश म्हणजे अर्जुन असा एक अर्थ काढिला आहे. आमच्या वाचकांस वामनपंडितांचें पुढील विवरण पहिला अर्थ ध्यानांत धरण्यास चांगलें साधन होईल असा भरंवसा आहे. वामनपंडित आपल्या यथार्थदीपिकेंत असें म्हणतात:—'कीं तो अर्जुन गुडाकेश । गुडाका निद्रा तिचा ईश । निद्रा भ्रांती तिचा प्रवेश । न घडे बुद्धींत अर्जुनाच्या ॥ ७१ ॥ तोच भ्रांतीचा ईश । ज्याच्या मनीं ते न करी प्रवेश । या भावें म्हणे गुडाकेश । अर्जुनातें ॥७२॥' ७. द्वारकेस. [कुशस्थळी या नांवाचें एक देवस्थान गोमंतकांत आहे. कदाचित् हा कवि गोमंतकांत राहणारा असावा.] ८. गृहस्थाश्रमांत करावीं लागणारीं कर्मे त्यानें टाकून दिलीं.

साधावया कार्य पुरींत राहे, नौका जया बोलति ध्या तरा हे. ॥ ८
न जाणतां तो बळभद्र पूजी, दुर्योधनाचा बळवान् रिपू जी! ।
तों तेथ वर्षा ऋतु पातला हो! घे [1]नागरांच्या भजनांत [2]लाहो. ॥ ९
[3]आतिथ्यें [4]अतिनम्रयुक्त वचनीं एके दिनीं [5]नेमुनी
[6]भावार्थें बळराम राजभुवनीं पूजावया ने [7]मुनी ।
केले ते विविधोपचार, धरिलीं अन्नें पुढें [8]सारसें
होतां भोजन बोलिला मग, यती 'भिक्षान्न हें [9]सारसें.' ॥ १०
अकस्मात ते त्या स्थलीं राजबाळा, [10]उदेला जसा कामरूपी [11]बुबाळा ।
[12]मुखें वर्णितां जीसि [13]सीमा न [14]साहे, [15]बळें योगियांच्या [16]हरी [17]मानसा [18]हे. ॥ ११
[19]दिव्यांगी नवयौवना गुणवती [20]बिंबाधरा कामिनी
नेत्रापांग, सलज्ज, [21]हास्यवदनी, सौंदर्य [22]सौदामिनी; ।
[23]रंभोरू, गजगामिनी [24]उपवरा, वेणी [25]सुमध्यावरी,
ऐसें देखुनि मोहला मग यती आश्चर्य तें [26]नावरी. ॥ १२
ऐसा यती कामनिमग्न [27]सारा, दावीतसे [28]दंभकलाप सारा ।

---

१. पौरांच्या, नागरिक जनांच्या. २. लाभ. ३. आदरसत्कारपूर्वक. ४. हा शब्द 'अतिनम्रतायुक्त' असा पाहिजे. ५. एक दिवस नेमून, ठरवून. ६. भक्तिपूर्वक. ७. यतिवेषधारी अर्जुन. ८. षड्रसयुक्त. रस सहा आहेत त्यांचीं नांवें:—'रसाः स्वाद्वम्ललवणतिक्तोषणकषायकाः । षड् द्रव्यमाश्रितास्ते तु यथापूर्वं बलावहाः ॥' [वाग्भट—सूत्रस्थान—अध्याय १ श्लोक १४-१५]; गोड; आंबट, खारट, कडु, तिखट, तुरट असे द्रव्यांमध्यें सहा रस आहेत. ९. सरस, उत्तम. १०. उत्पन्न झाला. ११. बुडबुडा, बुद्बुद. येथें राजबाळा (उपमेय) व बुबाळा (उपमान) यांचें सादृश्य वर्णिलें आहे म्हणून 'उपमा'लंकार झाला आहे. १२. तोंडानें. [मुख शब्दाचे अनेक अर्थ आहेतः—'**मुखं** तु वदने मुख्यारंभे द्वाराभ्युपाययोः' इति यादवः. '**मुख**मुपाये प्रारंभे श्रेष्ठे निःसरणास्ययोः' इति हैमः. '**मुखं** निःसरणे वक्त्रे प्रारंभोपाययोरपि । संध्यंतरे नाटकादेः शब्देऽपि च नपुंसकम् ॥' इति मेदिनी]. १३. जीची बरोबरी होऊं शकत नाहीं. १४. न साहे=न सहन करी; संभवत नाहीं. १५. आग्रहानें. १६. हरण करी. १७. अंतःकरणास, मनास. १८. हे राजबाळा (ही सुभद्रा). १९. सुंदर. २०. तोंडल्याप्रमाणें जिचे ओंठ लाल आहेत अशी. २१. स्मितमुखी. २२. वीज. वीजेप्रमाणें सुंदर. २३. रंभा+ऊरु=केळीसारख्या मांड्या जिच्या अशी स्त्री. 'ऊरूत्तरपदादौपम्ये' (पाणिनि ४-१-६९) या सूत्रानें औपम्यसूचक बहुव्रीहि समासाचें उत्तरपद 'ऊरु'शब्द असल्यास स्त्रीलिंगी तो दीर्घ होतो, जसें कलभोरू, रंभोरू. २४. तरुण. २५. तिची वेणी कमरेपर्यंत पोंचे इतकी लांब होती—असा भावार्थ. २६. आवरेना. २७. पूर्णपणें. २८. सारा (उत्तम) दंभकलाप (ढोंगें) दावीतसे—असा अन्वय.

तेथें सुभद्रा मनयुक्त[1] पाहे, म्हणे, 'घडे तैं भगवत्कृपा हे.' ॥ १३
कामें व्याकुळ पार्थ योजित असे युक्ती अनेका मेना[2]
जीच्या नेत्रकटाक्ष दारुण[3] शरें आंदोळती[4] कामना, ।
पाहे रंध्रें[5] हरावया झडकरी, तों नाकळे[6] ते क्षणीं
क्षोभे चित्त, यती म्हणे, 'गजगती नेईन कंजेक्षणी[7].' ॥ १४
अनंग[8] हा[9] सर्वगुणीं विराजे, हे साम्यता पावति काय राजे? ।
उत्फुल्ल[10] नेत्रीं बहु भाव[11] दावी, वार्ता कशी ते वदनीं वदावी? ॥ १५
कामिनी चपळ चित्तें[12] जो हरी[13], वाटतो नयनवृत्त जोहरी ।
धन्य हा जरि करें[14] शिवे गळा, भाव[15] मी न धरिं त्यासि वेगळा.'॥ १६
अशी त्या यतीनें वधू[16] सिद्ध केली, हराया तिला वृत्ति ज्याची भुकेली[17], ।
करी यत्न[18] कीं आपुलें कार्य साधे[19], जना दाखवीं हेतु निर्लोभ साधे[20]. ॥ १७

---

१. भक्तिपूर्वक. २. मनांत. ३. भयंकर. ४. झोंके घेती, मनोवृत्ति क्षुब्ध झाल्या. ५. रंध्र=दोष. तो आपला दोष (कामुकत्व) नाहींसा करावयास लागला. ६. 'तो नातळे' असाही पाठ आहे. ७. कमलनयना. ८. मदन. मदनाला शिवानें जाळून टाकिलें—अशी कथा आहे. म्हणून त्यास 'अनंग' असें म्हणतात. ९. अर्जुन. येथें 'उपमा' आहे. अर्थात् साम्यता पावणार नाहीं हें उत्तर. येथें 'प्रश्ना'लंकार आहे. १०. प्रफुल्ल, टवटवीत. ११. चेष्टा. १२. चित्त (मन) फार चपळ असतें—असा समज आहे. मनोवेगापेक्षां अधिक वेग नाहीं अशी पाश्चात्यांचीही समजूत आहे:—

"How fleet is a glance of the mind
Compared with the speed of its flight
The tempest itself lags behind
And the swift-winged arrows of light."

*W. Cowper.*

१३. हरण करी. १४. हातानें. येथें 'एं' हा प्रत्यय लागून तृतीयेचें एकवचन झालें आहे. तृतीयेचें हें रूप फार कवितेंत आढळतें. 'काय म्यां **पामरें** बोलावीं उत्तरें, परि त्या **विश्वंभरें** बोलावीलें' [तुकाराम.] '**भूपें** हळूच धरिला कलहंस पायीं. (रघुनाथपंडित.) 'बाण पहिला **पुष्करें** सोडियेला' [राघव.] १५. लग्न झालें म्हणजे नवरी नवऱ्याच्या गोत्रांतील होते व तीं दोघें एकजीव होतात—असा शास्त्रार्थ आहे त्यास उद्देशून हें सुभद्रेचें भाषण आहे. अर्थात् सुभद्रेचे म्हणण्याचा भावार्थ हा कीं मीं व अर्जुन हीं एकजीव झालों (दोघांचें लग्न झालें) तर मी धन्य. १६. स्त्री, भार्या. ['नवोढायां स्नुषायां च जायायां युवतौ वधूः' इति लिंगाभट्टः.] १७. वृत्ति भुकेली=तयार झाला, सिद्ध झाला. १८. 'यज्ञ' असाही पाठ आहे. १९. प्राप्त होई. २०. कपटरहित.

एकांतीं वडिलांसि कृष्ण विनवी, 'आला असे हो! यती
जाणें मी नरवीर[1] पार्थ नवरी नेता[2] बळें होय ती.' ।
तेव्हां तो वसुदेव हास्यवदनें डोलोनि माथा[3] तुंकी[4]
पुत्रालागुनि देवकी म्हणतसे, 'आहेस तूं कौतुकी[5].' ॥ १८
घडि पळ मग इच्छी साधना सव्यसाची[6]
हरिचरणदयेनें वेळ आला तसाची[7] ।
सकळ निघति यात्रे, पर्वणी पुण्यदाती
हयगजरथयानें[8] सिद्ध[9] केले पदाती[10]. ॥ १९
तेथें कांचनरत्नमंडित[11] रथीं वाजी[12] नवा[13] जी! करें[14],
दों बाहीं चवरें सुवर्ण[15] ललिता शृंगारिलीं शंकरें[16], ।
दासीदास विलास[17] दाविति पुढें, ऐशी शशांकानना[18]
देखे पार्थ कृतार्थ[19] होउनि म्हणे, 'हे चालिली काननां[20].' ॥ २०
सिंधूमधें[21] दुर्ग[22] निघोट[23] भारी, स्वर्गोपरि ते करि कैटभारी[24] ।
तेथूनि ये दुर्धर घोर सेना, जे चालतां मार्ग रितो[25] दिसेना. ॥ २१
पुढें चालती भार[26] नारीजनांचे, यती तेथ जातां मनोभाव नाचे[27], ।
सुभद्रा बळें[28] अंतरे त्यांत कांहीं तरी लक्षिजे[29] रक्षित्या सेवकांहीं. ॥ २२

---

१. वीर=शूर, पराक्रमी. वीराचें लक्षण असें:—'वीतरागभयद्वेषो रहितः सर्वसंशयैः । सर्वभूतानुकंपी च **वीर** इत्युच्यते बुधैः ॥' २. नेणारा. कोणत्याही धातूला 'ता' प्रत्यय लाविला असतां कर्तृवाचक नाम होतें; जसें:—गाता (गाणारा) खाता (खाणारा) इत्यादि. ३. मस्तक. ४. डोलवी. मान डोलवणें हें मान्यतेचें (संमतिदर्शक) सूचक चिन्ह आहे. ५. 'नाटकी' असाही पाठ आहे. ६. अर्जुन. अर्जुनाला 'सव्यसाची' असें नांव पडण्याचें कारण असें:—'उभौ मे दक्षिणौ पाणी गांडीवस्य विकर्षणे । तेन देवमनुष्येषु सव्यसाचीति मां विदुः॥' [महाभारत] श्रीधरस्वामीनीं असा विग्रह केला आहे:—'सव्येन वामेन हस्तेन साचितुं शरान्संधातुं शीलं यस्य स सव्यसाची.' ७. इच्छित, वांछित. ८. घोडे+हत्ती+गाड्या+वाहनें. ९. तयार केले. १०. पायदळ, शिपाई, प्यादा. ११. सुवर्णरत्नजडित. १२. घोडा. १३. नवीन. १४. हातानें, स्वतः, जातीनें, खुद्द. १५. सुंदर. १६. सुखकारक. हें चवरांचें विशेषण. १७. सुशोभितपणा, चारुता, कांति. १८. चंद्रानना (सुभद्रा.) १९. पूर्णकाम, अर्थ (इच्छा) कृत (झालेली) आहे ज्याची तो. २०. अरण्यांत, वनास. २१. समुद्रांत. २२. किल्ला. २३. बळकट, मजबूद. २४. कैटभनामक राक्षसास मारणारा. २५. रिकामा. २६. समूह. २७. मनोभाव नाचणें=मनोराज्यांत गर्क होणें; मनास वाटेल तशा कल्पना करणें. To build castles in the air. २८. मुद्दाम. २९. सुभद्रेनें जरी मुद्दाम आपल्या मनोवृत्ति दाबून ठेविल्या होत्या तरी ही गोष्ट रक्षणकर्त्या सेवकांस कळून आली—असा भाव.

सुभद्रा पार्थाचें मननयन जों ऐक्य करिती,
तया लोभें गेली सहज मग ते लौकिक[1]रिती, ।
रथीं बैसे, [2]नेटें धनु उचलिलें सज्जुनि करें,
'वधू नेली नेली.' जन वदति आक्रोश नि[3]करें. ॥ २३
योद्धे रक्षक [4]दापितां अतिभयें [5]दाही दिशा [6]टाकिती
शोकें आप्त समस्त बोलति मुखें हा वीर खोटा किती? ।
देवेंद्रादि [7]महारथी [8]अवगणी; नाहीं अशातें [9]सरी
कैसा ने नवरीस भाग आपुला जैसा [10]हरी [11]केसरी. ॥ २४
येउनी सकळ [12]रक्षकभद्रा, सांगती निजमुखें बळभद्रा ।
नेतसे नवरि सत्वर धांवा, एकलाच रणिं चोर वदावा. ॥ २५
ऐकोनि राम सबळाद्भुत तप्त [13]मुद्रा, भासे जसें [14]भरित पर्वणिचें समुद्रा ।
तेव्हां मुकुंद निजमस्तक ठेवि [15]पायां, [16]मांडीतसे [17]विजयिच्या विजयी उपाया. २६
'[18]पृथेच्या सुतासारिखा [19]सोयरा हो! [20]नसे, अग्रजा! अंतरीं सोय राहो' ।
[21]सखे बोलती, 'योग्य झालें [22]कपाळें, सुतेला पती निर्मिला लोकपाळें. ॥ २७

---

१. अब्रू, मोठेपणा. २. नेटानें, जोरानें. ३. समूहानें, एके ठिकाणीं जमून. ४. दावितां, दटावितां. ५. दाही दिशा पळती—असा भाव. ६. याचा कर्ता 'योद्धे व रक्षक'. ७. महारथी—रथांत राहून युद्ध करणाऱ्या वीरांचे महारथ, अतिरथ, रथ आणि अर्धरथ असे चार वर्ग मानले आहेत. त्यांची व्याख्या अशी:—'एको दशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनाम् । शस्त्रशास्त्रप्रवीणश्च महारथ इति स्मृतः ॥ अमितान्योधयेद्यस्तु संप्रोक्तोऽतिरथस्तु सः । रथस्त्वेकेन यो योद्धा तन्न्यूनोऽर्धरथः स्मृतः ॥.' याचा भावार्थः—जो शस्त्रविद्येमध्यें प्रवीण असून एकटा दहा हजार धनुर्धर वीरांशीं युद्ध करतो त्यास 'महारथ' असें म्हणतात. जो अगणित धनुर्धारी वीरांशीं युद्ध करतो त्यास 'अतिरथ' असें नांव आहे. जो एकट्या वीराशीं लढतो तो 'रथ' आणि जो त्याहून कमी तो 'अर्धरथ'. यांसच महारथी, अतिरथी, रथी आणि अर्धरथी असें म्हणतात. ८. मानीत नाहीं. ९. उपमा, बरोबरी. १० हरण करी. ११. सिंह. १२. सुभद्रेचे रक्षक. १३. मनोवृत्ति. १४. भरती. १५. बळरामाच्या पायांवर. १६. सांगत असे. १७. अर्जुनाच्या. विजय=अर्जुन. १८. कुंतीच्या. १९. आप्त, संबंधी. २०. 'असी' असाही पाठ आहे. २१. मित्र, सोबती. 'सखा' कोणाला म्हणावें हें **मो**रोपंतानें 'कृष्णविजय'—उत्तरार्ध—अध्याय ८२ गीति २६ उत्तरार्ध यांत सांगितलें आहे. तें असें:—'शोकीं पडल्या चित्ता, दे बोधकराशि तो **'सखा'** लोकीं. म्हणजे:—जो शोकग्रस्ताच्या मनाला उपदेशरूपी हात देऊन सांभाळतो तो लोकांत 'सखा' होतो—तोच खरा मित्र होय. येथें बळराम शोकग्रस्त असून इतर मंडळी त्यास उपदेशाच्या गोष्टी सांगत आहे तेव्हां त्याच्या तोंडून त्यांस 'सखा' म्हणविण्यांत कवीनें मोठी मार्मिकता दर्शविली आहे असें म्हणावें लागतें. २२. नशिबानुसार.

हेतु हा निवडिला उभयांचा, [1]किंतु हाच बळरामभयाचा ।
सर्व हें श्रुत यया यदुराया, जो समर्थ जनकार्य कराया.' २८
[2]यात्रोत्सवा लोक बहू निघाला, घालोनि सर्वा [3]दुरितांसि [4]घाला ।
समूह जाती यदुजांगनाचे, ज्यांचें महा [5]मंगळ अंग [6]नाचे. ॥ २९
सर्वांचे मनिं अर्जुनासि बरवें [7]सख्यत्व संपादणें
रामें [8]जाणुनि, तोषला मग तया धाडीतसे आंदणें,
दासीदासरथाश्व मत्त [9]करिटि रत्नें धनें [10]अंशुकें
झाली तेथ [11]विवाहसिद्धि कथिली ऐशी मुखें श्रीशुकें. ॥ ३०

---

१. संशय. '**किंतू**' या शब्दाचा मराठींत 'विकल्प' या अर्थी प्रयोग होतो. जसें, 'त्याच्या मनांत मजविषयीं किंतू आलासा दिसतो, तेव्हां त्यानें माझ्या हवालीं रुपये केले नाहींत.' संस्कृतांत या शब्दाचें रूप 'किंतु' आहे; 'किं' आणि 'तु.' आक्षेप काढावयाचा असल्यास वरील अव्ययाचा उपयोग करितात. तेव्हां मराठींत हें अव्यय नामरूप होऊन त्याचा अर्थही वरच्यासारखा झाला आहे.' [निबंधमाला–अंक ५२ पृष्ठ २३.] 'कीं तुझ्याच बलरामभयाचा' असा अन्य पाठ आहे. २. 'यात्रेस्तवा' असें पाठांतर आहे. ३. पापांसि. ४. सर्व पापें दूर झालीं–नाहींशीं झालीं–असा अर्थ. ५. शुभ. ६. आनंदामुळें त्या यदुजांगनाचें अंग नाचायला लागलें असावें. ७. सख्य, मैत्री. ८. बलरामानें काय जाणलें हें पुढील उताऱ्यावरून कळेल:—"जेणें सुभद्राहरण केलें । त्यातें नाहीं ओळखिलें । म्हणुनि क्रोधाचें भरतें आलें । तें उपसंहरिलें पाहिजे ॥ १ ॥ कुढावला जो अमरेंद्र । तो प्रत्यक्ष अर्जुन वीर । पितृष्वसेचा तृतीय कुमर । सुहृद साचार जिवलग हा ॥ २ ॥ अणिक एक ऐकें मात । परम गुह्य जो वृत्तांत । जेणें होय दोषलिप्त । तो संकेत अवधारीं ॥ ३ ॥ सुभद्रा जन्मली यादवघरीं । परि हे शची पौरंदरी । यास्तव अर्जुनालागीं वरी । बिघड न करीं पैं यांचा ॥ ४ ॥ इचा करिसी मनोभंग । तरी हे करील स्वतनुत्याग । तेणें अपकीर्तिचा डाग । लागल्या अभंग मग न वचे ॥ ५ ॥ भो भो स्वामी संकर्षणा । तुझे अंतरींची वासना । सुभद्रा द्यावी दुर्योधना । ते अर्जुना केंवि देणें ॥ ६ ॥ तरी तूं ऐकें इयेविशीं । सुरेंद्र जाणोनी अर्जुनासी । इनें वरिला निश्चयेसी । दुर्योधनासी हे न वरी ॥ ७ ॥ कलिपुरुषाचा अवतार । तो हा प्रत्यक्ष गांधार । सुभद्रा याचा न शिवे कर । हा निर्धार मी जाणें ॥ ८ ॥ बलात्कारें अघटित घडतां । सुभद्रा करील आत्मघाता । कृष्णें ऐसें स्मरण देतां । रामें तत्वतां जाणितलें. ॥ ९ ॥" [श्रीमद्भागवत–स्कंध १० अ० ८७ श्लो० ११ वरील 'श्रीहरिवरदा'नामक श्रीकृष्णदयार्णवस्वामीविरचित टीका.] ९. हत्ती (करिटिन्). १०. उत्तम वस्त्रें. 'आशुकें' असाही पाठ आहे. ११. विवाहसिद्धि झाली=विवाह घडून आला, लग्न झालें.

## उपसंहार.

(श्लोक.)

सुभद्रेचें ऐसें हरण कथितां श्रीशुकमुनीं
मनीं डोले राजा[1] पदकमळ साष्टांग[2] नमुनीं, ।
विलोकी[3] जो लोकीं श्रवणपठणें भागवत[4] रे!
तरे ज्ञानानंदीं परमगतिलागीं अवतरे[5]. ॥

# नारायणबोवाविरचित[6]

## १३. सुविचारमाला[7].

(श्लोक.)

आधीं प्रापंच[8] सारा[9]; सुतधनविषयानर्थहेतूस वारा[10];
वारा[11] बुद्धी निवारा; समजुनि बरवें त्यागिजे हृद्विकारा[12]; ।

१. परिक्षिति राजा. २. अष्टांगासह. आठ आंगांनीं युक्त असा. अष्टांग नमस्काराचें लक्षण दिलें आहे तें असें:—'जानुभ्यां च तथा पद्भ्यां पाणिभ्यामुरसा धिया। शिरसा वचसा दृष्ट्या प्रणामोऽष्टांग ईरितः॥.' ३. पाही. ४. भागवत नामक श्रीशुकमुनिप्रणीत ग्रंथ. ५. या काव्याच्या शेवटीं 'इति श्रीसुभद्राहरण रामचंद्र मल्हार विरचित समाप्त' असा लेख आहे. यावरून हें काव्य रामचंद्र मल्हारकृतच असावें. ६. ह्या बुवांचें जन्म जालवण प्रांतांत चालू शतकाच्या आरंभीं झालें. हे संस्कृत व मराठी भाषेंत बरेच व्युत्पन्न होते. त्यांच्या अंगीं वक्तृत्वशक्ति फार मोठी होती असें त्यांचें वक्तृत्व ऐकिलेले जुने लोक म्हणतात. हे साधुवृत्तीनें राहात असत व लोकहितार्थ पुराण सांगत असत. हे दाक्षिणात्य ब्राह्मण होते. सातान्याकडे विष्णुबोवा ब्रह्मचारी यांचे परमगुरु नारायणबोवा या नांवाचे होऊन गेले तेच हे बुवा असावे; असा तर्क आहे. त्या नारायणबोवांनीं ज्ञानसागर, शांतिसागर इत्यादि सात ग्रंथ केले आहेत असें म्हणतात. ह्या प्रकरणाचे कर्ते नारायणबोवा हे चिमटेबोवा या नांवानें प्रसिद्ध आहेत. कारण ह्यांच्या जवळ एक लांब चिमटा असे. या बुवानें केलेली पुढील कविता उपलब्ध आहे:—(१) विज्ञानसागर अ० १२ ओं० ६६८, (२) बोधाष्टक श्लो० ९, (३) निर्वाणपंचक श्लो० ६, (४) सिद्धयोगाष्टक श्लो० १०, (५) चिद्रत्नमाला श्लो० १०, (६) दत्तात्रयाष्टक श्लो० १०, (७) पद १. ७. या बुवास जे सुविचार सुचले ते या प्रकरणांत ग्रथित केले आहेत म्हणून या प्रकरणास 'सुविचारमाला' असें नांव दिलें आहे. या प्रकरणांत शब्दसरलता व अर्थगांभीर्य हे दोन मुख्य गुण आहेत. वेदांतासारखा विषय सुलभ करून सांगणें हें कांहीं साधारण काम नाहीं. पण तें चिमटेबोवांस चांगलें साधलें आहे असें, हें कवन वाचल्यावर, म्हटल्यावांचून

सारा मायापसारा[1] वमुनि, धरुं नका दुर्मतीचा फुगारा;
सारा संसार; सेवा गुरुवरदकृपासंगपीयूषधारा. ॥ १
संसारीं भलत्या भरीं[2] भरुं नको; अभ्यास[3] सोडूं नको;
मिथ्या देहसुतादि तुच्छ विषयीं आनंद मानूं नको. ।
पूर्वींचें गृहसौख्य[4] तें[5] स्मरुं नको; होणार चिंतूं नको;
ब्रह्मानंदनिमग्नचित्त असतां कांहींच कांहीं नको. ॥ २
मिथ्या मान नको; शरीर अपुलें हें सत्य जाणूं नको;
'हा मी' 'तो जन अन्य' हें[6] मनिं कदा जाणून आणूं नको;[7] ।
कामक्रोधविकार हे धरुं नको; तूं खेद मानूं नको;
आत्मारामहृदिस्थ[8] शंकर[9] सदा सेवून सोडूं नको. ॥ ३
प्रपंचीं[10] ममता कधीं धरुं नको; लोभांत गुंतूं नको;
लोकीं[11] तूं खळ, दुष्ट, नष्ट, भलत्या संगांत बैसूं नको; ।
कांहीं[12] कर्म करूं नको; गुरुमहापंथासि मोडूं नको;
जो कोणी भवदुःख[13] सर्व निरसी[14] तो देव सोडूं नको. ॥ ४
तूं कांहीं ममता भ्रमीं भ्रमुं नको; मोहांत गुंतूं नको;
कांहीं दुःखशरीरभोग अपुला हा सत्य जाणूं[15] नको; ।

---

राहवत नाहीं. शब्दलालित्य, मनोहारित्व व प्रसाद हे गुणही प्रस्तुत कवितेंत बरेच उतरले आहेत. एकंदरींत हें प्रकरण चांगलें उतरलें आहे. ८. मोक्षप्राप्तीच्या उद्योगास लागण्यापूर्वीं कोणते उपाय करावे ते १-२४ श्लोकांत सांगितले आहेत. ते आधीं करा असें कवि म्हणतो. ९. 'संसार' असाही पाठ आहे. १०. एकीकडे सारा, टाका, सोडा. ११. अनेक, नानाप्रकारच्या. १२. 'दृग्विकारा' असें पाठांतर आहे.

१. 'पसारा' असा अन्य पाठ आहे. २. भरीं भरणें=नादास लागणें, चढीस लागणें. हा शब्दसमूह कोशकारांस उपयोगी आहे. ३. ज्या शास्त्राच्या अध्ययनानें आत्मज्ञान प्राप्त होतें त्याचा अभ्यास. ४. गृहस्थाश्रमांतील. ५. 'गृहकुल' असा अन्य पाठ आहे. ६. 'हे मति कदा' असा अन्य पाठ आहे. ७. अशाचसारखें एक संस्कृत वाक्य आहे तें असें:—अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम्.' [चाणक्यनीति.] ८. हृदयांत वास करणारा. ९. शं (सुखं) करोतीति शंकरः. शंकर सर्व जनांस निरंतर सुख देतो म्हणून त्यास सदाशिव असें अन्य नांव आहे. १०. 'संसारीं' असाही पाठ आहे. ११. हें नीतितत्व थोरांनीं व लहानांनीं आपल्या हृत्पटलावर कोरून ठेवण्यालायक आहे. १२. कोणतें कर्म सकाम करूं नको. १३. संसारदुःख. १४. नाश करी. १५. 'मानूं' असें पाठांतर आहे.

लोकीं[१] वाद नको, अहंमति नको, मायापसारा नको,
आत्मा तूंच समाधि भोगुन कदा काळास शंकूं नको. ॥ ५
नाना[२] देश फिरूं नको; जनिंवनीं राहून भागूं[३] नको;
लोकीं लाज[४] धरूं नको; हरिकथाविश्वास सोडूं नको; ।
कर्णीं दुष्ट कठोर शब्द पडती तें दुःख मानूं नको
भोगें दुःखसुखादि सारुनि निजानंदास भंगूं नको. ॥ ६
नाना[५] नेम नको, व्रतें[६] करुं नको; कर्मांत गूंतूं नको
पुण्याची मनिं कामना[७] धरुं नको; मूर्खांत बैसूं नको; ।
देहाचें सुखदुःख तें गणुं[८] नको; चिंता भवाची[९] नको;
**'श्रीनारायण'**नाम सार[१०] जपतां जन्मास येणें[११] नको. ॥ ७
'झालें' 'होइल' 'होतसे जग' असें चित्तांत कल्पूं नको;
'केलें कर्म' 'करीन हें' 'करितसें' हें सत्य मानूं नको; ।
लोकीं तूं खळसंगती[१२] धरुं नको; स्नेहांत गुंतूं नको;
'मी' 'माझेंच कुटुंब' हें म्हणुं नको; वेदांस[१३] सोडूं नको. ॥ ८
संसारीं असतां प्रवाहपतितद्वंद्वांसि[१४] त्रासूं नको;
खेदाखेद[१५] मनांत आणुनि, वनीं[१६] जाणें विचारूं नको; ।
'कांहीं घेइन' हे मती धरुं नको; 'सोडीन' हेही नको;
आत्मा तूं परिपूर्ण एक अससी[१७] सिद्धांत सोडूं नको. ॥ ९
लाभीं[१८] हर्ष नको; विषादहि नको; निंदाप्रशंसा नको;
हानीचा मनिं शोक तूं धरुं[१९] नको; देहीं अहंता नको; ।

---

१. कोणतें मत खरें याविषयीं लोकांशीं वाद घालूं नये. वेदांत हेंच एक मत खरें धरून चालावें. २. आत्मज्ञानप्राप्तीसाठीं नाना देश हिंडणें जरूर नाहीं. ३. दमूं नको, थकूं नको. 'भोगूं नको' असाही पाठ आढळतो, पण तो अपपाठ असावा असें वाटतें. ४. स्वमतावलंब केल्यावर त्याची लाज धरूं नये. ५. नाना नेम व व्रतें यांची कांहीं मातबरी नाहीं, त्यांपासून मोक्षप्राप्ति होत नसते. ६. 'व्रतें मख नको' असाही पाठ आहे. ७. इच्छा. ८. मानूं नको, मोजूं नको. ९. संसाराची. १०. उत्तम, श्रेष्ठ. ११. 'येऊं असा अन्य पाठ आहे.' १२. दुष्टांची सोबत. १३. 'वेदांत' असाही पाठ आहे. १४. पापपुण्य, सुखदुःख इत्यादि विरुद्ध गुणंदर्शक वस्तु. १५. सुखदुःख. १६. वनांत जाण्याचा विचार करूं नको. 'मनीं जाणें' असाही पाठ आहे, पण तो अपपाठ असावा. १७. 'एकचि असा' 'एक असतां' असे पाठभेद आहेत. १८.'लाभीं हर्ष अलाभिं दुःखहि नको' असाही पाठ आहे.१९.'करुं नको' असें पाठांतर आहे.

कोणाचें इतिकृत्य तें स्मरुं नको; 'माझें तुझें' हें नको;
आप्तासी ममता नको; गुरुपरब्रह्मासि सोडूं नको. ॥ १०
कांहीं [1]मंत्र नको; क्रिया करुं नको; वार्ता [2]जनासी नको;
देहा ध्यास कुलाभिमान हृदयीं कर्तव्य ठेवूं नको; ।
'कर्ता मीच' असें कदां म्हणुं नको; कार्यांत गुंतूं नको;
**रा**मोपासन लोकसिद्ध असतां [3]ऐक्यत्व खंडूं नको. ॥ ११
कोणाशीं मनिं [4]वक्रता धरुं नको; [5]भिन्नत्व ठेवूं नको;
कोणाचे गुणदोषही गणुं नको; मैत्री जनाची नको; ।
चिंता तूं निजमानसीं करुं नको; [6]देहात्मबुद्धी नको;
ब्रह्मावीण दुजें कदां स्मरुं नको; सद्भाव सोडूं नको. ॥ १२
नाना ग्रंथ नको; तपें जप नको; तूं वाद [7]घालूं नको;
नाना धर्म [8]हटादियोगहि नको; आशा धनाची नको. ।
नाना तर्क नको; मनीं [9]भ्रमुं नको; रागास येऊं नको;
**'ब्रह्मास्मीति'** भुलूं नको; [10]निजपदानंदास भंगूं नको. ॥ १३
शंका भीति नको; वृथा भ्रमुं नको; दुःसंग सेवूं नको;
देहाचें कृत कर्म तें निजशिरीं वाहोन घेऊं नको; ।
नाना मार्ग नको उपाधिमळ हा आत्म्यास लावूं नको
[11]चित्तीं दोषकलंक संशय नको; [12]अद्वैत सोडूं नको. ॥ १४
देहाची ममता कदा धरुं नको; आशा गृहाची नको;
लोकांची मनिं भीड तूं धरुं नको; निंदेस शंकूं नको; ।
पोटाची [13]हृदिं काळजी करुं नको; हा देह दंडूं [14]नको;
[15]सत्संगाविण संगती करुं नको; सद्बुद्धि सोडूं नको; ॥ १५

---

१. मसलत, उपदेश. 'मार्ग' असा अन्य पाठ आहे. २. 'जनाची' असाही पाठ आहे. ३. अद्वैतमताचें खंडन करूं नको. 'एकत्व' असाही पाठ आहे. ४. वांकडेपणा, वैर. ५. आपपरभाव ठेवूं नको. ६. देहास आत्मा मानणें ही बुद्धि नको. देहवादी आत्म्याचें अस्तित्व मान्य करीत नाहींत. देहासच आत्मा मानणें ठीक नाहीं—असें कवीचें मत असावें. ७. कोणतें मत ग्राह्य याविषयीं वाद घालूं नको. ८. योगाचे राजयोग व हटयोग असे दोन भेद आहेत. ९. 'भ्रम' असा पाठभेद आहे. १०. 'निजपरानंदास' असें पाठांतर आहे. पर=परम=श्रेष्ठ, सर्वोत्कृष्ट. ११. 'चित्ता' असाही पाठ आहे. १२. परमेश्वर व आत्मा यांत फरक न मानणें. १३. अंतःकरणांत, हृदयांत. १४. मुद्रा, उपास, व्रतें इत्यादि करून देहास त्रास देऊं नये. १५. 'सत्संगेंविण अन्यसंगति नको' असाही पाठ आहे.

नानाछंद नको; वृथा श्रम नको; [1]संसारधंदा नको;
मायामोह नको; विनोद करणें ही बालबुद्धी नको; ।
संसारीं लघु [2]कामना धरुं नको; लोकांस निंदूं नको;
श्रीसच्चिद्घन**राम**नाम जपतां आलस्य आणूं नको. ॥ १६

प्रारब्धीं सुखभोगयोग नसतां तें [3]दैन्य मानूं नको;
इंद्राची बहु संपदा गणुं नको; क्षुद्रार्थ वांछूं नको; ।
कोणाशीं ममता जगीं धरुं नको; द्वैतास पाहूं नको;
मायाकल्पित दुःखजाल असतां तूं धैर्य सोडूं नको. ॥ १७

**सीताराम**उपासना त्यजुं नको; [4]उद्विग्न होऊं नको;
देहाचें [5]कृतकर्मदुःख अपुलें कोणासि सांगूं [6]नको; ।
कन्यापुत्र नको; वृथा जनपराधीनत्व ठेवूं नको;
[7]भूलोकांत महाप्रसंग पडतां तूं [8]सत्व सोडूं नको. ॥ १८

मायामोह नको; सुसंग असतां सोडून जाऊं नको;
चिंताशोक नको; [9]परार्थ करितां लोकांस लाजूं नको; ।
वर्मोच्चार नको; जनांत [10]वसतां गोष्टी [11]भवाच्या नको;
चित्तीं राग नको [12]अनावर; खरें [13]वैराग्य सोडूं नको. ॥ १९

नानाचार नको; [14]कुकर्म करणें हे [15]क्षुद्रबुद्धी नको;
मायाकल्पित [16]वित्तवाजिकरि हे भोगार्थ वांछूं नको; ।
कायक्लेश नको; जनीं [17]मुढ अशा संगांत बैसूं नको; ।
जेथें जाऊन येत ना मुनि कदा तें [18]धाम सोडूं नको. ॥ २०

---

१. 'संसारधंदा' हा समास चिंतनीय आहे. २. स्वहिताचेच उपाय, इच्छा. ३. दीनता. ४. दुःखित, त्रस्त. ५. केलेल्या कृत्यापासून उत्पन्न झालेलें दुःख. ६. आपलें कर्म व दुःख दुसऱ्यास सांगून कांहीं अर्थ नाहीं. कारण तेणेंकरून तारण होत नसतें. ज्याचा तोच तारक असतो. ७. हा चरण सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यालायक आहे. याहून उत्तम नीतितत्व शोधलें तरी सांपडणार नाहीं. ८. ब्रीद, शील. ९. दुसऱ्याचें हित. १०. 'असतां' असा अन्य पाठ आहे. ११. संसाराच्या. १२. आवरण्यास कठीण. १३. 'उमावरमहावैराग्य' असाही पाठभेद आहे. १४. 'कुतर्क' असा अन्य पाठ आहे. १५. नीचबुद्धि. १६. द्रव्य, घोडे, हत्ती. १७. 'कायाक्लेश नको; कुसंगति नको; मूढांत बैसूं नको' असें पाठांतर आहे. १८. येथें एकदम 'मोक्ष' असें न म्हणतां 'जेथें मुनि गेले असतां कधींही परत येत नाहींत तें स्थल' असें वळसा घेऊन म्हटलें आहे म्हणून 'पर्यायोक्ता'लंकार झाला.

निद्रालस्य नको; शरीरसुख हें चित्तांत वांछूं नको;
देहीं घातक दुष्ट, [1]तस्कर महाहंकार ठेवूं नको; ।
कोठें जाउं नको; दुराग्रह नको; दुर्वासना त्या नको;
[2]जें दृग्गोचर तें नसे, [3]गुरु असा [4]निर्धार सोडूं नको. ॥ २१
मातृभ्रातृ नको; गृहाश्रम नको; सन्मान इच्छूं नको;
कन्यापुत्रकलत्र हें तुज नको; दुष्कर्मबुद्धी नको; ।
स्वर्भोगास वृथा तपश्रम नको; [5]संतान कांता नको;
सेवीं **राम**पदा सदा; मनिं कदा आत्मा विसंबूं नको. ॥ २२
तूतें देह नको; [6]दशेंद्रिय मनोबुद्ध्यादिकें तीं [7]नको;
[8]माया सत्य असा वृथा भ्रम नको; [9]दृश्यांत गुंतूं नको; ।
[10]जागृत्स्वप्नसुषुप्ति हे तुज नको; [11]तुर्योन्मनी ही नको;
कांहीं [12]शून्य नको; सदा विमल तूं साक्षित्व ठेवूं नको. ॥ २३
जेथें भाव कळा समस्त अटती तें शेष सोडूं नको;
भावातीत असा सदैव असतां कांहीं विचारूं नको; ।
श्री**ना**रायण देव एक, दुसरा तूं देव ध्याऊं नको;
ब्रह्मानंदमहानिरंजनपदीं जाऊन येऊं नको. ॥ २४

---

१. चोर. २. नैयायिकांच्या तोंडून 'यद्दृष्टं तन्नष्टं' हें फार ऐकण्यांत येतें. ३. मोठा. हें निर्धाराचें विशेषण. ४. निश्चय. ५. 'संतान तेंही नको' असें पाठांतर. ६. एक मुख, एक ब्रह्मरंध्र, दोन घ्राणें, दोन कान, दोन डोळे, एक शिश्न व एक गुदद्वार मिळून दशेंद्रियें होतात. किंवा पांच कर्मेंद्रियें (हस्तपादादि) व पांच ज्ञानेंद्रियें (घ्राणत्वचादि) मिळून दशेंद्रियें होतात. ७. 'तूतें देह नको; दशेंद्रिय नको; बुध्यादिकें तीं नको' असाही पाठ आहे. ८. 'मायाभान' व 'मायाभास' अशीं पाठांतरें आढळतात. ९. दृश्यांत गुंतूं नको, कारण दृश्य तेवढें सर्व असत्य आहे. १०. जागृति, स्वप्न, सुषुप्ति (गाढ झोंप), तुर्या व उन्मनी असे मनाच्या अवस्थेचे पांच प्रकार आहेत. ११. तुर्येविषयीं मुकुंदराजकृत ग्रंथांत पुढील विवेचन आहे:—'तुर्येची परिपक्वता । तेचि उन्मनी अवस्था । निंबोळियांस मधुरता । जैसी पक्वदशें ॥ १ ॥ तुर्या ते शुद्धवासना । तेथें हाचि कडवटपणा । उन्मनी बुझ निर्वासना । म्हणूनी गोड ते ॥ २ ॥ जैसी साकर उदकीं विरे । परी तेथिंची मधुरता उरे । तैसी तुर्या स्वरूपीं मुरे । ते उन्मनी ॥ ३ ॥ अवस्था पंचमा नास्ति । ऐसी हे वेदश्रुति । म्हणूनि तुर्येची परिणामस्थिती । ते उन्मन कीं. ॥ ४ ॥' [विवेकसिंधु]. १२. सर्व जगत् आत्मामय आहे; तोच अविनाशी. सर्व दिसतें तें मिथ्या म्हणून तें नाश पावल्यावर शून्य राहील. पण जगत् आत्मामय मानिलें तर शून्य राहणें कठीण.

## उपसंहार.

(श्लोक.)

घाली[1] गळां जो 'सुविचारमाळा' होईल तो काळ तया निराळा, ।
आनंद भोगील निरंजनाचा,[2] तो वानितां[3] मौन धरील वाचा.[4][5] ॥ २९

# राघवकविकृत[6]

## १४. शिबिचरित्र.[7]

(साकीवृत्त.)

अद्वैतवनीं पांडव असतां मार्कंड मुनी सांगे; ।
'धर्मा! तुझियेसमान शिबिनृप वर्ततसे अभंगें, ॥

१. 'घालील जो ही सुविचारमाला, होईल तो काळजवा निराळा' असें पाठांतर आहे. २. मायारहित एकांताचा. ३. वर्णितां. ४. वाणी, सरस्वती. ५. 'इति श्रीमत्परमतपःपरायणश्रीमन्नारायणविरचित विचारमाला समाप्त' असा अंतिमलेख आहे. ६. ह्या कवीचा राहण्याचा गांव पथरिया. हा जबलपुर जिल्ह्यांत आहे. ह्याचें मूळचें नांव पांडोबा, बापाचें नांव व्यंकटेश, आईचें नांव रमाबाई, उपनाम करकरे. हा आपल्या आईबापांचा मधला मुलगा होय. याचे बल्लाळ (बाळाजीपंत?) या नांवाचे गुरु होते. या कवीनें सुरथसुधन्वाख्यान, शिबिचक्रवर्त्याख्यान, गजगौरीव्रत हीं आख्यानें केलीं आहेत. हा कवि ४०।५० वर्षांपूर्वीं होऊन गेला. ७. शिबि—हा सोमवंशीय उशीनरराजाचा ज्येष्ठ पुत्र. या राजाविषयीं दोन कथा महाभारतांत आहेत, त्यांतून पहिलीचा येथें उल्लेख आहे ती अशी:—शिबिराजाची परीक्षा करण्याकरितां इंद्रानें श्येनाचें रूप घेतलें व अग्नीनें कपोताचें रूप घेतलें. नंतर श्येन आपले पाठीस लागला आहे अशा मिषानें कपोत उशीनर राजाजवळ आश्रयार्थ आला. त्यास आश्रय मिळाला हें पाहून 'माझा भक्ष्य मला दे' असें श्येन म्हणूं लागला. तेव्हां कपोताचे भारंभार उशीनर राजानें आपल्या शरीराचें मांस श्येनास देण्याचें कबूल केलें. परंतु शरीराचा बराच भाग तोडून तराजूंत घातला तरी कपोत जडच येऊं लागला, तेव्हां उशीनर स्वतःच पारड्यांत बसला. तें पाहून उभयतां संतुष्ट होऊन आपलीं रूपें प्रगट करून वर देऊन गेले. (महाभारत—वनपर्व—अध्याय १३०-१३१.) याप्रमाणें प्रथम कथा झाली. द्वितीय कथा आहे ती अशी:—या राजाचें सत्व पाहण्यासाठीं ब्रह्मदेव विप्ररूपानें आला आणि त्यानें राजाच्या पुत्राचें (बृहद्गर्भाचें) मांस खावयास मागितलें. राजानें मांस शिजवून तयार केलें, पण विप्र कोठें दिसेना, तेव्हां मांसपात्र मस्तकावर घेऊन राजा विप्राचा शोध करीत फिरूं लागला. तों तो विप्र राजमंदिरास आग लावीत आहे असें यानें पाहिलें. पण मनांत विकल्प न धरतां राजानें विप्राची प्रार्थना करून सिद्ध केलेलें मांस स्वीकारावें' अशी विनंति केली. 'मी तें खात नाहीं. तूंच तें खा' असें प्रत्युत्तर विप्रानें केलें.

सत्वधीर अणि पुण्यपरायण बहूत पराक्रम वागे, ।
तीच साम्यता तुजशीं तुलतां समान पदवी लागे, ॥
काय सांगूं धर्मा! रे! । अघटित शिबिचा महिमा रे! ॥ १
[1]विधिपूर्वक [2]मख एक [3]उणें [4]शत सिद्धिस तेणें नेले; ।
शेवटिंचा [4]अवलंबन करितां [5]विधिसुत नारद आले. ॥
[6]चक्रवर्ति [7]ऋषि देखुनि सर्वहि आनंद[8]चकित झाले, ।
'धन्य' म्हणे 'रविवंशजमंडन! कीर्तीनें त्रिभुवन भरलें,' ॥
ऐसें बोलुनि [9]अवनीं हो! । गेला [10]शचिवरभुवनीं हो! ॥ २

---

त्याप्रमाणें राजा तें मांस खाणार तों ब्रह्मदेव प्रसन्न होऊन, स्वरूप प्रकट करून, राजास आशीर्वाद देऊन त्याचा पुत्र पूर्ववत् सजीव करून अंतर्धान पावला अशी कथा आहे. (महाभारत—वनपर्व—अध्याय १९४-१९८.) याच कथानकावर आनंदतनयाची कविता आहे. हें आख्यान सोपें, सरळ, आणि रसाळ आहे. ८. हा मृकंडऋषीचा मुलगा. 'अपुत्रस्य गतिर्नास्ति' याप्रमाणें आपली स्थिति न व्हावी म्हणून मृकंडऋषीनें भार्येसह घोर तपश्चर्या केली. तपाच्या अंतीं शंकर प्रसन्न झाला व 'काय वर पाहिजे?' म्हणून विचारूं लागला. तेव्हां 'मला पुत्र पाहिजे' असा मृकंडऋषीनें वर मागितला. 'तुला दीर्घायुष्यी मूर्ख मुलगा पाहिजे कीं फक्त सोळा वर्षांपर्यंत जिवंत राहणारा सद्गुणी मुलगा पाहिजे?' असा शंकरानें ऋषीस उलट प्रश्न केला. त्यावर 'अल्पायुषी तरी कबूल, परंतु सद्गुणीच मुलगा मला पाहिजे, असें ऋषीनें म्हटल्यावर 'तथास्तु' म्हणून शंकर अंतर्धान पावला. नंतर मृकंडाला हा मार्कंडेय नांवाचा मुलगा झाला. सोळा वर्षें झाल्यानंतर मृत्यूच्या दिवशीं हा देवालयांत बसून शिवाची आराधना करूं लागला. याच्या भक्तीला शंकर प्रसन्न होऊन याला (मार्कंडेयाला) यमाच्या पाशापासून सोडविलें व 'तूं चिरायु हो' असा यास वर दिला. या मार्कंडेयाच्या चरित्रावर आंध्रभाषेंत उत्तम नाटक झालें आहे. 'अष्टादशपुराणानां कर्ता सत्यवतीसुतः' अशी जरी सामान्य समजूत आहे तरी मार्कंडेय पुराणाचा कर्ता हाच मार्कंडेय असावा अशी एक विशेष समजूत आहे. ९. पृष्ठ ४ टीप ४ पहा. १०. अभंगें=भंग न पावतां, अक्षय्य.

१. यथाशास्त्र. २. यज्ञ. ३. शंभरांना एक कमी, नव्याण्णव. येथें नव्याण्णव असें एकदम न म्हणतां पर्यायानें तोच भाव दर्शविला आहे, म्हणून येथें 'पर्यायोक्त' अलंकार झाला. ४. आरंभ झाला असतां. ५. 'विधिसुत' हें विशेषण साभिप्राय आहे म्हणून 'परिकरा'लंकार झाला. येथें 'विधिसुत' हें विशेषण अशाकरितां कवीनें घातलें असावें कीं पुढें होणारी गोष्ट नारदास माहीत होती. कारण तो ब्रह्मांड निर्माण करणाऱ्याचा पुत्र. ६. शिबिराजा. ७. मार्कंडेय. ८. 'थकित' असा अन्य पाठ. ९. पृथ्वीवर. १०. इंद्रलोकास. 'शचिवरभवनीं' असाही पाठ आहे.

देखुनि मुनिवर, शचिवर धांवुनि त्याच्या पायां लागे, ।
षोडशोपचारें त्या पूजुनि विनवी अतिअनुरागें, ॥
'तव आगमनें धन्य मि झालों कांहिं नवल तरि सांगें.' ।
ऐकुनि नारद म्हणे, 'अमरेंद्रा! शतमख जेणें सांगें ॥
केले; ऐसा महीं शिबी । नेणो हरील तव पदवी.' ॥ ३

(श्लोक.)

वज्रपात तो इंद्रें मानिला, सर्व अंगकांति दीप्त जाहला ।
अग्निशीं तदा शीघ्र प्रार्थिलें, 'मृत्युलोकशीं गमन हें भलें.' ॥ ४

(साकीवृत्त.)

इंदरनें तब भेख छुपाके निकला छोड ठिकाना, ।
नारायण संग लेकर चलते आया राजाके भुवना ॥
सुन सुन साधो! जी! । खूबहि खोजें करो जी! ॥ ५

---

१. सोळा उपचार ते हे:—'आसनं स्वागतं चार्घ्यं पाद्यमाचमनीयकम् । मधुपर्कार्पणं स्नानं वसनाभरणानि च ॥ सुगंधः सुमनौ धूपौ दीपो नैवेद्य एव च । माल्यानुलेपने चैव नमस्कारो विसर्जनम् ॥' इति जाबालिः. अथवा—'आवाहनासने पाद्यमर्घ्यमाचमनीयकम् । स्नानं वस्त्रोपवीते च गंधमाल्यादिभिः क्रमात् ॥ धूपं दीपं च नैवेद्यं नमस्कारं प्रदक्षिणाम् । उद्यापनं षोडशकमेवं देवार्चने विधिः' ॥ इति नागदेवः. २. अत्यंत प्रेमानें. ३. ब्रह्मदेवाच्या शरीरापासून—मांडीपासून—झालेला नारद. नार=पाणी, द=देणारा. जो पितरांना पाणी (नार) देतो तो नारद. 'नारं पानीयमित्युक्तं तत्पितृभ्यः सदा भवान् । ददाति तेन ते नाम नारदेति भविष्यति ॥' हरिवंश नामक ग्रंथांत या देवर्षीचें वर्णन खालीं लिहिल्याप्रमाणें केलें आहे:—याची अंगकांति प्रज्वलिताग्नीप्रमाणें देदीप्यमान आहे, नेत्राची चकाकी बालार्कसदृश आहे, मस्तकावर जटाभार उन्नमित करून बांधला आहे, याचें शरीर सुवर्णालंकारानें भूषित केलेलें आहे, सखीप्रमाणें यानें आपल्या कक्षपुटांत एक मोठी वीणा बाळगली आहे. चंद्ररश्मीप्रमाणें शुक्लांबर धारण केलें आहे, कृष्णमृगचर्मनिर्मित उत्तरीयवस्त्रानें आपली काया आच्छादन केली आहे, दंडकमंडलु घेतलें आहे व हा कोणी साक्षात् दुसरा इंद्र आहे असा भास होत आहे, हा जगांतील गुप्त कलहांचा जाणणारा आहे, स्कंदासारिखा ब्रह्मचारी आहे, या महर्षीस कलहप्रिय देखील म्हणत असतात, हा विद्वान् आहे व तसाच गायनकलेंत निष्णात आहे, हा ब्रह्मसूनु आहे व जणूं काय अन्यकलीच आहे, देव व गंधर्व लोकांचा आदिवक्ता व मुनिश्रेष्ठ आहे, हा चारी वेद पठण करणारा आहे व मुख्य मुख्य याज्ञिकांकडून गाइला जाणारा आहे, या ब्रह्मर्षीस नारद म्हणत असतात, हा चिरंजीव आहे व याचा ब्रह्मलोकांत संचार आहे. [काव्यसंग्रहग्रंथमाला—मुक्तेश्वरकृत सभापर्व—अध्याय २ पृष्ठ २०.] ४. विध्युक्त, यथासांग. ५. पृथ्वीवर. ६. अत्यंत क्रोधामुळें तो लाल दिसूं लागला—असा भाव. 'प्रीतिक्रोधांत रक्तिमापात' हा कविसंकेत प्रसिद्धच आहे. ७. वेष. ८. अग्निनारायण. ९. शोध.

अग्नि बना जब कपोतपक्षी, इंदर बाज[1] बजैय्या, ।
आगे कपोता दौडत, पाछे बाज झडपत आया, ॥
धन धन राजा! रे! । क्या कहुं आजकि मौजा रे! ॥ ६
शिबिके जंघन[2] के ऊपर तब कपोत आकर बैठा, ।
दीन वदन राजाको टेरंत[3], बाज पिछेसे पैंठा[4] ॥
धन धन राजा! रे! । क्या कहुं आजकि मौजा रे! ॥ ७
तेरो जस[5] सब बेद बखानत देखो सबहि पुरानमें, ।
शरन आयेकि शरम धरत तद किरत होत त्रिभुवनमें, ॥
साची[6] बात सुनो! रे! प्रभुजी! खूब बनो रे! ॥ ८

(श्लोक.)

भयाभित बोलेच तेव्हां कपोता, प्रार्थी[7] म्हणे, 'बा! मज रक्ष आतां ।
पाठीस[8] घालीं तुझी आजि सत्य, श्रेय हेंचि जोडीं तुं माझेनिमित्त. ॥ ९
चारी[9] सहाही[10] अठरापुराणीं[11], गेले दिनाचा सांभाळ करणीं[12] ।
सुकृत[13] जोडीं[14] आपलें तुं राया!, परत्र[15] पदवी जासी वराया' ॥ १०

---

१. श्येन, ससाणा. २. मांडीवर. ३. हांक मारीत. ४. पोंचला. ५. यश, कीर्ति. ६. खरी. ७. 'प्रार्थीतसे रक्षी अनाथनाथा' असा अन्य पाठ आहे. ८. पाठीस घालणें=आश्रय देणें, रक्षण करणें. ९. चार वेदांत. ते चार वेदः—ऋग्वेद–याच्या शाखा चोवीस, भेद आठ (चरणव्यूह). यजुर्वेद–याच्या शाखा एकशें एक, भेद श्यायशीं. सामवेद–याच्या शाखा एक हजार. अथर्वणवेद–याच्या शाखा बारा. (संख्यावाचककोश–पृष्ठ १५.) १०. सांख्य, योग, न्याय, वैशेषिक, मीमांसा आणि वेदांत हीं सहा शास्त्रें. ११. पुराणें अठरा आहेत त्यांचीं नांवें:—'ब्राह्मं पाद्मं वैष्णवं च शैवं भागवतं तथा। तथान्यन्नारदीयं च मार्कंडेयं च सप्तमम् ॥ आग्नेयमष्टकं प्रोक्तं भविष्यन्नवमं तथा। दशमं ब्रह्मवैवर्तं लिंगमेकादशं तथा ॥ वाराहं द्वादशं प्रोक्तं स्कांदं चात्र त्रयोदशम्। चतुर्दशं वामनं च कौर्मं पंचदशं तथा ॥ मात्स्यं च गारुडं चैव ब्रह्मांडाष्टकादशं तथा. ॥' व अठरा उपपुराणें आहेत तीं अशीं:—'अष्टान्युपपुराणानि मुनिभिः कथितानि तु। आद्यं सनत्कुमारोक्तं नारसिंहमतः परम्। तृतीयं नारदं प्रोक्तं कुमारेण तु भाषितम्। चतुर्थं शिवधर्माख्यं साक्षान्नंदीशभाषितम् ॥ दुर्वाससोक्तमाश्चर्यं नारदोक्तमतः परम्। कापिलं मानवं चैव तथैवोशनसेरितम् ॥ ब्रह्मांडं वारुणं चाथ कालिकाह्वयमेव च। माहेश्वरं तथा शांबं सौरं सर्वार्थसंचयम् ॥ पराशरोक्तं प्रवरं तथा भागवतद्वयम्। इदमष्टादशं प्रोक्तं पुराणं कौर्मसंज्ञितम् ॥ चतुर्धा संस्थितं पुण्यं संहितानां प्रभेदतः ॥.' यांजविषयीं सविस्तर माहिती लोकहितवादीकृत 'ऐतिहासिक गोष्टी व उपयुक्त माहिती–भाग दुसरा' पृ० ४५-५१ यांत आहे ती पहावी. १२. करण्यांत, करून. १३. पुण्य. १४. मिळव. १५. श्रेष्ठ पदवी, मोक्ष.

(ओंव्या.)

तव ससाणा बोलिला उत्तर, । 'राया! माझा मज देईं अहार ।
ज्याचा त्याशीं द्यावया विचार । कासया करिशी? राजेंद्रा!' ॥ ११
बाज कहत, 'राजा [1]सून । क्षुधाबिकल होत प्राण ।
सुनके न करो मन [2]सुन्न । प्राण तनसे निकलता'. ॥ १२
रायाशी थोर संकट पडलें । सुबुद्धि प्रधान बोले ।
म्हणे, 'जया पाठीशीं घातलें । [3]त्याशी माघारें घालूं नये, ॥ १३
कपोत राजासे कहत । [4]बूंद आखोसे [5]टपकत, ।
'[6]जोरू मेरी अशक्त । बच्चे हरवख्त रोवते. ॥ १४
ससाणा द्यावा [7]काढून । '[8]जीवघातकी [9]दुर्जन' ।
ऐसें बोलतां ससाणा जाण । [10]क्रोधानलें खवळला. ॥ १५

(श्लोक.)

आवेशें म्हणतो, '[11]अगम्य तुमचीं नांवें तरी ठेविलीं,
मजला हो! [12]गमता कुबुद्धि म्हणुनी अंधत्वता सेविली, ।
[13]जंबूकें पाहतां भिऊन पळतो तो शूर पहा कसा?
[14]केसरिची पदवी उगीच मिरवी मिथ्या कसा तो असा? ॥ १६
[15]कमलनयन राम म्हणतो आंधळा, भींक मागतो शचिरमण तो भला ।
क्षीरसिंधुनाम [16]प्रौढि वदतसे, [17]तक्र न मीळतां प्राण जातसे. ॥ १७
निर्भर्त्सुनि उभयता [18]बुधां, भवंडी [19]दाटली पक्षिया तया ।
घाबरोनि प्राण जाऊं पाहतसे, [20]राव धांवुनि समीप येतसे ॥ १८

---

१. ऐक. २. कठोर, दयाशून्य. ३. 'त्याशी राया! देऊं नये' असें पाठांतर आहे. ४. अश्रू. ५. गळत. ६. बायको. ७. हांकलून द्यावा. ८. जीवांस मारणारा, प्राणनाश करणारा. ९. दुष्ट. दुर्जन—दुष्ट पुरुष. येथें ससाणा हा पक्षी असून त्यास दुर्जन म्हटलें हें सयुक्तिक दिसत नाहीं. १०. क्रोधरूपी अग्नीनें. ११. 'अयोग्य' असा अन्य पाठ आहे. १२. ससाण्याच्या म्हणण्याचा भाव कीं:—तुमचीं नांवें चांगलीं आहेत पण तुम्ही दुष्टबुद्धि आहा म्हणून काणा डोळा करितां, माझ्या प्रार्थनेकडे लक्ष्य देत नाहीं. १३. कोल्ह्यानें. १४. सिंहाची. १५. केव्हां केव्हां फार अनन्वर्थक नांवें असतात:—मेलेल्या मनुष्याचें नांव अमरनाथ, भिक्षा मागणाराचें नांव धनपाळ, नांव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा:—तसेंच 'धत्तूरही कनक नाम सदा धरीतो । होईल काय रसिकां कनकापरी तो' [रघुनाथपंडित] इत्यादि प्रकार याच मासल्याचे होत. १६. गर्वानें. १७. ताक. १८. राजा (शिबि) व प्रधान (सुबुद्धि) यांस. १९. भोंवळ आली, चक्कर आली. २०. राजा.

(साक्या.)

पानि लगावे आं[1]खनको तब बाजको हुशार किया ।
बोलत मुखसे दीन होकर, 'प्रान बे[2]चा मेरे भय्या!' ॥
धन धन राजा! रे! । क्या कहुं आजकी मौजा रे! ॥ १९
'कपोत बराबर और मांस देऊं तुझे मैं खानेको, ।
नरका मांस चा[3]हत मुझको और न भा[4]वे मैं[5]नको ॥
मोल न लियो रे! । साची बात कियो रे!' ॥ २०
सत्यवती राजाकी औरत पतिव्रता वहां आयी, ।
'अपना मांस मैं तुझको देऊं खाव बाज मोरे भाई! ॥
रामदु[6]हाई रे! । तेरी यह कँ[7]माई रे!' ॥ २१
बाज कहे, 'सुन; मांस तिहा[8]रो मेरे काम न आवे.' ।
राजा कहे, 'मैं अपना देऊं.' सुनत बाज चुप रहिये ॥
धन धन राजा! रे! । क्या कहुं आजकी मौजा रे! ॥ २२
मांस तुलाने तं[9]खरी मगाये कपोत उसमें डारा ।
काटनको लिया शस्त्र हातमो वहीं पडा उं[10]जियारा ॥
धन धन राजा! रे! । क्या कहुं आजकी मौजा रे! ॥ २३

(घनाक्षरी.)

अमर सबही देखत । धन्य राजा कहावत ।
इंदर करावत अं[11]दावत । पद पावत राजेसो. ॥ २४
अस्तुत करत रखी सब । डंगली डोले शिबि तब ।
मुंड हलत लबलब । सब एकसारिखें. ॥ २५
शिबि पावे बैकुंठराज । धन्य धन्य वो! महाराज ।
हा मैं तेरा दगाबाज । कपोत बाज पस्ताया. ॥ २६

(साक्या.)

पाव पैं[12]लखमें दौरत नारद कं[13]मलापतिपैं आये ।

---

१. डोळ्यांस. २. बचाव, वांचव. ३. आवडतें, पाहिजे. ४. आवडत नाहीं. ५. 'मुझको' असें पाठांतर. ६. दुहाई=शपथ. ७. 'बढाई' असा अन्य पाठ आहे. ८. तुझें. ९. तागडी, ताजवा. १०. उजेड, प्रकाश. शस्त्र लकलकलें म्हणून प्रकाश पडला—असा भावार्थ. ११. वैर, द्वेष. १२. पळांत. १३. विष्णूजवळ.

'सुन ठाकुर वो! भक्तश्रेष्ठका मर्म कहां लोपाये? ॥
सुन सुन ठाकुरजी! । करि मैंनें यह अर्जी.' ॥ २७
नारदकी फिर्याद सुनके कमलापति उन चाहे ।
पीत पटोला लटकत माला दौरत दौरत आये ॥
भली करी कमाई रे! । अब देखनमें आई रे! ॥ २८
चतुर्भुज करके राजाको विमान बीच चढाया ।
सब नगरिसमेत राजा बैकुंठपद पाया ॥
सुन सुन पंडुकुमारे! । कीर्ति बेखानत अमरा रे! ॥ २९

(श्लोक.)

ते हे कथा ऐकिली धर्मरायें, तुझाही महिमा तसाचि आहे ।
बोलूनि ऐसें मुनि शीघ्र नीघे, आनंद धर्मामनि अंतरंगे. ॥ ३०

(साकी.)

भक्तजनाची कीर्ति अद्भुत वाढविली श्रीरंगें ।
संकट जाणुनि सर्व सोडुनी धांवे आपुल्या अंगें ॥
तोचि पहा हा विटेवरी प्रत्यक्ष उभा पांडुरंग ।
हे विनवणी मान्य करावी गावा प्रेमें अभंग ॥
माझी कृष्ण गुरुमाय । वंदी राघव तव पाय. ॥ ३१

---

१. वस्त्र. 'पटल' शब्दाचा अपभ्रंश. २. वर्णन करितात. ३. देव. ४. वाटे. ५. स्वतः, खुद्द. ६. ही इंद्रवीट म्हणून प्रसिद्ध आहे. तिची कथा अशीः—इंद्राला गौतमानें अहल्येशीं जारकर्म केल्याबद्दल 'तुला सहस्र भगें पडतील' असा शाप दिला, परंतु इंद्र शरण आला म्हणून मुनि प्रसन्न झाला आणि 'तुझें शरीर चतुष्कोण विटेप्रमाणें पाषाणरूप होऊन दिंडीरवनांत पडेल व तेथें श्रीकृष्णचरणाचा स्पर्श होऊन तूं पूर्ववत् होशील आणि स्वपद पावशील' असा उःशाप दिला. पुढें श्रीकृष्ण विठ्ठलरूपानें पुंडलिकाच्या दर्शनास आले. तोंपर्यंत ही इंद्रवीट पुंडलिकानें नारदाच्या सांगीवरून आपणापाशीं ठेविली होती. श्रीकृष्ण आल्यावर पुंडलिकानें ती वीट पुढें केली. तिजवर श्रीकृष्ण उभे राहिले तेव्हां इंद्र शापमुक्त झाला व वीट तशीच कायम राहिली. ७. अक्षय्य, चिरकाल. ८. आराध्यदेवतेला 'माउली', 'आई', 'माय' अशा स्त्रीवाचक शब्दांनीं संबोधण्याची चाल आहे. जसें:–येग येग माझे आई । पंढरीचे विठाबाई ।।' [तुकाराम]. ९. 'जीवनसुत वंदी पाय' असाही पाठ आहे. परंतु हा पाठ खरा नसावा अशी आमची समजूत आहे. कारण राघवकवीनें सुरथसुधन्वाख्यान, गजगौरीव्रताख्यान व वीरमणिकथा हीं आ-

# शिवराममुनीश्वरकृत

## १९. निःसंदेहदिवाकर.

(ओंव्या.)

ॐ नमो जी सद्गुरुराया ! । शरण आलों तुझिया पायां । स्वरूपस्थिति जिरवावया । सकळ संशयो निरेसीं[2]. ॥ १ ॥ म्हणसी संशय तो काय । तो किती सांगूं मी समुदाय । जाणसी अंतरींची सोय । वारीं अपाय संदेहाचा[3]. ॥ २ ॥ तंव गुरु म्हणती, 'शिष्यटिळका ! । तुझ्या कळल्या अंतरींच्या आशंका । त्यांचा धरुनि देऊं आवांका । संदेहपंका[4] क्षाळीन[5] मी. ॥ ३ ॥ म्हणसी तुळाज्ञान[6] मुळाज्ञान[7] । याचें कायसें लक्षण । ऐसेया आक्षपें जाण । ऐक सावधान सांगेन. ॥ ४ ॥ जो इंद्रियें चाळक सर्व । जाणतें चैतन्य[8] स्वयमेव[9] । त्या आत्मयाची जे नेणिव[10] । तया नांव मुळाज्ञान. ॥ ५ ॥ आतां स्थूलाज्ञान जें कांहीं । या भूतभविष्याच्या ठायीं । होणें झालें हें कळत नाहीं । तुळाज्ञान पाहीं या नांव. ॥ ६ ॥ जैसें कां मुळाज्ञान । उरल्या बाधी जन्ममरण । तैसेंचिया तुळाज्ञान । जन्मबंधन न्हेचि. ॥ ७ ॥ अग्निलेश तेथें पडतां । जाळूनि टाकील पदार्थां । तेचि राखोंडी फुंकितां । वाती सर्वथा न लागेचि. ॥ ८ ॥ तेंवि आत्म[11] नेणिवेचि उरीं । जन्ममरण भोगिजे भारी । तेचि मिथ्या जगाचे कुसरी[12] । नकळे तरी भय ॥ ९ ॥ यालागीं हें तुळाज्ञान । उरल्या न बाधी जन्ममरण । समूळ करावें निरसन । मुळाज्ञान अविश्रमें. ॥ १० ॥ आतां सामान्य विशेषज्ञान । आधीं सांगूं सामान्य साम्यलक्षण । वृत्तिवेगळें जें जाणणें । तें शुद्ध चैतन्य स्वरुपीं. ॥ ११ ॥ व्यवहारीं असलिया पाहीं । वृत्ति असलिया

---

ख्यानें केलेलीं आहेत; त्या आख्यानांची भाषाशैली व ह्या प्रकरणाची भाषाशैली यांत फारच साम्य आहे. शिवाय सागराकडून (कवीच्या राहण्याच्या प्रांतांतून) मिळालेल्या प्रतींत राघवाचेंच नांव आहे. तेव्हां आम्ही म्हणतों तोच पाठ खरा असावा.

१. या ग्रंथाचा कर्ता शिवराममुनीश्वर या नांवाचा एक तापसी सुमारें ५० वर्षांपूर्वीं रत्नागिरी जिल्ह्यांतील वेंगुर्लें तालुक्यापैकीं आचरें म्हणून गांव आहे तेथें श्रीरामेश्वर या नांवाचें प्रसिद्ध देवस्थान आहे, ह्या देवालयांत बरींच वर्षें होता. हा पूर्वींचा कोठील राहाणारा व जातीचा कोण याची कांहीं माहिती मिळत नाहीं. २. नाहींसा करणें. ३. भ्रांतीचा. ४. संशयरूप चिखलास. ५. साफ करणें. ६. तुळाज्ञान, (आत्मप्रतीति.) ७. मूळमाया. ८. ज्ञानकळा, जीव, आत्मा. ९. स्वतःसिद्ध. १०. अज्ञान. ११. स्वरूपज्ञान न झालें असतां. १२. कौशल्य.

आणिका ठायीं । आभास[१] मात्र सर्व इंद्रियीं । ते जाण ठायीं सामान्यता. ॥१२॥ ते वृत्ति[२] करूनि तदाकार । बरवा[३] करितां व्यवहार । त्याहुनि दिसे साचोकार[४] । तें ज्ञान निर्धार विशेषाचें. ॥ १३ ॥ जैसा कां रवीचा प्रकाश । सर्वही वसे सावकाश । त्यामाजी ठेविल्या ताठ जैसें । अधीक भासे दैदीप्य. ॥ १४ ॥ तें वृत्तीवीण जें जाणणें । तें सामान्य ज्ञानाचे लक्षणें । वृत्तियुक्त जें करणें । तें ज्ञान पूर्ण विशेषाचें. ॥ १५ ॥ आतां अन्वय[५]व्यतिरेक[६] परियशीं । जें उरे जडाचेनि रासीं । तया निरसी त्या वृत्तीसी । पूर्ण ग्रासी तो व्यतिरेक. ॥१६॥ सर्व इंद्रियद्वारीं । वर्ततीं विषय व्यवहारीं । दृश्य[७] नाढळे तिळभरी[८] । ते खूण अवधारी अन्वयाची. ॥ १७ ॥ जैसा उदयो झालिया गभस्ती[९] । क्रिया करवी जना हातीं । स्वयें बिंबोनि जळाप्रती । अलिप्त सर्वार्थी तो जेवीं. ॥ १८ ॥ तैसें दृश्य[१०] द्रष्टा[११] दर्शन[१२] । याहूनि भिन्न ज्ञानघन[१३] । त्या नांव व्यतिरेक जाण । अन्वयलक्षण अवधारी. ॥ १९ ॥ जैसें सोनें एकपणें । अनेक नांवें झालें लेणें[१४] । परी तें दिसताहे सुवर्ण । विजाती भान नाढळे. ॥ २० ॥ तैसें नामरूपासहित । भूत[१५] भौतिक[१६] हें समस्त । पूर्णात्मत्वें भासत । अन्वय निश्चित या नांव. ॥ २१ ॥ मग आपआपणाचि खेळे । ग्रासुनि त्रिपुटीचे[१७] डोळे । श्वेत रंगाचीं मुकुलें । तरंगीं जें जळ ऐक्यत्वें. ॥२२॥ तैसा व्यवहार तमाचा[१८] उदयो । आठवू[१९] नाहीं मा कैंचा लयो । तया अनुभवातें अन्वयो । बोलिजे पहा हो! सज्ञानी. ॥ २३ ॥ आवृत्ति[२०] व्याप्ति[२१] फळ व्याप्ती । करूं या दोहींची निगुती । तरी येथें हे उपपत्ति । बरवी चित्तीं अवधारीं. ॥ २४ ॥ जड[२२] पदार्था लागुनि । व्याप्ती लागती या दोनी । फळ व्याप्ती न लागे चैतन्यीं[२३] । ऐसें सज्जनीं बोलिजे. ॥ २५ ॥ पदार्थ देखिलियाहिवरी । पूर्वी असे तयाची नेणिवी । तो

---

१. प्रतिबिंब, भास. २. अंतःकरणवृत्ति. ३. उत्तम, चांगला. ४. सत्यता, खरें, सिद्धांत. ५. प्राप्ति, स्थिति, अणूपासून ब्रह्मापर्यंत व्याप्ति, रूपक्रमानें जो संबंध तो. ६. निराळेपण, वर्जन. जें नसतें असा जो हेतु साध्यभूत अर्थाचा अभाव सत्तेचा नियम तो. उ० वन्ह्यभावे धूमाभाव. ७. दिसणारे. ८. अल्प, किंचित्. ९. सूर्य. १०. दिसणारें. ११. पाहणारा. १२. पहाणें. १३. ज्ञानरूप मेघ. (परमेश्वर.) १४. दागिने. १५. भूतमात्र. (प्राणी, पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश.) १६. पंचभूतांपासून झालेलें शरीर. १७. ज्ञान, ज्ञाता, ज्ञेय, ध्यान, ध्याता, ध्येय. १८. अंधकार. १९. आठवण, स्मरण. २०. येणेंजाणें, जन्ममरण, लक्षचौऱ्यायशीं योनी. २१. कोणेक पदार्थमात्राचे ठायीं कोणेक पदार्थमात्राची स्थिति ती व्यापकता. २२. नाशिवंत. २३. जीव, आत्मा, ज्ञान, चित्त (चेतना, सजीवपणा.)

देखतां नेणणें दडवी । ते व्याप्ती बरवी वृत्तीचीं. ॥ २६ ॥ मग तेथें आत्मत्व[1]पणें । नामरूपाविण भावणें । वृत्ति[2]व्याप्ति या नांव जाणणें । ऐसें लक्षण दोहींचें. ॥ २७ ॥ तैसें चैतन्य[3] जाणावया । अज्ञान मात्र जाइजे लया । ते वृत्ति व्याप्ति शिष्यराया! । नाहीं तया फळ व्यक्ती. ॥ २८ ॥ अज्ञान मात्र जातां जाण । फळरूपीं आत्मा आपण । यालागीं फळव्याप्तीचें कारण । जडाचि लागुनी पाहिजे. ॥ २९ ॥ आतां सच्चिदानंद[4] उपदेश । जेथें नामरूपाचा ऱ्हास[5] । त्या प्रश्नाचा सौरस[6] । ऐक विशेषें सांगेन. ॥ ३० ॥ आहे जाण तें आवडतें । या तिहीं पदीं ब्रह्म देखतें । आतां नामरूप जें । दिसतें यापरी निरुतें[7] भोगा आलें. ॥ ३१ ॥ असत्य जड[8] दुःख पदार्थें । सच्चिदानंद त्यातें । यास करूनियां निरुतें । नामरूपातें निरविलें[9]. ॥ ३२ ॥ जें पदार्थाचें आहे पण । तें तें सत्‌शब्दाचें लक्षण । जें जें जड तें जाणणें । चित्‌शब्द जाण या नांव. ॥ ३३ ॥ प्रियकर आहे पदार्थ । यालागीं आनंदें सेवित । ऐसिया लक्षणीं आलंकृत । जाण निश्चित सच्चिदानंद. ॥ ३४ ॥ यालागीं जितुकें नाम रूपडें । तें आहे जाण तें आवडे । ऐसें सच्चिदानंद रोकडें[10] । मग सहजें बुडे नामरूप. ॥ ३५ ॥ म्हणसी दुःख आंगीं आदळे । तैं आनंदातें केंवि मिळे । तरी फेडावया दुःखाचें सळें[11] । रुदन सकळहि करिती. ॥ ३६ ॥ रुदनें होय दुःखप्राप्ति । तरी लोक कां बा! आरडती । म्हणोनि निरसावया दुःखप्राप्ति । आश्रयो करिती रुदना. ॥ ३७ ॥ ऐसिया आपुलिया अनुभवें । सच्चिदानंद[12] मात्र जाणावें । समूळ ग्रासुनी जाणिवें । अनुभवीं विचरावें. ॥३८॥ आतां सविकल्प[13] निर्विकल्प[14] समाधी[15] । निर्विकल्प सांगों आधीं । जेथें सकळ वृत्तीची मांदी[16] । निजानंदीं[17] लय पावे. ॥ ३९ ॥ वृत्तीवरी नाहीं येणें । विशेष खुंटे क्रियाचरणें । अखंड स्वरूपीं[18] निमग्न[19] । वृत्ति शून्य[20] होउनि. ॥ ४० ॥ मग आंगीं

---

१. सर्वत्र आत्माच नटला आहे असें पाहाणें. २. क्रोध, लोभ, मोह इ० रूप अंतःकरणाची अवस्था (२ वर्तन, ३ वतन, ४ प्रकार). ३. ज्ञानकळा, जीव, आत्मा. ४. सत्=सत्य (खरें, वास्तविक) चित्त=बुद्धि (ज्ञान) आनंद. ५. नाश. ६. अभिप्राय, कारण, प्रसाद. ७. खरें. ८. नाशिवंत. ९. निरवणें=निर्वाह करणें. १०. खरें. ११. अभिमान, आग्रह, छळ, स्पर्धा. १२. स्वस्वरूपलक्षण. १३. विकल्प=कल्पना, सविकार, सकाम (अविद्यायुक्त). १४. कल्पनारहित निष्काम ब्रह्म, समाधि (योगनिद्रा). १५. ध्यानाची पक्कदशा. १६. मंडळी. १७. निज (आपलें निजगुज,) आनंदीं (आनंदाचें ठायीं.) १८. स्वस्वरूपाचे ठायीं. १९. गर्क. २०. अंतःकरणवृत्ति (भावना) शून्य (नाहींशी होणें) निष्कामवृत्ति.

बाणलिया ताटस्तता[1] । तिये नांव निर्विकल्पता । तिचेंहि तत्वता । रूप करूं. ॥ ४१ ॥ सहज करितां व्यवहारस्थिती । नांदे दुष्टत्वाची प्रतीती । स्वानुभवें सहज स्थिति । आनंद चित्तीं अपार. ॥ ४२ ॥ जैसा नट नटे नानापरी । परि आपणा न विसरे तिळभरी । तैसा योगी व्यवहारीं । क्रिया करी अविश्रमें. ॥ ४३ ॥ हें सविकल्प समाधियोग । ऐक सहज[2] समाधि प्रसंग । जेथें नांदे राजा योग । हारपे भवरोग ऐकतां. ॥ ४४ ॥ दृश्य मुळीं देखिलेंचि नाहीं । मानी द्रष्टा हें कैंचें कायी । स्वरूपीं स्वरूपें घडला पाहीं । विचरतांही व्यापारीं. ॥ ४५ ॥ जैसा कां हा गभस्ती । न देखेचि दिवा राती । तैसे योगी सहज स्थिति । जगीं विचरती[3] स्वानंदें. ॥ ४६ ॥ हें सहज समाधीलक्षण । बाळ्यां[4] भोळ्यां न टॅके[5] जाण । जो सद्गुरूचा अनन्य शरण । त्यासि हें पूर्ण आतुडे[6]. ॥ ४७ ॥ आतां मनो नास वासनाक्षयो । या संदेहाचा करूं क्षयो । जेथें नुपजे संशयो । होय दिग्विजयो ऐकतां. ॥ ४८ ॥ जों आत्मरूपें नेणिजे मना । तों विषयीं धांवती वासना । जयासि विवेकें लाविती भजना । मग जे कल्पना मावळे. ॥ ४९ ॥ मुळींच निमाली मनोवृत्ति । तेथें केंवी वासना उठती । निर्वासना येणे रिती । ऐसें बोलती सज्ञानी. ॥ ५० ॥ पुढें उरेल सूक्ष्म मन । तयास झाल्या तत्वज्ञान । मग नाठवे द्वैत[7] भान । स्वरूपीं निमग्न निर्हेतु. ॥ ५१ ॥ हें साधन क्रमलक्षण । आतां आधींच झाल्या तत्वज्ञान[8] । निःशेष विरोनि जाय मन । मग वासना कोठुनि उठती. ॥ ५२ ॥ जैसें मूळ आहे सजीव । तंव तंव वाढती शाखा पैलव[9] । तेंचि मूळ पडलिया जाणिव । शाखा उद्भव नव्हेची. ॥ ५३ ॥ तैसें मनोजय झालिया जाण । तेंचि वासना क्षयाचें लक्षण । हें कदां न घडेचि जाण । तत्वज्ञान जैं होय. ॥ ५४ ॥ आतां इत्यादि आशंका जाण । सांगूं तयाचें लक्षण । तरी एकाग्र करुनि अंतःकरण । सावधान परियेसीं. ॥ ५५ ॥ म्हणसी आत्मा स्वयंप्रकाश[10] । नसत्या अज्ञानें ज्ञानकळा दिसे । आत्म्याहुनि तव सकळ असे । अज्ञान विशेषें तरि ऐकें. ॥ ५६ ॥ आत्मज्ञान नव्हे ना अज्ञान । तो प्रकाश दैदीप्यमान । येथें आपुलिया नसत्या कल्पनेन । घेतला बांधून

---

१. ध्यानाची पक्वदशा, तदाकारवृत्ति. २. आठवितां नाठवतां जी ब्रह्मरूप स्थिति (समाधी.) ३. राहती, कालक्रमण करिती. ४. अज्ञानीयांस. ५. समजत नाहीं. (टकणें=पाहाणें.) ६. प्राप्त होई. ७. भेदबुद्धि, मीं, तूं, तो असा भेदभाव. ८. वास्तविक स्वरूपाचें ज्ञान. ९. पानें. १०. स्वतःचेंच प्रकाशामुळें प्रकाशमान असा.

लोकांनीं. ॥५७॥ पाहे पां स्वयें जो आंधळा। तरी काय रवी नाहीं उगवला। तेंवी मूढ अज्ञानें भुलला। तरी आत्मयाला हानी काय? ॥ ५८ ॥ आत्मज्ञानाचा वैरी होतां। तरि तो अज्ञानासी वारिता। यालागीं ज्ञान अज्ञान वार्ता। न लागे सर्वथा आत्मयासी. ॥ ५९ ॥ म्हणसी आत्मा सर्वगत[1]। तरी एका कळे एका नकळत। एक मूढ एक जाणत। अभेद भासत स्वरूपीं कां? ॥ ६० ॥ येथें कळणें आणि न कळणें। या दोहींसी बुद्धि कारणें। ते बुद्धि उजळलिया श्रवण मननें। आत्मा पूर्ण तेथें दिसे. ॥ ६१ ॥ जेंवि मलिनें आरसा पाहतां। सोज्वळ मुख न दिसे सर्वथा। तोचि साहाणेसी लावितां। सोज्वळता मुख दिसे. ॥ ६२ ॥ तैशा जन्मांतराच्या पुण्यरासी। निष्कर्म जोडी आपणांसी। तरीच सोज्वळता बुद्धीसी। तेणेंचि सांप्रदायासि[2] तो पावे.॥६३॥ म्हणसी जगद्रूप[3] आत्मा पूर्ण। जग हें पाहातां जन्ममरण। शरीरादिकां होतसे दहन। तेव्हां आत्मा पूर्ण नासला कां? ॥६४॥ ऐशिये आशंका शिष्यनाथा!। आत्मा देह इंद्रियीं असतां। त्या देह इंद्रिय दुःखें दुखवतां। तरी नासता देह दाहें. ॥ ६५ ॥ वृक्षादिकां आत्मा छेदितां। तरि तो आत्मा तेणें मरता। आत्मा छेदिता मरता। गुण धर्मता हे आघवे[4]. ॥ ६६ ॥ वृक्षगुल्फीं[5] आत्मा आहे। परी त्याचा छेद केलिया नव जाये। जैसें लोह पिटितां घणघायें। अग्नी तो पाहे अलिप्त. ॥ ६७ ॥ ऐसें गुण क्षोभाचें लक्षण। घडामोडी होतसे तेणें। आत्मा तंव सनातनपणें। सर्वी वसोनि सर्वातीत. ॥ ६८ ॥ म्हणसी आत्मा तंव परिपूर्ण। हें ज्ञालिया शुद्ध ज्ञान। तरि कां संतासि दोषगुण। दिसती जाण भूतांचे. ॥ ६९ ॥ तरी आत्मासाक्षी सर्वांचा। द्रष्टा[6] स्वयें गुणत्रयांचा[7]। अनुभवें अनुभवितां नित्य साचा। संशय याचा मग काय. ॥ ७० ॥ जो गुणधर्माचा देखता। तो गुणधर्म नव्हेचि तत्वता। सर्व वृत्तीचा भासविता। गुणागुण म्हणतां भय काय. ॥ ७१ ॥ कांचें[8] पिकें[9] फळ द्वयातें। यथातथ्य म्हणतां यातें। वक्ता तया विकारातें। काय तेथें पावला. ॥ ७२ ॥ तैसें मिथ्या गुणात्मक। जग हें देखतां सम्यक[10]। मग तयाचें कायसें लेखें[11]। स्वयें भासक सर्वांचा. ॥ ७३ ॥ म्हणसी आत्मा सदोदित। तरी लोक कां बा! मोह पावत?। तरी ऐक बा! तेथील अर्थ। सावध चित्तें करूनियां.

---

१. सर्वांतर्गत, सर्वव्यापी. २. शुद्धज्ञानाप्रत. ३. जगमय, जगत्स्वरूप. ४. अवघे. ५. वृक्षांतर्गत ढोलींत. ६. पाहाणारा. ७. तीन गुणांचा. (सत्व, रज, तम.) ८. अपक्क. ९. पिकलेलें. १०. खरोखरीनें पाहातां. ११. गणना.

॥ ७४ ॥ आत्मा स्वयें निर्विकारी[1] । बुद्धीसी बोध नाहीं तिळभरी । विचरतां[2] इंद्रियव्यापारीं । कर्तृत्वभारें शिणतसे. ॥ ७५ ॥ तेंचि विचाराचेनि भरें । बुद्धि होतां निर्विकारें । जळलिया दोषसंभारें[3] । तेव्हां साचार ऐसें कळे. ॥ ७६ ॥ अधिष्ठान[4] पंच[5] कार्या । वाहोनि मीं शीणलों वायां । आतां आहें वेगळा इया । ऐसें कळलिया सहज सुटें. ॥ ७७ ॥ तेव्हां बद्धमुक्तता बुद्धि-च्याठायीं । बुद्धियोगें ब्रह्म जीवित्व पाहीं । तियेवेगळें होतां पाहीं । कांहीं नाहीं स्वतःसिद्ध. ॥ ७८ ॥ म्हणसी सामान्यचि पावक[6] । तात्काळ जाळुनी करी राख । मा[7] ज्ञानाग्नि प्रज्वळलिया देख । देहभासक कां दिसे. ॥ ७९ ॥ तरी ऐक शिष्य योगी । कारण जाळुनी ज्ञानाच्या आंगीं । निर्जीव कार्य मात्र जगीं । कीर्तिलागीं उरली असे. ॥ ८० ॥ जन्मांतर दोषपंक्ति । निर्जीव कार्या तें देखती । भेणें[8] उठाउठी[9] पळती । यालागीं निश्चितीं काय कार्य. ॥ ८१ ॥ कां जैसें मेलें मढें । पाहतां भय नाहीं रोकडें । तैसें कारण मरं-[10]लिया पुढें । कार्य बापुडें काय करी? ॥ ८२ ॥ मुळींच निरसुनियां अज्ञान । मग देहाचें काय सत्यपण? । पूर्ण पावलिया निजात्म[11] खुण । मिथ्या भान दे-हाचें. ॥ ८३ ॥ आत्माच मात्र जाणीतलिया । प्रपंच हा पावे लया । शु-[12]क्तिका ऐसें कळलिया । पावे क्षया रौप्यत्व[13]. ॥ ८४ ॥ म्हणसी शुक्तिकेपूर्वीं रजत । देखिले होतें तरि साच भासत । तैसें आत्म्यापूर्वीं जग होतें । ऐसें दिसतें यावरुनी. ॥ ८५ ॥ तरी तुझें हें अज्ञान । तेंचि जगाचें आहेपण । यालागीं आत्म्याहुनी जाण । जग पुरातन तुज दिसे. ॥ ८६ ॥ तेंचि आ-त्मरूप कळलियावरी । [14]संकल्पासी मारिसी जरी । मग हें वंध्यासुतापरी[15] । जाणसी अंतरीं तूं तेव्हां. ॥ ८७ ॥ यापरी आशंका भान । याचें समूळ केलें निरसन । आतां स्वानुभवें संपूर्ण । राहें निमग्न अंतरीं. ॥ ८८ ॥ जरी आ-णिक आशंका उठती । त्याचीं उत्तरें यांतचि असती । बरवें विचारितां चित्तीं । होय निवृत्ति संशयाची. ॥ ८९ ॥ हा **'निःसंदेहदिवाकर'** । या ग्रंथाचा केला उभार । बोलिला **शि**वराममुनीश्वर । लक्ष्मीवर प्राप्तीसी. ॥ ९० ॥

हा[16] ग्रंथ पूर्णानंद सहज स्थिती । **बाबा उ**पसकर हें नाम प्रवृत्ति । अनाम

१. सुखदुःखावेगळा. २. फिरत असतां. ३. दोषसमूह. ४. आश्रय. ५. पांच विषयांस. (स्पर्श, रूप, रस, गंध, शब्द.) ६. अग्नि. ७. मग. ८. भयानें. ९. लौकर, झटपट. १०. नाहींसें झाल्यावर. ११. मी देह नव्हें, आत्मा आहें (नाहं देहास्मि) अशी खूण. १२. शिंपी. ३. रौप्य, (रुपें)पणा. १४. हेतू, मनोवासना. १५. वांझेच्या पुत्राप्रमाणें. १६. हा ग्रंथ शिव-

अनिर्वाच्य प्रवृत्ति ना निवृत्ति । जैसा कां तैसाच ॥ १ ॥ तया श्रीगुरुचरण-रजांकित दासें । तत्कृपे यया ग्रंथाक्षरें लिहिली असे । लिहिलीं म्हणणें मज विहित[1] नसे । लिहविता लिहिता लिहिणें [2]तो ॥ २ ॥

---

## [3]चतुरसाबाजीकृत

### १६. [4]रावणगर्वपरिहाराख्यान.

(श्लोक.)

[5]दशाशीर हा फार उन्मत्त झाला, [6]बळें सुरवरां घातलें [7]बंदिशाला ।
बलाढ्यांमधें शूर, कोणा [8]बधेना, तयाशीं रणीं झुंजणारा दिसेना. ॥ १
गृह सागरामध्यभागीं जयाचें, पुढें [9]गोपुरें; [10]दुर्ग तें [11]कांचनाचें ।
दहा शिरें, [12]विंशति हस्त ज्याला, **शिवाचे** कृपे वरदहस्त तयाला. ॥ २
ऐशीं सहस्र बरव्या [13]ललना तयासी, [14]कन्या व पुत्र गणना नलगे कुणासी ।
[15]**मंदोदरी** मुख्य तयांत राणी, तीही दिली [16]**सांबस**दाशिवानीं. ॥ ३
**लंकापुरी** पट्टन कांचनाचें, पूर्वी असे हेंचि [17]कुबेर याचें ।
प्रसन्न केला **शिवसांब** यासी, त्याचे कृपे प्राप्त **दशाशिरासी**. ॥ ४

---

रामसुनीश्वर यांनीं केला. पुढें पूर्णनाथ ऊर्फ बाबा उपसकर या नांवाचे साधु पुरुष रत्नागिरी जिल्ह्यांतील वेंगुर्लें गांवीं ५० वर्षांपूर्वी होऊन गेले, (त्याची समाधी तेथें आहे.) यांनीं या ग्रंथाचें प्रांजल्य करून लिहून आपल्या संग्रहीं ठेविला. या उभयतां पुरुषांचें परस्परांवर प्रेम होतें. ह्या शेवटील २ ओंव्या बाबा उपसकर यांनीं केलेल्या आहेत.

१. योग्य. २. ईश्वर. ३. मागें पृष्ठ ४५ टीप ११ पहा. ४. हा कथाभाग पातालखंडांत आहे. असें या प्रकरणाच्या चरमपद्यावरून दिसतें. ५. रावण. ६. जबरदस्तीनें, जबरीनें. ७. कारागृहांत. ८. हार जाईना, जिंकला जाईना. ९. पुरद्वार, शहरचा रस्ता. १०. किल्ला. ११. सोन्याचें. १२. वीस. १३. स्त्रिया. ['**ललना** कामिनीनारीभेदजिह्वासु योषिति.' इति विश्वमेदिन्यौ]. १४. मुली. ['**कन्या** नार्यां कुमार्यां च राश्यौषधिविशेषयोः' इति हैमः. '**कन्या** कुमारिकानार्योरौषधीराशिभेदयोः' इति मेदिनी.] १५. रावणाची भार्या. मयासुरास हेमा नामक अप्सरेपासून झालेल्या तीन कन्यांपैकीं दुसरी. १६. एकट्या शिवानेंच दिली असें नाहीं तर उभयतां शंकर व पार्वती यांनीं दिली. १७. हा रावणाचा सापत्नबंधु. कुबेर=कुत्सितं बेरं शरीरं यस्य सः कुबेरः=कुष्ठत्वानें ज्याचें शरीर दूषिलें आहे तो कुबेर. । 'कुत्सायां क्विति शब्दोऽयं शरीरं बेरमुच्यते । कुबेरः कुशरीरत्वान्नाम्ना तेनैव सोंऽकितः ॥' इति वायुपुराणम्. कुबेर हा विश्रवस् याचा मुलगा; म्हणून यास वैश्रवण असें म्हणतात. हा उत्तर दिशेचा स्वामी, याला तीन पाय आणि आठ दांत असल्यामुळें कुरूपाचें सूचक असें 'कुतनु' हें नांव आहे. हा शिवाचा मित्र म्हणून याला 'ईशसख' असेंही म्हणतात.

(दिंडी.)

असा रावण नित्य संपतीनें, सौख्य भोगीत श्रीशिवकृपेनें ।
भक्तिविषयीं अद्वैतभाव नेणें, चारि वेदांचीं खंडें केलिं जेणें. ॥ ५
महाज्ञानी तो भक्त सांबजीचा, गर्वमदें जाहला मस्त साचा ।
ग्रह फिरले पाय अवदसेचा, दुष्टबुद्धी लागली तया वाचा. ॥ ६

(श्लोक.)

प्रधानाप्रती पूसतो लंकनाथ, 'अतां कोण ते राहिले पृथ्वियांत ? ।
प्रधान म्हणे, 'राहिल्या तीन मूर्ती, पहा सांगतों ऐक बा ! स्वस्थचित्तीं. ॥ ७
महादेव तो, दूसरा विष्णुदेवो, बळी तीसरा [1]सप्तपातालिं राहो !' ।
ऐसें ऐकितां बोलिला असुर वाणी, 'आम्हा दैवत मुख्य [2]पीनाकपाणी. ॥ ८
बळी आणि विष्णूसि आणूं चला रे !' म्हणोनी सर्वे घेऊनी [3]सैन्यभारे ।
मदोन्मत्त राक्षस कोट्यानुकोटी, निघाले सर्वे व्यर्थ मार्गांत दाटी. ॥ ९
विवरद्वारीं जाउनी तो विलोकी, [4]सैन्यासुद्धां मार्ग तेथें नसे कीं ।
अभिमानानें एकटा आंत गेला, [5]अंधःकारें फार हैराण झाला. ॥ १०

(गीतिवृत्त.)

जाउनि बळिचे द्वारीं रावण पाहुनि चहूंकडे भुलला ।
दरवाजाची [6]उपमा लंकेसि नये म्हणोनि तो थकला. ॥ ११
रक्षक दूत बळीचे एकक [7]मेरूसमान दिसताती ।
पुसती दशाशिराला, 'कोठुनि आलासि येथ [8]जुत्पाती ?' ॥ १२

---

१. सप्तपाताळांचीं नांवें:—अतळ, वितळ, सुतळ, रसातळ, महातळ, तळातळ व पाताळ. [कथाकल्पतरु.] किंवा:—भूतळ, भवांगतळ, भिन्नतळ, आदितळ, आधारतळ, सर्वांतळ व उभयानकुळतळ. [शिवनिबंध.] २. पिनाकपाणि, शंकर. ३. सैन्यसमूह. ४. त्या विवरद्वारांतून पाताळांत सैन्यासह जाण्यास रस्ता नव्हता. ५. विवरद्वारांत काळोख असल्यामुळें. ६. बळीच्या राजवाड्याचा दरवाजा इतका सुंदर होता कीं जरी लंका सोन्याची होती तरी दरवाजाची बरोबरी करवली नाहीं—असा भावार्थ. ७. अवाढव्य. मेरू=पर्वतविशेष. 'शुशुभे दिव्यो राजवत्समधिष्ठितः । आदित्यतरुणाभासो विधूम इव पावकः ॥ मेरुस्तु योजनानां सहस्राणि चतुरशीतिरुच्छ्रितः । प्रविष्टः षोडशाधस्तादष्टाविंशति विंशतिः ॥ विस्तत्तरात्रिगुणस्तस्य परिणाहः समंततः ॥' इत्यादि मेरुपर्वताचें वर्णन मत्स्यपुराणांत आहे. हा पर्वत ग्रीक लोकांच्या ऑलिम्पस् पर्वतासारखा होय. ८. जुत्पति ?

(ओव्या.)

रावण म्हणे, 'तयांप्रती । मी आहें रे! लंकापती ।
बळीसी सांग सत्वरगती[1] । युद्धासि येई म्हणोनी.' ॥ १३
ऐकोनि हांसती सेवकजन, । 'तुज येथेंचि टाकूं रे! मारून ।
युद्धाची वार्ता देई सोडून । प्राण अपुला रक्षीं कां[2].' ॥ १४
मागुती बोले दशाशिर, । 'निरोप सांगा रे! सत्वर.' ।
द्वारपाळ महाचतुर । जाउनी बळिरायातें सांगती. ॥ १५
'कोणी एक मृत्युलोकाहून । आलासे मर्कटासमान ।
तुम्हासीं युद्ध करीन म्हणोन । बोलत उभा तो महाद्वारीं. ॥ १६
दहा शिरें वीस हस्त तयासी । लंकापती नाम आपणासी ।
म्हणोनी बोले गर्वेसी । आज्ञा काय ती निरोपावी.' ॥ १७

(सवाई.)

ऐकुनियां बळिराज म्हणतसे रावण तो महामस्त मुळींचा
देव समस्तहि बंदिसि घालुनि आम्हासि नेण्याचि धरून इच्छा ।
घेउनि या, त्याचें पाहुं द्या स्वरूप[3] आल्याचें सार्थक होइल कांहीं
गर्व झडोनियां पडेल बंदिसि काढिना युद्धाचि वार्ता कदाही. ॥ १८

(श्लोक.)

प्रभूआज्ञा होतां गमन करिती सेवकजन,
दशाशीरा नेती त्वरितगति हस्तासि धरुन ।
सभेसी आणोनी सकळहि समाचार पुसती
सुधें[4] बोलेना तो बडबड करी मूर्खपधती[5]. ॥ १९
असें ऐकितां क्रोध रायासि आला, धरोनी शिरा जानुखालीं तयाला ।
बळें[6] दडपितां रक्त वाहे मुखासी, म्हणे, 'वांचवा प्राण जातो त्वरेसी.' ॥ २०

(गीतिवृत्त.)

बळिरायाची भार्या स्वामीसि म्हणे, 'क्षमा करावी जी! ।
अभिमानाची शिक्षा झाली आतां तयासि सोडा जी!' ॥ २१

---

१. लौकर. २. हें वाक्यपूरणार्थ अव्यय समजावें. ३. येथें द्विरुक्ति झाली आहे. 'स्वरूप' असें म्हटल्यावर मागें 'त्याचें' हें सर्वनाम नको. ४. बरें, नीट. ५. पधती=पद्धती. मूर्खाच्या रीतीनें, मूर्खाप्रमाणें. ६. बळानें, जोरानें, (पक्षीं) बळिराजानें.

राजा म्हणे स्त्रियेसी, 'मजला श्रीहरिसहीत नेण्याला ।
लंका सोडुनि आला यास्तव घडली [1]फलश्रुती त्याला.' ॥ २२

(दिंडी.)

श्वासोच्छ्वास टाकीत दशाशीर, मांडि काढोनी झुगारिला दूर ।
गात्रें विकळ जाहलीं अस्थि चूर, वीस नेत्रीं लागली अश्रुधार. ॥ २३
रायें पाहोनी बोलविल्या दासी, उष्ण पाणी घालोनि रावणासी ।
बरा होतां हो! लावा [2]गृहकामासी, दळण कांडण आणि पाणियासी. ॥ २४

(श्लोक.)

प्रभूआज्ञा होतां उचलुनि तयासी झडकरी
गृहीं नेती दासी मिळुनि सकळा [3]ते अवसरीं ।
मनीं संतोषोनी [4]रँगडुनि तया शेक करिती
विसांवा आम्हासी सहज घडलासे अवचिती. ॥ २५

(दिंडी.)

दहा [5]जांती मांडोनि रावणासी, वीस हातें लाविलें दळायासी ।
सार्वभौमत्व जाउनी तयासी, [6]कर्मभोगाची गती पहा कैशी. ॥ २६
वीस [7]कुंभ ठेविले तयापूढें, दशाशीर पाहतो चहूंकडे ।
बुद्धिभ्रंश जाहला जसें वेडें, नेति पाण्यासी धरूनि बापुडें. ॥ २७
ज्याचे द्वारीं तो सूर्य द्वारपाळ, चंद्र छत्र धरीतसे [8]त्रिकाळ ।
ब्रह्मदेव [9]पोतडें नित्यकाळ, सभेमाजी वाचीतसे त्रिकाळ. ॥ २८
जलाधीश वरुण वाहे पाणी, वायु झाडीतां नको [10]केरसूणी ।
इंद्र पुष्पाचे हार गुंफोनी, धुणें धुवोनी आणितसे [11]अग्नी. ॥ २९

---

१. फलश्रुति घडली=फळ मिळालें. २. हा समास चिंतनीय आहे. ३. त्या वेळीं, लगेच. ४. पुष्कळ किंवा रगडुनि=चेपून (पाठ वगैरे). येथें दुसरा अर्थच घेणें वरें. ५. जांतिणी, घिरीट. ६. दैवाची. ७. घट, मृत्तिकापात्र. ['**कुंभः** स्यात्कुंभकर्णस्य सुते वेश्यासुतौ घटे । राशिभेदे द्विपांगे च **कुंभं** त्रिवृत्ति गुग्गुले ॥' इति मेदिनी । **कुंभो** राश्यंतरे हस्तिमूर्धांशे राक्षसांतरे । कामुके वारनार्यां च घटे क्लीबं तु गुग्गुलौ ॥' इति मेदिनी.] ८. सर्वकाळ, सकाळीं, माध्यान्हीं व सायंकाळीं. ९. पंचांग. १०. वायूकडे झाडण्याचें काम होतें म्हणून त्यास झाडण्यास केरसुणीची जरूर लागत नसे—असा भाव. ११. अग्नीला सात भुज (हस्त), सात ज्वाला, चार शृंगें, तीन पाद, दोन शीर्षें आहेत असें वर्णन आहे. ['चत्वारि शृंगा त्रयोऽस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासोऽस्य'—असें अग्निवर्णन आहे.]

रिद्धिसिद्धी चामुंडा घरीं दासी, खंडेराव दाखवी नित्य अर्शी[1] ।
अशा प्रकारें समस्त देवांसी, बंदिं घालोनी लाविलें कामासी. ॥ ३०

(गीतिवृत्त.)

एवढी संपति ज्याची तो हा दशकंठ वाहतो पाणी[2] ।
हरिसी विन्मुख होतां अनुकुल नाहीं तयाप्रती कोणी. ॥ ३१
बळिरायाच्या सदनीं संवत्सर[3] एक नीच काम करी ।
राजस्त्रीनें[4] पाहतां करुणा येऊनि त्यासि मुक्त करी. ॥ ३२

(दिंडी.)

वामनरूपें श्रीविष्णु महाद्वारीं, रावण पाहोनी दंड [5]तो उगारी ।
म्लानमुखें फिरोनि रुदन करी, राजभार्या प्रार्थीतसे मुरारी. ॥ ३३
'जीव दान द्यावा जी रावणासी' हासिन्नले ऐकोनि हृषीकेशी[6] ।
'फजिती जाहली जाउंद्या वरासी'; आला होता आम्हासि न्यावयासी.॥३४

(श्लोक.)

पुढिल कारण जाणुनि श्रीहरी, असुर हांकुन घालितसे दुरी ।
'सुरगणां जरी सोडिसि निश्चयें, न करीतांचि[7] करिन कुलक्षयें.' ॥ ३५
विनवितो दशकंठ हरीप्रती, 'अवदशा मजला, फिरली मती ।
फजिति होउन हें पद पावलों, तवकृपें अजि शिक्षित जाहलों. ॥ ३६
जाऊनियां सुरगणासि निरोप देतों, सन्मान मान करुनी बहु आदरीतों ।
आज्ञा तुझी मजकडोन उलंघ[8] नाहीं.' ऐसें वदोनि मग रावण जात धाई. ॥३७

(गीतिवृत्त.)

जाउनियां लंकेसी भुलला पहिला जसा तसा असुर ।
अवतार सातवा[9] तो श्रीहरि घेउनि करील संहार. ॥ ३८

---

१. आरशी. २. पाणी वाहणें=नोकरी करणें, दास्य करणें. ३. वर्ष. ४. बलिराजाच्या स्त्रीनें. ५. विष्णू, द्वारपाल. ६. हृषीकांचा (देहमात्रांतील इंद्रियांचा) ईश (स्वामी) तो हृषीकेश. देहाचीं सर्व इंद्रियें विष्णूच्या प्रसादानेंच सुरळित चालत आहेत (कारण विष्णु पालनकर्ता आहे) अशी समजूत असल्यामुळें विष्णूला हें नांव पडलें. महाभारतांत म्हटलें आहे:—'हृषीकाणींद्रियाण्याहुस्तेषामीशो यतो भवान् । हृषीकेशस्ततो विष्णो ख्यातो देवेषु केशव ॥' [महाभारत.] 'जो ईश इंद्रियांचा, किंवा वश इंद्रियें जया असती । यास्तव त्या क्षेत्रज्ञा, नाम **'हृषीकेश'** जाहलें म्हणती. ॥ ४७ ॥' [नामार्थदीपिका—पृ० ६.] ७. देवांची सुटका न करितां. ८. अमान्य. ९. श्रीरामावतार.

निर्मित भविष्य कथिलें वाल्मिक ऋषिनें समग्र पूर्वींच ।
यास्तव दशाशिराची बुद्धी विपरीत होय सहजीच. ॥ ३९

(श्लोक.)

विस्तारपूर्वक चरित्र दशाशिराचें, पातालखंड पहतां कृत [1]वामनाचें, ।
त्यांतील तांत्रिक वदे सुतविश्वनाथ, पाहोनि शुद्ध करणार केवीं समर्थ. ॥ ४०

## सज्जनप्रार्थना.

(श्लोक.)

आकाशपंथगमनासि खगेंद्र जातो, पक्षी लहान अपुल्यापरि धांव घेतो ।
ऐसे समर्थ जन जोडिति थोर ग्रंथ, अज्ञान मी म्हणुनि शुद्ध करा [3]समर्थ. ॥

---

# [4]जनार्दनकृत

## १७. [5]दामाजीपंतचरित्र.

(गीतिवृत्त.)

प्रि[6]यंकर विठ्ठल ज्याला [7]मंगळवेढ्यांत भक्त दामाजी ।

---

१. वामनपंडितानें पातालखंडावर कविता केली असावी असें दिसतें. शोधकांनीं तपास करावा अशी सविनय प्रार्थना आहे. २. बुधजन, पंडित. ३. या श्लोकावरून कवीची लीनता व शालीनता दिसून येते. ४. पृष्ठ ७३ टीप १ पहा. या कवीनें दानावर्ताख्यान व हस्तामलकटीका अशीं आणखी दोन काव्यें केलीं आहेत असें समजतें. अजून उपलब्ध झालीं नाहींत. शोधकजनांनीं तपास करावा अशी सविनय प्रार्थना आहे. ५. दामाजीपंत हा आपल्या वयाच्या सोळाव्या वर्षीं कारकून या नात्यानें कोणा अधिकाऱ्याच्या नोकरीस राहिला. तेथें मोठ्या हुशारीनें व प्रामाणिकपणानें १०।१५ वर्षें चाकरी केली. पुढें वाढतां वाढतां मंगळवेढ्याचा ठाणेदार झाला. व तें कामही यानें इमानेंइतबारें १५।२० वर्षें केलें. त्या वेळेस मंगळवेढें बेदरच्या बादशहाच्या ताब्यांत होतें. ज्या दुष्काळांत दामाजीपंतानें सरकारी धान्य गरीब लोकांकडून लुटविलें तो इ० स० १४६० म्ह० शा० श० १३८२ सालीं पडला होता. त्या वेळीं बेदर येथें हुमायून नांवाचा आपणास ब्राह्मणीवंशीय म्हणविणारा यवन राजा होता. तो इ० स० १४५० पासून इ० स० १४६१ पर्यंत गादीवर होता. ह्या वंशाचे एकंदर १८ राजे होते. इ० स० १३४७ पासून इ० स० १५२६ पर्यंत ह्यांनीं राज्य केलें. प्रथमतः ह्या वंशाची राजधानी कुलबर्ग्यास होती. पुढें इ० स० १४२६ त बेदर राजधानी झाली. या कथानकावर अमृतराय व नारायणपंडित यांनीं कविता केली आहे. ६. आवडता. ७. हा गांव पटवर्धनांच्या संस्थानांत आहे. याविषयीं प्राचीन माहिती उपलब्ध आहे ती अशी:—मंगळवेढ्यास जैनाचीं देवालयें पुष्कळ होतीं तीं सर्व पाडून त्यांच्याच दगडाचा किल्ला बेदरच्या

साह्य असे यदुराणा, यास्तव करुणा करी सदामाजी[1]. ॥ १
बेदरचे यवनानें पूर्णकृपेनें तयासि अधिकार ।
त्या देशाचा देतां; वर्ते कपटासि करुनि धिक्कार[2]. ॥ २
दुष्काल तीव्र पडतां; जन वदती, ‘आग लागली पोटीं[3].’ ।
दामाघरीं[4] धान्य[5] बहु यवनाचा त्यास धाकही[6] मोठा. ॥ ३
पंढरिचे विप्रांनीं[7] दामाजीच्याच वेढिलें सदना[8] ।
धान्यार्थ तो विलोकी, कनवाळू आपुल्या वधूवदना[9]. ॥ ४
मधुरोत्तरें वदे ती, ‘शिक्षा होईल उग्र यवनाची ।
परि विठ्ठल[10] आठवुनी यांची स्वस्था[11] करावि जिवनाची[12].’ ॥ ५
मानुनि पतिव्रतोक्ती[13] पेवें[14] उघडी समस्त धान्याचीं ।

---

कामदार लोकांनीं बांधला. किल्ल्यांतील श्रीमहादेवाचे देवालयासंबंधानें पुढीलप्रमाणें हकीकत आहे. हिपरग्याचा कुळकर्णी जो मंगळवेढ्यास मुजुमदारीच्या कामावर होता त्यानें मुल्ला याकूबखान याच्या परवानगीनें जोगबावी जिला हल्लीं महादेवविहीर असें म्हणतात, तिचे नजीकचे देवालयाचें पुनरुज्जीवन करून त्यांत विश्वेश्वराचे लिंगाची स्थापना केली; ह्याची मित्ती भाद्रपद शुद्ध ३ शके १४९४ अंगिरानाम संवत्सरे ही आहे. ह्या देवळांत जातांना मधले गाभाऱ्यांत कांहीं लेख एका खांबावर दिसतो. जोगबाव अगदीं महादेवाच्या देवळाजवळ असल्यामुळें कदाचित् तीस महादेवविहीर असें नांव पडलें असावें. येथें दामाजीपंताचेंही देवालय आहे.

१. सदस्+माजी=स्थान, वासस्थान+मध्यें=घरांत. कवीच्या म्हणण्याचा भाव कीं दामाजीपंतावर विठ्ठलाची कृपा होती म्हणून तो घरांत (घरांतल्या मंडळीवर)ही दया करी. २. कपटाचा धिक्कार करून=मनापासून. प्रेमलांतःकरणानें, निष्कपटीपणानें. ३. पोटास आग लागणें=अतिशय भूक लागणें, क्षुधापीडित होणें. हा शब्दसमूह कोशकारांनीं टिपून ठेवण्यासारखा आहे. ४. हा समास चिंतनीय आहे. ५. येथें ‘धान्य’ शब्द पुल्लिंगी आहे; हें चिंतनीय आहे. ६. भय. ७. ब्राह्मणांनीं. ८. गृहा. ९. तो कनवाळू धान्यार्थ आपल्या वधूवदना विलोकी—असा अन्वय. गरीब ब्राह्मणांस धान्य द्यावें कीं न द्यावें याविषयीं आपल्या बायकोचा विचार घेऊं लागला—असा भाव. १०. पृष्ठ ७८ टीप १६ पहा. ११. स्वस्थता, शांति. १२. जीवन=गुजारा, पोटगी, पोटापाण्याची तजवीज. १३. पतिव्रता—पति हेंच व्रत जिचें ती पतिव्रता. पतिव्रतेचें लक्षण:—‘आर्तार्ते मुदिते हृष्टा प्रोषिते मलिना कृशा । मृते म्रियेत या पत्यौ सा स्त्री ज्ञेया **पतिव्रता** ॥.’ १४. जमिनींत असलेलीं धान्याचीं कोठारें.

[1]लोकांहीं 'हरि विठ्ठल' वदुनी लुटवी; [2]तेयां, '[3]सुधा न्याची.' ॥ ६
शीघ्र मुजुमदारानें यवना लिहितांच [4]भूतसा झाला, ।
सेवकगण पाठवुनी नेला तात्काळ भक्तराजाला. ॥ ७
'पतीतपावन विठ्ठल विठ्ठल विठ्ठल' [5]वदे 'रमाकांत' ।
ऐकुनि हरि घाबरला; झाला भक्तासि थोर [6]आकांत. ॥ ८
तो रुक्मिणीस मागे, 'दे [7]नग आतांचि भक्त दामाजी ।
संकटिं भाकितसे, तो मजसह तुमचे त्वरीत [8]नामा जी!' ॥ ९
काळा दोरा कंठीं, लंगोटी, जीर्ण कांबळी, काठी; ।
झाला तो [9]जगजेठी वाहे पोतें [10]त्वरेंत्वरें पाठी. ॥ १०
गेला दीनदयाळू, 'जोहार' वदे महाररूपानें ।
'[11]बंदा दामाजीचा विठ्या पहावें मलाहि भूपानें. ॥ ११
चाकर दामाजीचा [12]ऋणकरि आहें अनेक जन्मांचा ।
भाकर तुकडा खातों जितका देईल [13]भक्त नेमाचा. ॥ १२
[14]हरामखोर नसें मी, अडल्या कार्यास अर्पितों काया ।
तो भक्तराज [15]मोहें बाळगितो [16]साधु विठु [17]हिनाँकाया.' ॥ १३
महाररूप पहातां न सुचे कांहीं [18]तयांस ते भुलले ।
[19]आबालवृद्ध यानें रमावराचे समान ते [20]तुलले. ॥ १४
'[21]मजला जोहार करी, वंदावा जो हरें मनीं [22]मोहरा ।

---

१. लोकांकडून. २. त्या विप्रांस. येथें 'म्हणे' हें क्रियापद अध्याहृत आहे. ३. सुधा=अमृताप्रमाणें धान्य, किंवा सुखेपणानें, न भांडतां. कवीचा भाव कीं—दामाजीपंतानें 'हरिविठ्ठल' असें म्हटलें आणि धान्य लुटविलें. तो त्या ब्राह्मणांस म्हणाला हें अमृतासारखें धान्य न्या. ४. भूताप्रमाणें झाला, रागावला, चवताळला. ५. [दामाजीपंत] वदे—असा अन्वय. ६. त्रास, संकट. ७. दागिने, अलंकार. ८. नाम भाकणें=प्रार्थना करणें, नामस्मरण करणें. ९. जगज्ज्येष्ठ, सर्वांत श्रेष्ठ. १०. अत्यंत त्वरेनें. ११. चाकर, नौकर. १२. कर्जदार, देणेकरी. १३. दामाजीपंत, (पक्षीं) भात. १४. कृतघ्न. १५. प्रेमपूर्वक. १६. 'साधु' हें विठूचें विशेषण नव्हे. भक्तराजाचें विशेषण करणें सयुक्तिक आहे. 'साधु भक्तराज' असें म्हणून विठ्या महारानें दामाजीपंताविषयीं आपली अत्यंत पूज्यबुद्धि दर्शविली. १७. हीन (नीच) आहे काया ज्याची त्यास, अंत्यजास, महारास. १८. बादशहाच्या दरबारांतील मंडळीस. १९. लहानथोर सर्व. २०. मानले. २१. हें बादशहाचें भाषण आहे. २२. पुरुष. जो मोहरा हरें (खुद्द ईश्वरानें) मनीं वंदावा तो मला जोहार करी—असा अन्वय.

'भेटुंच या माहारा, ओंवाळा यावरूनी या मोहरा.[1]' ॥ १५
'नांत्यंज[2] हा **मा**धव हा भक्तार्थी धांवला.' असें मानी[3] ।
धरिली **य**वनें बुद्धी **दा**माजीतें विशेष सन्मानी[4]. ॥ १६
महर्गतेच्या[5] भावें दिधली अर्जी लिहून **य**वनातें, ।
'द्यावी[6] जी! कबज मला द्रव्याचीया करूनि गणना[7] ते.' ॥ १७
अक्षर **दा**माजीचें ऐसें जाणूनि बोलला **य**वन ।
'इतबारा[8] सर करितो; अभिलाषित[9] सर्वही अती यवन[10].' ॥ १८
गणना केली **य**वनें बेरिज, पाहूनि पावही आणा ।
नाहीं कमी; मग वदे, 'दौलत में है यहि खुब दाणा.' ॥ १९
देउनि कबज[11] तयाला कृपा करुनि, मग तयाच मुलखाची ।
सनद तयाचे नांवें दिधली; तैशीच सर्व दरेकाची[12]. ॥ २०
महाररूपें **दे**वें **गी**तेच्या पुस्तकांत मार्गात[13] ।
धरितां पाठअवसरीं[14] पाहे जो श्रेष्ठ भक्तवर्गात[15]. ॥ २१
'होउनि कष्टी भ्रमला, माझे कार्यार्थ **दे**व हा श्रमला.' ।
होउनि कष्टि वदे तो, 'यास्तव बा! **ह**रि बहूत हा श्रमला.' ॥ २२
**य**वनासमीप गेला, केला[16] सत्कार फारसा त्याचा, ।
'कालचि तुमच्या माहरें फडशा केला समस्त खांल्याचा[17].' ॥ २३
मस्तक[18] जनार्दनाचा **पं**ढरिराया! तुझ्या पदावरि[19] हा ।
........................................................ ॥ २४

---

१. पंधरा रुपये किंमतीचें नाणें. २. न+अंत्यज=महार नव्हे. ३. बादशहा मानी—असा अन्वय. ४. मोठा आदरसत्कार करी. ५. महागाईच्या भावानें—दरानें. ६. हें विठ्या महाराचें भाषण आहे. ७. मोजदाद, गणती. ८. दामाजीनें इतबारा सर केलें (विश्वासाला जिंकलें), तो फार विश्वासू ठरला—असा भाव. ९. लोभी, अभिलाष धरणारे. १०. मुसलमान. ११. लेखी पावती. १२. सर्व प्रकारच्या हक्कांची. १३. रस्त्यांत. १४. गीतापाठ करण्याच्या वेळीं. १५. येथें '**पर्यायोक्त**' आहे. पृष्ठ ५१ टीप ५ पहा. १६. यवनानें केला—असा भावार्थ. १७. देण्यावेण्याचा. १८. हा शब्द संस्कृतांत पुल्लिंगी व नपुंसकलिंगी आहे. १९. पायांवर.

# अनंतात्मजकृत

## १८. विठ्ठलस्तुति.

(श्लोक.)

देखिली तुझी दुरुनि पंढरी, हर्ष वाटला बहुत [२]अंतरीं ।
तूज वर्णितां शेष [३]शीणला, धांव गा! त्वरें पाव विठ्ठला! ॥ १
स्नान [४]सारिलें [५]भीवरेतिरीं, सव्य घातली सर्व पंढरी ।
भक्त [६]पुंडलीक शीघ्र देखिला, धांव गा! त्वरें पाव विठ्ठला! ॥ २
येउनी तुझ्या [७]राउळांतरीं, देखिली तुझी मूर्ति [८]साजिरी ।
चरण [९]लक्षितां, देह अर्पिला, धांव गा! त्वरें पाव विठ्ठला! ॥ ३
पंढरीस जो जीव पावला, मोक्ष निश्चयें त्यासि [१०]लाधला ।

---

१. पृष्ठ २८ टीप ४ पहा. २. मनांत. ३. थकला, भागला. ४. केलें, संपविलें. ५. भीमानदीच्या कांठीं. ६. पुंडलीक बलरामाचा अवतार होय असें समजतात. पुंडलीक हा एक देशस्थ ब्राह्मण होता. याच्या बापाचें नांव जानुदेव आणि मातेचें नांव सत्यवती. हा आपल्या पत्नीसह सुख भोगून मातापितरांस अनेक प्रकारांनीं छळीत असे. तीं काशीयात्रेस जावयास निघालीं तेव्हां हाही स्वपत्नीसह त्यांच्या बरोबर निघाला. मार्गानें यानें आपल्या वृद्ध मातापितरांस पुष्कळ त्रास दिला. काशीस आल्यावर हीं सर्व मनुष्यें कुक्कुटस्वामी नामक महातापसाच्या आश्रमासमीप उतरलीं होतीं. तेथें रात्रौ पुंडलिकास गंगा, यमुना, सरस्वती या तीर्थदेवतांचा साक्षात्कार झाला. कुक्कुटस्वामी हे साक्षात् मातृपितृसेवारत श्रावणाचे अवतार होत. यांची गोष्ट त्या देवतांनीं पुंडलिकास सांगून त्याचे डोळे उघडिले व त्याला शुद्धीवर आणिलें. तेव्हां त्याला आईबापांस दुःख दिलें म्हणून परम पश्चात्ताप झाला. त्याला लागलीच उपरति झाली आणि तो मातापितरांच्या आज्ञेंत राहून त्यांच्या एकनिष्ठ सेवेंत सुख मानून राहूं लागला. नंतर तो त्यांच्यासह काशीहून परत आला आणि भीमातटीं गरसळें नामक गांवीं कायावाचामनेंकरून त्यांची सेवा करीत राहिला. पुढें याला नारदाचें दर्शन झालें. 'भगवान् श्रीकृष्ण येतील तोंपर्यंत तूं असाच राहून त्या देवाचें नांव 'श्रीविठ्ठल' असें सुप्रसिद्ध कर' असें त्याला सांगून नारद इष्टस्थलास गेले. पुढें रुक्मिणी रुसून आली होती तिची समजूत करण्यासाठीं देव श्रीकृष्ण तेथें आले. तिची समजूत घालून तिच्यासह दिंडीरवनांत पुंडलिकाची झोंपडी होती तेथें देव येऊन उभे राहिले. त्यानें केलेली मातापितरांची सेवा पाहून देवांनीं प्रसन्न होऊन त्याला जन्ममरणबंधमुक्त केलें. 'जे कोणी चंद्रभागेंत स्नान करून श्रीविठ्ठलनामाचा जप करून देवदर्शन घेतील ते संसारपाशमुक्त होतील' असा वरही दिला. प्रत्येक दिवशीं पुंडलिकास भेटण्यासाठीं सर्व तीर्थें येतात अशी भक्तजनांची समजूत आहे. पुंडलिकाचें सविस्तर चरित्र 'भक्तिकथामृत' नामक ग्रंथांत दिलेलें आहे. ७. देवळांत. ८. सुंदर. ९. पाहतां, दर्शन घेतां. १०. प्राप्त झाला.

योनि हिंडतां सर्व चूकला, धांव गा! त्वरें पाव विठ्ठला. ॥ ४
[1]योनि हिंडतां जीव कष्टला, गर्भवास म्यां बहुत सोशिला ।
शरण रीघतों [2]यासवें तुला, धांव गा! त्वरें पाव विठ्ठला! ॥ ५
पारधी जसा [3]मीन लक्षितो, [4]ऊपरि तो त्वरें [5]जाळ टाकितो ।
तेंवि लक्षितो [6]काळ रे! मला, धांव गा! त्वरें पाव विठ्ठला! ॥ ६
अनंतात्मज हेंचि बोलिला, चरणीं आपुल्या [7]ठाव दे मला ।
प्रार्थितों तुला हेंचि बोलिला, धांव गा! त्वरें पाव विठ्ठला! ॥ ७

---

# [8]उदासदासकविकृत

## १९. [9]महाबळभटचरित्र.

(श्लोक.)

हरी जगत्रजननी, प्रसूत कंसभूवनीं ।
श्रीकृष्ण जन्मला मनीं, करी जनासि मोहनीं. ॥ १
कित्येक बंधमोचनें, तयासि काय बंधनें? ।
करोनि पंथ मोकळा, श्रीकृष्ण जाय गोकुळा. ॥ २
रिपू[10] म्हणे, 'चला चला, प्रसूतिकाळ पातला.' ।
विशेष कंस तो [11]हटी, पदीं धरोनि [12]ओपटी. ॥ ३
बळेंचि हस्त पीटिला, तसाचि हस्त [13]निष्टला ।
[14]म्हणे, 'रिपू! तुझा रिपू, श्रीकृष्ण गोकुळाधिपू.' ॥ ४
मनांत कंस [15]खोंचला, उपाय एक सूचला ।
'उपाय कोणसा भटो! जिवाचि काळजी तुटो.' ॥ ५
वदे भट्ट नृपापुढें, उकावला चढोवढें ।
'बळेंचि पैज मारितों तुझा रिपू [16]विदारितों.' ॥ ६

---

१. जन्ममरणाचे फेरे (पृ० १ टीप ९ पहा). २. 'यास्तव' असा पाठ येथें असावा. ३. मत्स्य, मासा. ४. वर, माशावर. ५. जाळें. ६. यम. ७. जागा. ८. ह्या कवीविषयीं कांहीं माहिती उपलब्ध नाहीं. ९. महाबळ हा दनुपुत्र दानवांतील एक. ही कथा नारदपुराण व श्रीमद्भागवत यांत आहे. या कथानकावर आनंदतनयानें एक सुंदर काव्य लिहिलें आहे. १०. कंस. ११. हट्टी, आग्रही. १२. मुलास हापटी–असा भावार्थ. १३. निसटून गेलें, तें मूल हातांतून सुटलें. १४. तें मूल म्हणे. १५. समजला, खट्टु झाला. १६. मारितों.

बळें बळाविली कळी[1], कळ्या भट्ट माभळी ।
उपाध्या कंस हा कुळा, म्हणोनि वंद्य गोकुळा. ॥ ७
बळें बलाढ्य सूभटू, बळें करोनियां हटू ।
बसोनियांचि नेहटू, प्रशस्त वाचितो पेटू[2]. ॥ ८
हटें हटेंच उद्धटें, कुटील काळलंपटें ।
उपायसा प्रयोजिला, मुलासि घात योजिला. ॥ ९
बहू मिळोनि सुंदरी, मुखें म्हणे 'हरी हरी' ।
तुम्हांसि वोखटी परी, कुमार हो मुळावरी. ॥ १०
बहू मिळोनियां वधू, कराल बाळकावधू ।
तरीच वंश सावधू, यथार्थ सांगतों विधू[3]. ॥ ११
हळूच कृष्णनाटकें, चरित्र मांडि नेटकें ।
उगाचि थोर मारका, भटासि बैसला धका. ॥ १२
पदार्थमात्र[4] चालवी, भटासि पाद्य घालवी ।
हरीलिला कळेचि ना, अचेतनास चेतना. ॥ १३
सहाण खोड लाटणीं, कित्येक खुंट पाटणीं ।
ईळ्या[5] पळ्या परोपरी, उठावल्या भटावरी. ॥ १४
पैलान[6] तंग तोबरे, लगाम जेरबंद रे! ।
बळाविली कुटाकुटी, भटू बहुत हिंपुटी[7]. ॥ १५
सदेव[8] पाट हालले, समस्त देव चालिले. ।
बळें शुभा[9] धबाबिती, कित्येक ढेंकळें भिती । १६
भरे मुखांत मृत्तिका, पुरे पुरे नका नका ।
हरीचरित्र हें भलें, जनीं समस्त शोभलें. ॥ १७
करील देहदंडणा, हरील जन्मखंडणा ।
उदासदास तो कवी, बहु जनासि शीकवी. ॥ १८

---

१. भांडण. २. पंचांग. ३. विधि, प्रकार. ४. प्रत्येक वस्तुजात. ५. विळ्या. ६. खोगीर. ७. दुःखी, कष्टी. ८. देवांसह. ९. गोवऱ्या.

# लोकनाथकृत

## २०. गोपीकृष्णाख्यान.

(पद.)

वदे यशोदा, 'ऐक गोपिके! चाली तूं गोकुळीं ।
तुजविण निशिदिनिं उभा राहिला माझा वनमाळी.[1] ॥ ध्रुवपद. ॥
शीघ्र चलावें माझे गृहाशी समजावी त्याशी ।
तुझेविना तो समजत नाहीं माझा गुणराशी.' ।
तेव्हां गोपिका म्हणे त्वरेनें, 'पुसावें मातेशीं.' ।
अभयवचन ऐकुनी यशोदा बोले उद्धवाशी; ॥
चाल ॥ 'जाउनी पुसावें तिच्या कीं जनकातें ।
पाठवा आमुच्या गृहिं घेउनि जातें.' ।
'आहे बरें परंतु मूळ तिला येतें.' ।
मग तेव्हां उद्धव म्हणे काय होतें? ॥
टीप ॥ दों दिवसास्तव घेउनि जावें अरुणोदयकाळीं.[2] । तुजविण० ॥ १ ॥
उद्धव तेव्हां येउनि सांगे यशोदाशेजारीं, ।
'आज्ञा झाली घेउनि जावें आतां झडकरी.' ।
तेव्हां यशोदा दूत बोलावुनि रथाशि संभारी[3] ।
बसवुनि तिजला घेउनि तिजला अपुल्या मंदिरीं ॥
चाल ॥ येतांना त्या गृहाशी पाहुनियां तिजला ।
कृष्णाचे अंतःकरणीं हर्ष जाहला ।
आतां नाहीं दुसरी हिच्या कीं उपमेला ।
चंद्राची शोभा आली कीं वदनाला ॥
टीप ॥ असा योग तो कैसा घडला याच समयकाळीं. । तुजविण० ॥ २ ॥
सांगुनि पाठवि कृष्णाला, 'उदास कां राही? ।
तुजसाठीं मी धांवुनि आलें पूर्ण दृष्टि पाहीं ।

---

१. कृष्ण. वनमाला—'आपादपद्मं या माला वनमालेति सा मता' इति कलिंगः; 'आजानुलंबिनी माला सर्वर्तुकुसुमोज्ज्वला । मध्ये स्थूलकदंबाढ्या वनमालेति कीर्तिता ॥'. वनपुष्पें, तुळसी, इत्यादिकांची केलेली कृष्णाच्या गळ्यांतील आपादलंबिनी माला. २. प्रातःकाळीं. ३. तयार करी, झुंपी.

चार दिवस तुम्हि स्वस्थ बसावें निजसदनाठायीं.' ।
तेव्हां कान्हया म्हणतो माझ्या मनासि धीर नाहीं ॥
चाल ॥ म्हणे चवथे दिवशीं येइन तवहातां ।
म्हणे कां हो! उतावळी अशी तुम्ही करितां ।
एकांतीं घेउनी तुम्ही मला रंततां[१] ।
बोलवी सखीसी जाय सांग आतां ॥
टीप ॥ ऐसें ऐकुनि वचन कान्हया स्वस्थपणें खेळी. । तुजविण० ॥ ३ ॥
चार दिवस हे झालियावरी कृष्ण तिला पूसे ।
मसलत तुमची कळून येना दगा मला भासे ।
तेव्हां गोपिका म्हणे कृष्णा! कां करितां ऐसें ।
जाउनि सांगेन यशोदेपाशीं तेव्हां होइल कैसें ॥
चाल ॥ कुटिलपणानें बोलुनियां गेली ।
शेजारीं जाउनि रुसोनियां बसली ।
तिची सखी म्हणे मम आतां गृहीं चाली[२] ।
ऐसी कां[३]हुन गे! उदास तूं झाली? ॥
टीप ॥ कृष्ण येउन समजावी मजला असें वदे बाळी[४]. । तुजविण० ॥ ४ ॥
ऐसें ऐकुनि वचन सखीनें कृष्णासीं बोली ।
जाउनि जलदी समजाविणें गोपी रुसोनियां बसली ।
तेव्हां कृष्णजी झडकरी गेले गोपी आळविली ।
धरुनि हस्तकीं समजावितां तेव्हां मनीं भ्याली ॥
चाल ॥ कृष्ण म्हणे, 'कां हो! तुम्ही रुसले आतां? ।
उठ चाल मंदिरीं शयन[५] करूं आतां ।
मग गोपी वदे, 'कां मजला छळितां ।
मी नाहीं अशी कांहीं दुसऱ्याची कांता[६].' ॥
टीप ॥ शपथपुरःसर वदे गोपिका लज्जा संभाळीं. । तुजविण० ॥ ५ ॥
ऐसें क्रूर वचन बोलतां कृष्ण तिला म्हणे, ।
'चिंता नाहीं स्तब्ध असावें, मंदिरासी जाणें ।

---

१. रमतां. २. विचारी. ३. या शब्दावरून हा कवि नागपुराकडील असावा असें वाटतें. ४. बाला, स्त्री, गोपी. ५. शयन करणें=निजणें, झोंप घेणें. ६. स्त्री, बायको.

तुझा मनोदय[1] पूर्ण करूं हा आशिर्वाद घेणें ।
दोन्ही चेंडू हृदयीं तुझ्या तेचि अम्हा देणें.' ॥
चाल ॥ तेव्हां गोपिका म्हणे, 'चेंडू तुझे नाहीं ।
अडविशी व्यर्थ मनीं विचारून पाहीं ।
असें होय बरें का, रीति अशी नाहीं ।
आहे काय तुझ्या मनीं कळून येत नाहीं ॥
स्वस्थ म्हणे गोपिका बळेंच कां कवटाळी[2].' । तुजविण० ॥ ६ ॥
तदनंतर दुसरे दिवशीं अरुणोदयसमयीं ।
म्हणे गोपिका यशोदेप्रती, 'बिदा[3] अम्हा देईं.' ।
तेव्हां यशोदा बोले तिजला कां करि जलदाई ।
तुझा मूल तो कृष्ण मुरारी चेंडू म्हणे देईं ॥
चाल ॥ अशी काहुनी[4] मसकरी[5] अम्हाशी करणें? ।
ओढुनि पदराशी मनगट कां धरणें? ।
आम्हीं आलों गोकुळीं तुझ्या गृहीं पाहुणे ।
म्हणोनि काय जबराई अम्हावरी करणें? ॥
टीप ॥ रात्रौ येतां लावुनि जातां कवाडाशि खीळी.' । तुजविण० ॥ ७ ॥
असें गाऱ्हाणें गोपी करिते यशोदाशेजारीं ।
'मूल तुझा हा पुंड[6] झाला केवळ व्यभिचारी ।
रात्रंदिवस मला सोडीना मजभोंती फीरी.' ।
तेव्हां गोपिका म्हणे यशोदेशी 'कृष्ण तुझा आवरीं.' ॥
चाल ॥ 'गोपिका म्हणे काय अतां करूं? ।
मला सुचेना कांहीं मी अतां काय करूं? ।
जबरीनें म्हणे रती अतां करूं ।
न वदे तरी म्हणे तुज आतां करूं ॥
टीप ॥ अशी दशा हे प्राप्त जाहली तुझ्याच गोकुळीं.' । तुजविण० ॥ ८ ॥
असें चरित्र हें गोपी दाखवी जनांत लोकांला ।
अंतर्यामीं[7] हेंच असे वरावया[8] हरिला ।

---

१. मनांतील इच्छा. २. आंवळी, आलिंगन देशी. ३. विदा देणें=बोळवण करणें, जाण्यास परवानगी देणें. ४. काय म्हणून. हे कविराज नागपुरप्रांतस्थ असावे. ५. थट्टा. ६. द्वाड, मस्त. ७. मनांत. ८. वरणें=विवाह करणें.

तेव्हां कृष्ण तो अंतर्साक्षी पूर्णब्रह्मपद त्याला ।
वळखुनि खूण मिळाली बोध करी तीला ॥
चाल ॥ 'व्यर्थ रागें रागें गे ! भरती ।
धरूं जातां जातां मागें कां सरती ।
हंसुनि बोलणें बस मांडीवरती ।
तुज पाहुनियां गे ! श्रम माझे हरती.' ॥
टीप ॥ ऐसें वचन श्रवण करोनी हर्षली [1]चंद्रमौळी. । तुजविण० ॥ ९ ॥
'अशी [2]जोंचणी रात्रंदिवस सोसावी कैशी ? ।
जनांत पाहुनि ऐसें कौतुक कारण भ्रमाशी ।
आतां आहे बरें बरें जंव कळेल सासूशी ।
तेव्हां होइल सासुरवास मग करेन कैशी ? ॥
चाल ॥ सोडीं छंद माझा मी सासुरवासी ।
द्वयकरें विज्ञप्ति माझी हे तुमशीं ।
नको लाउनि गोडी कां मजला फसवीशी ।
तूं कपटी कान्हा ठाउक आम्हाशी.' ॥
टीप ॥ असें बोलतां त्वरें [3]करानें स्तनें कृष्ण चोळी. । तुजविण० ॥ १० ॥
त्वरें करुनियां धरी, गोपिका बहू बोधियेली ।
वरदार हें त्यजुनी अवघें परसदनीं बसली ।
ऊठ चाल मंदिरीं झडकरी [4]सेजे करी चांगली ।
बहुतांशी मसलत कळली तजविज हे चुकली ॥
चाल ॥ 'कर सोडीं माझा मजला भय भारी ।
जोडीं हात तुजला मी नमस्कार करीं ।
नको लावूं हात माझिया उरीं ।
जनलज्जेस्तव अनर्थातें न करीं ॥
टीप ॥ असा राग हा पाहुनि माझा मज म्हणतील भोळी.' । तुजविण० ॥ ११ ॥
गडी आपुले गोळा करुनी कृष्ण म्हणे त्याला ।
'गोपी इजला येक ढगावुनि चेंडू मागूं तिजला ।

---

१. गोपीचें विशेषण. चंद्राप्रमाणें जिचें भाळ होतें अशी. अर्धचंद्राकार भाळ असणें सौंदर्यपोषक आहे हें प्रसिद्धच आहे. २. त्रास. ३. हातानें. ४. शय्या, आंथरूण.

जरि देइल बऱ्या गतीनें, नवरा मम म्हणेल मला ।
तरी तिची हे लज्जा ठेवूं शपथ आम्हाला.' ॥
चाल ॥ ऐसें ऐकुनि गडी म्हणे, 'करुं सेवा ।
त्वरें आतां उद्धवाशी म्हणे, 'बोलवा ।
असा निश्चय आज तीचा तिजला कळवा ।
आज गोपीचा पोशाक पहा हिरवा ॥
टीप ॥ तशी धरून तीच गोपिका मंचकावर घोळी.' । तुजविण०॥ १२ ॥
असें वचन जाउनी वदती गडी सखीपाशीं ।
सखी जाउनी वृत्तांत सारा सांगे गोपिकेशी, ।
'हुशारीनें आज असावें कृष्ण येइल मंदिराशी.' ।
तेव्हां तिजला कांहीं सुचेना काय म्हणूं त्याशी ॥
चाल ॥ म्यां केले उपाय फार अतां हारली ।
येउनी जबरीनें जरी हातीं धरली ।
अतां करा कांहीं मसलतही सरली ।
अमृतफळें हीं उरीं असीं भरलीं ॥
टीप ॥ असेंही करितां येउनि भोगील होतें माझ्या [1]भाळीं । तुजविण०॥ १३॥
असा संकल्प गोपी इचा कळला कृष्णाशी ।
तेव्हां मुकुंदा म्हणे, 'गड्याहो! संग करूं तीशी ।
शुक्लपक्षीं हरीदिनीं ते मार्गेश्वरमासीं ।
कामशांतिचा पूर्ण निश्चय नेम त्याच दिवशीं ॥
चाल ॥ गुरुवारीं भद्रा आणिक रेवती ।
वनिज व्यतिपात मध्यान्ही रात्री ।
अवतारीं रूपडीं दर्शनास येती ।
नारद तुंबर भजनातें धरिती ॥
टीप ॥ तशा प्रसंगीं गोपी इजला [2]कामानळ जाळी. । तुजविण० ॥ १४ ॥
ऐसें ऐकुनि गोपीकेनें, मनीं आनंदीली ।
म्हणे त्यजुनी सर्वही आतां अशी मोहित झाली ।
असें चित्त हें कृष्णापाशीं सखीप्रति बोले ।
........................................ ॥

---

१. नशिबीं. २. कामरूपी अग्नि.

चाल ॥ आज करिन शेज, कीं कृष्णाशी पाहूं ।
एकली मंदिरीं सखी कशी राहूं ।
उष्णोदक उटणें लाउनी आज न्हाऊं ।
सत्वर यावें म्हणुनि पत्रिका लिहूं ॥
टीप ॥ मदनानें ते व्याकुळ होउनि गडबडोनि लोळी. । तुजविण० ॥ १५ ॥
व्याकुल पाहुनि गोपी म्हणते कृष्णे चित्ताला ।
पूर्वी आपण रागें भरोनी आतां लोभ आला ।
तेव्हां गोपिका उत्तर करती भ्याली फजितीला ।
माझे मनांतील भाव कृष्णसंग घडो मला ॥
चाल ॥ आतां करीं शांतता मदनाची वृथा ।
करीं कृपा मजवरी तुम्ही दीनानाथा! ।
येतो नित्य अडथळा करूं काय आतां ।
स्वप्नीं येउनि रस कसे माझा येतां ॥
टीप ॥ नित्य रोज हे सोपे लढेना करतळाशीं चोळी. । तुजविण० ॥ १६ ॥
पूर्वी गोपी कृष्णालागीं बहु चाळवीलें ।
पाहुनि कृष्णें तिची योजना म्हणे बरें झालें ।
तदनंतर तो हरी पराक्रम तिजवरतें केलें ।
तेव्हां गोपिका विस्मित होउनि कृष्णागम[1] झालें ॥
चाल ॥ तेव्हां गोपिका पुढें पुढें फिरती ।
हरीशी पाहुनि मनांत ते झुरती ।
सुचेना कांहीं कशी पडली भ्रांती ।
त्यागीं राग पूर्वीचा दया करीं अंतीं ॥
टीप ॥ अशी गोपिका स्तवन करिती, गळ्यांत गरसोळी. । तुजविण० ॥१७॥
अशी गोपिका लगट करोनी कृष्ण गोड पाही ।
तेव्हां कृष्ण तो हातीं येईना गुप्त होऊं पाही ।
म्हणुनि गोपिका वदे सखीसी हरी कोठें आहे ।
त्याविण मजला धीर धरेना अतां करूं काय? ॥
चाल ॥ अतां सखे! हरीविण जीव माझा जातो ।
कामामुळें मजला कीं हा छळितो ।

१. कृष्णाचें आगमन.

कोठें गुंतला हरी काय करितो? ।
येउनि स्वप्नीं मशीं रति करितो ॥
टीप ॥ तेव्हां मजला सौख्य वाटे धरितां करकमळी[1] । तुजविण० ॥ १८ ॥
अशी गोपिका व्याकुळ अंतरीं कृष्ण तिला देखी ।
तिचे रूपाचें वर्णन करितो आपुलिया मुखें ।
म्हणे गोपिका गोकुळीं माझा राहावा सुखी ।
तेव्हां गोपिका म्हणे कृष्णजी कृपादृष्टि राखीं ॥
चाल ॥ आलें आतां शरण तवचरणासी ।
देखोनी संग करीं शांत मदनासी ।
तुझे छंदाची मजला पडली फांशी ।
आम्ही आहों मथुरेचे कीं रहिवाशी[2] ॥
टीप ॥ मदन करितो रुदन अंतरीं एकच झाली होळी. । तुजविण० ॥१९॥
एके दिवशीं आलि पत्रिका तिच्या कि जनकाची[3] ।
मूळ[4] तिजला येणार जलद बिदा करा तीची ।
असा शब्द हा श्रवणीं पडतां मनीं दुःख तेंची ।
मन माझें हें जाऊं देईना भ्रांती मदनाची ॥
चाल ॥ 'आतां जातें मथुरेसी कृपालोभ ठेवीं ।
वळख न अपली कांहीं तरी द्यावी ।
तेव्हां धोतरजोडी म्हणे घ्यावी ।
होता हरी अवकुळ हीन ऐसें दैवीं ॥
टीप ॥ उदासीने बागामध्यें बसली अवतळी. । तुजविण० ॥ २० ॥
दुसरे दिवशीं प्रातःसमयीं गोपी हे उठली ।
स्नान करोनी स्वयंपाक पक्वान्नें केलीं ।
कृष्णापुढें ताट वाढुन भोजनास दिधलीं ।
तेव्हां हरी तो बहु प्रीतिनें तिजप्रती बोले ॥
चाल ॥ अतां जातां तुम्ही आम्हास उदासी ।
कधिं होईल भेट आतां तुमसी अमसी ।

---

१. पाही. २. आम्ही मथुरेच्या आहों असें म्हणण्याचें कारण की, आम्हीं तुझ्या प्रजेपैकींच आहों, तूं आमचा स्वामी आहेस, तेव्हां आमची दया तुला येईलच. ३. गोपीच्या बापाची. ४. बोलावणें.

असें म्हणतां वाहती अश्रु नेत्राशी ।
भाषणाचा राग नको आणुं चित्तासी ॥
टीप ॥ असें हंसोनी गोपीसी बोले पिटोनीयां टाळी[1]. । तुजविण० ॥ २१ ॥
तदनंतर आज्ञा दिधली दुतासी कृष्णानें ।
रथ अपला झडकरी सजवा[2] मथुरेसी जाणें ।
आज्ञा होतां दूत साजवी रथासी त्वरेनें ।
एक योजन मथुरा आहे चलावें जलदीनें ॥
चाल ॥ नयन धरूनी यशोदेसी रथारूढ झाली ।
कृष्णासी पाहुनि म्हणे, 'गोष्ट गेली ।
करूं काय आतां परस्वाधीन मी पडली ?' ।
असा मोह दाटतां तेजहीन झाली ॥
टीप ॥ लोभ आमचा विसरुं नका शपथ गळ्याची घाली. । तुजविण० ॥२२॥
चतुर्दशीतें शुक्लपक्षीं मासोत्तममासीं[3] ।
भानुवासर[4] तो सुदीन पाहुनी बिदा केली तिसी ।
रथारूढ ती गोपी पाहुनि म्हणे कीं दूताशीं ।
जाउनि तिजला बोध करावा म्हणे हृषीकेशी ॥
चाल ॥ तसे दूत झडकरी गेले तिजपाशीं ।
हरी अम्हां धाडिलें कीं तुजपाशीं ।
राहीं खुशाल म्हणे गोपिकेशी ।
तेव्हां अश्रु चाले तिच्या कीं नेत्राशीं ॥
टीप ॥ सांग विनंती कृष्णा मज ठेवीं हृदयकमळीं. । तुजविण० ॥ २३ ॥
मथुरेप्रति नेउनि तिजला दूत जरी फिरले ।
निरोप घेउनि गोपिकेचा गोकुळाशीं आले ।
म्हणे गोपिका खुशाल आहे कृष्णासी बोले ।
असें कळलें उद्धवासी तत्क्षणीं आले ॥
चाल ॥ तेव्हां कृष्ण म्हणे कीं उद्धवाशी ।
गेली टाकुनि गोपिका कीं आम्हासीं ।

---

१. टाळी पिटणें=टाळी वाजवणें. २. तयार करा. ३. मार्गशीर्ष महिन्यांत. ४. रविवार.

त्वरें करीं भेट अतां तिसी मसी।
तिजविण क्रमेना[1] बहुत उदासी ॥
टीप ॥ उद्धव तेव्हां मथुरेप्रति गेला तेच वेळीं. ॥ तुजविण० ॥ २४ ॥
असें हरीनें चरित्र केलें विरोध[2] संवत्सरीं।
आनंदास हें कारण झालें लीला केली भारी।
भक्तजन हे स्तुति करिती मुक्ती तव पाळी।
लीन होउनी शरण जातां दया करील हरी. ॥
चाल ॥ कृष्णपक्षीं आणि मंदवारीं[3]।
त्रयोदशी असे मार्गेश्वरीं।
वदे लोकनाथ छंद ललकारी।
असे कृपा त्यावरी हरी मुखीं स्मरी ॥
शरणागत हरी तुजला येतों भजनीं रस गाळी. ॥ तुजविण० ॥ २५ ॥

---

## पांडुरंगकविविरचित[4]

## २१. स्थालीपाककथा.[5]

(श्लोक.)

करुनि वंदन रुक्मिणिनायका,[6] कथिन आजि मि[7] भोजन[8] आयका,।
सहितद्रौपदि पांडव काननीं,[9] 'सुखरुप' ध्वनि[10] ब्राह्मणआननीं.[11] ॥ १

---

१. करमेना, चैन पडेना. २. यावरून हें पद ६५।७० वर्षांपूर्वीचें आहे असें दिसतें. एक संवत्सर साठ वर्षांनीं येतो. विरोधनाम संवत्सर ४।५ वर्षांपूर्वीं आला होता. ३. शनिवारीं. ४. पृष्ठ १ टीप १ पहा. ५. ही वनपर्वांतील कथा इतकी सुप्रसिद्ध आहे कीं तीविषयीं येथें कांहीं लिहिलें पाहिजे असें नाहीं. याच कथानकावर उद्धवचिद्धनकृत धांवा, 'कृष्णा! धांव रे! लौकरी। संकट पडलें भारी ॥' इत्यादि आहे तो तर आबालवृद्धांच्या अत्यंत परिचयाचा आहे. या विषयावर वामनपंडितांची कविता आहे. मोरोपंतकृत वनपर्व–अध्याय ८ व मुक्तेश्वर वनपर्व–अध्याय ११ यांत हेंच कथानक आहे. ६. कृष्णाला. येथें एकदम कृष्णाला असें न म्हणतां वळसा घेऊन म्हटलें आहे म्हणून 'पर्यायोक्त' अलंकार झाला. [पृष्ठ ५१ टीप ५.] ७. येथें वृत्तसुखार्थ 'मी' वर्ण ह्रस्व केला आहे. ८. येथें भोजन म्हणजे भोजनाविषयीं कथा–असा अर्थ घेणें इष्ट आहे. ९. अरण्यांत, अद्वैतवनांत. १०. ब्राह्मणांच्या तोंडून 'सुखरूप असा' असा ध्वनि निघत असे–असा भाव. ११. येथें संधि कर्तव्य असून केला नाहीं.

प्रसादें मि[1]त्राच्या सदानें द्वि[2]ज लक्षावधि पहा,
सदा पाळी अन्नें य[3]मसुत क्षि[4]तीचा अधिप हा; ।
किती वर्णावें त्या द्रुपदिसि तुळे ते अ[5]चळजा
गुणेंरूपें भक्तिस्तव हरिकृपा ते अ[6]चळ ज्[7]या. ॥ २

स्तुती ऐकतां अं[8]धजामानसीं हो! असंतुष्टता दुःखसीमा नसे हो! ।
स्मरे घालणें पंडुजातें अ[9]पाया, म्हणे बं[10]धुवर्गास सांगा उपाया.' ॥ ३

तदां ल[11]क्ष शिष्यांसि घेऊनि संगीं, अकस्मात दु[12]र्वास ये ते प्रसंगीं, ।
विलो[13]कूनि दुर्योधनें तापसाला, स्फु[14]रे स्वा[15]र्थइच्छा मनीं भू[16]पशीला. ॥ ४

देतसे[17] पिठ[18] तया कनकाचें, साम्यते श[19]शिवरासन कां[20]चे ।
[21]सांग पूजुनि तया मुनिला हो! घेतसे नृप मनीं सु[22]खलाहो. ॥ ५

वदे वाक्य दुर्वास दुर्योधनातें, 'मला आवडी फार वाहे मनातें ।
क्रमावा गृहातें तुझ्या काळ कांहीं, भली गोष्टि ऐकें क्षितीपाळका! ही.'॥६

---

१. सूर्याच्या. हें सूर्याच्या बारा नांवांपैकीं एक. सूर्याला बारा नांवें आहेत तीं:—मित्र, रवि, सूर्य, खग, भानु, पूषा, हिरण्यगर्भ, मरीचि, आदित्य, सविता, अर्क आणि भास्कर. २. ब्राह्मण. ३. धर्म. ४. पृथ्वीचा अधिपति, राजा. ५. हिमालयतनया, पार्वती. द्रौपदीची बरोबरी फक्त पार्वती करूं शकते; इतर कोणी करूं शकत नाहीं—असा भाव. ६. अक्षय, सतत, न ढळणारी. ७. ज्या द्रौपदीवर. ८. दुर्योधनाच्या मनांत. ९. अडचणींत, संकटांत. १०. आपल्या दुःशासनादि शत भ्रात्यांस. ११. येथें आमच्या कवीनें अतिशयोक्ति केली आहे. वामनपंडितांनीं म्हटलें आहे:—'तेथें शिष्य दहा सहस्रसह तो दुर्वास आला मुनी' [श्लो० १]. पंतांनींही तितकीच संख्या सांगितली आहे:—'शिष्यायुतयुत भगवान् दुर्वासा गजपुरासि ये राहे.' [वनपर्व—अध्याय ८ गीति ७.] प्रकृत कवीनें शिष्यांची संख्या एकदम दसपट वाढविली! १२. हा वैवस्वत मन्वंतरांतील अत्रिऋषीस अनुसूयेपासून झालेल्या चार पुत्रांपैकीं दुसरा. हा महातपस्वी असून तापट होता. हा श्वेतकी नामक राजाच्या यज्ञांत ऋत्विज होता. १३. पाहून. १४. उत्पन्न होई. १५. येथें संधि कर्तव्य असून केला नाहीं. १६. सुचरित दुर्योधनाच्या मनांत. शील='शीलं स्वभावे सद्वृत्ते' इति विश्वः. १७. या श्लोकाचें वृत्त 'स्वागता.' याचें लक्षण:—'गुरुद्वययुतैरंते रनभैरुपलक्षिता । गदिता स्वागता नाम वृत्तमेकादशाक्षरम्' [सुवृत्ततिलक १।२४]. या वृत्ताविषयीं विवरण आहे तें:—'साकाराद्यैर्विसर्गान्तैः सर्वपादैः सविभ्रमा । स्वागता स्वागता भाति कविकर्मविलासिनी ॥' [सुवृत्ततिलक २।१५.] १८. येथें वृत्तसुखार्थ 'पीठ' शब्दाचें 'पिठ' असें रूपांतर केलें आहे. पीठ=आसन. १९. इंद्रासन. २०. कांपे, भिई. २१. विध्युक्त. २२. सौख्यलाभ.

[1]अवचितचि अभाग्या जेंवि [2]लोधे धनातें,
सुख ऋषिवचनाचें तेंवि दुर्योधनातें; ।
‘[3]सकृप मजवरी बा! होउनी येथ राहें,
वदत [4]सकळ तूझें आदिं मी जी धरा हे.’ ॥ ७

(पद.)

राहें ऋषिराय हो! । तेथें उणें काय हो! ।
निशिदिनिं सेवा करि दुर्योधन राय हो! ॥ १ ॥
बोले ऋषि भूप रे! । मत्सेवा अमूप रे! ।
करितां विलंब तूतें ठावा कीं मत्कोप रे! ॥ २ ॥
बोले येर शक्यते । यथार्थ हो! वाक्य ते ।
तुझी सेवा शिरीं मला वाटे सर्व सौख्य तें ॥ ३ ॥
वाद हा कशास हो! । सांगावा अशास हो! ।
संतसेवा करी त्याचा पांडुरंग दास हो! ॥ ४ ॥ ८

(श्लोक.)

उठे अर्धरात्रीं म्हणत, ‘मज द्या अन्न [5]वेहिलें,
सहस्त्रां खंडीचें अहित न शिवों सीत पहिलें ।
करा भक्ष्यें भोज्यें [6]सरस तरि मी सेविन’ म्हणे,
[7]निवेदी त्या राजा त्वरित करुनी सिद्ध; न म्हणे. ॥ ९

अकालीं म्हणे वस्तु ना तेच द्यावी, अशी तत्कथा ते किती हो! वदावी ।
जसें येत इच्छेस त्याचे तसें हो[8]? धराधीश आधींच दे त्या तसें हो! ॥ १०
लोटले दिवस याचप्रकारें, तोषला ऋषि मनीं उपकारें ।
वदत, ‘इच्छित माग नृपाळा! । देतसें [9]अटक जे गणपाळां.’ ॥ ११
अशी ऐकतां भूप वाचा मुनीची, वदे, ‘एक इच्छा असे हो! मनाची, ।
वसे धर्म अद्वैतरानीं [10]अरी तो, द्विजाती बहु तृप्त अन्नें करीतो. ॥ १२

---

१. एकदम. २. प्राप्त होई. ३. दयाळू. ४. [दुर्योधन] वदत, मीं ‘आदि जी धरा हे सकळ तूझें’—असा अन्वय. दुर्योधन म्हणाला, मी ही पृथ्वी इत्यादि सर्व आपलेंच आहे—असा भावार्थ. ५. लौकर. ६. उत्तम. ७. अर्पण करी. राजा त्वरित सिद्ध करुनि त्या निवेदी, [सिद्ध न असें] न म्हणे—असा अन्वय. ८. होई, होतसे. दुर्वासाच्या मनास येई तसें होतसे—असा भावार्थ. ९. अशक्य. १०. शत्रु.

करा सिद्ध आर्तासि बा! किंकराच्या[1], असे तो प्रसादें सुखी भास्कराच्या, ।
दिवा[2] द्रौपदी तृप्त अन्नें द्विजातें करी; पाठिसीं[3] जेववी पंडुजातें. ॥ १३
स्वयें सारुनी शेवटीं भोजनाला, निशीं घालुनी पालथें भाजनाला[4], ।
करी तेथ निद्रा निशीमाजि साही[5], छळावें तदां लावुनी त्यां कसाही[6].' ॥ १४
अशी युक्ति गांधारिच्या बाळकाची, स्विकारीत अत्रीऋषीबाळ[7] काची[8] ।
निघे लक्ष शिष्यांसि घेऊनि संगीं, वना पातला अर्धरात्रप्रसंगीं. ॥ १५

'शिव हर हर' ऐसे शब्द तोंडीं उटाळी[9],
करिति गजर हस्तीं वाजवीताति टाळी, ।
निरखुनि घॅन[10] सौख्यें जेंवि आवेश मोरां,
परिसुनि गॅल[11] तेंवी धर्म धांवे समोरा[12]. ॥ १६

भीमार्जुनासहित माद्रिज द्रौपदीतें, धांवोनि ठेविति शिरें ऋषिच्या पदीं ते, ।
क्षाळावया[13] चरण आणित जों जळाला, देखोनियां ऋषि बहूत मनीं जळाला[14]. १७
बोले क्षुधें करुनि फार पिडों अशांला, अन्नाविणेंच उपचार करा कशाला? ।
जातां पथीं रवि निघे वरुणालयातें, झाली निशी सहज यास्तव यावयातें.॥ १८
'इच्छा[15] तुझी धरुनि हा जिव वांचला रे! देओनि अन्न मजला जिववा चला रे!'।
पाहे युधिष्ठिर सचिंतचि[16] द्रौपदीतें, येरी[17] नमूनि वदली ऋषिंच्या पदीं ते.॥ १९

---

१. सेवकाच्या. किं करोमि कुर्यांम् वा इति स्वामिनं पृच्छति इति किंकरः। अथवा कुत्सितं करोति इति, 'काय करूं महाराज' असें विचारणारा सेवादक्ष चाकर याला किंकर म्हणावें. किंवा जो काम नीट करीत नाहीं, कारण चाकरच तो, म्हणूनही त्याला किंकर म्हणावें. २. दिवसास. ३. पाठीमागून, अखेरीस. ४. स्थालीपात्राला. ५. साहाजणें, पांच पांडव व द्रौपदी. येथें 'करी' एकवचनी क्रियेचा कर्ता 'साही' हा अनेकवचनी आहे, हा प्रकार चिंतनीय आहे. ६. कसाला लावणें=परीक्षा पाहणें, सत्वास लावणें. To put to test. ७. अत्रितनय दुर्वास. ८. अपक्व, नीच, क्षुद्र. ९. वदे, ओरडे. १०. मेघांला पाहून मोरांस आनंद होतो असा कविसमय आहे. 'अन्होभोजं निशायां विकसति कुमुदं चंद्रिका शुक्लपक्षे मेघध्वानेषु नृत्यं भवति च शिखिनां नाप्यशोके फलं स्यात्' हा श्लोक प्रसिद्धच आहे. ११. वाद्ययंत्रविशेष. १२. सामोरा जाणें हें सन्मानसूचक आहे. १३. धुवावया. १४. संतापला. जळणें=रागावणें, संतापणें, चरफडणें. १५. तूं जेवायला घालशील अशी इच्छा धरून हा जीव ठेवला आहे, नाहीं तर केव्हांच गतप्राण झालों असतों—असा भाव. १६. व्यग्र चित्तानें. १७. द्रौपदी.

‘[1]सारा स्नानजपादि लौकरि चला कांहो! [2]करा वेळ तो? ।
आहे सिद्धीचि [3]पाक वाढित असें [4]कीजे त्वरा, वाळतो.’ ।
बोले तापस, ‘सर्व कर्म दिवसा सारोनि आम्ही असों,
होतां स्वल्प विलंब येथ तुजसीं मत्कोप ठावा असो?’ ॥ २०
सांगोनि येरिति निघे ऋषि [5]मज्जनातें, चिंता मनांत डसली नृपसज्जनातें, ।
[6]कृष्णा वदे, ‘वरिसि कां [7]श्रमदाह राया! [8]चिंतीं हरी, घणिच संकट तो हराया.’ ॥
[9]प्रक्षाळुनी स्वकर पाद उभीच कृष्णा, [10]वृंदावनीं सुमुख चिंतित, ‘धांव कृष्णा! ।
कोपिष्ठ तापस क्षुधातुर थाट भारी, त्या अन्न दे, समज संकट कैटभारी! २२
तुझी एक आशा मला, [11]आन कांहीं, न जाणे न लागों कदापी नखाही ।
दिनानाथ तूं भक्त माता अनंता! वदूं तारिले काय आतां [12]अनंता? ॥२३
जे पक्षी हिन दीन तेहि [13]सदय त्वां रक्षिले सर्वही,
जाणे नामप्रताप वाल्मिकमुनी आणी उमा शर्वही, ।
‘दीनानाथ’ ‘पतीतपावन’ ब्रिदें ज्याचीं असा तूं हरी,
ये धांवोनि, न आणि हानि [14]बिरुदा; मत्संकटातें [15]हरीं.’ ॥ २४
हरी ऐकतां हे स्तुती चांगलीला, छळीती ऋषी ते म्हणे [16]चांग लीला ।
निघे ताट लोटोनि जेवावयाचें, म्हणे श्री, ‘कळेना खरें [17]वाव याचें.’ ॥२५
निघाले महा चित्त उद्विग्नयुक्त, त्यजी अन्नपात्रासि हेंही [18]अयुक्त, ।
दिसे भाव चिंता [19]स्वसासंकटाची स्मरूनी [20]वनीं धांवला [21]एकटाची. ॥ २६

---

१. करा, आटपा. २. वेळ करणें=वेळ लावणें, उशीर करणें. ३. भोजनसामग्री. ४. जलदी करा. ५. स्नानातें. ६. द्रौपदी. [‘कृष्णः सत्यवतीपुत्रे वायसे केशवेऽर्जुने । कृष्णा स्याद्द्रौपदी नीली पिप्पलीद्राक्षयोरपि ॥ मेचके वाच्यलिंगः स्यात्क्लीबे मरिचलोहयोः’ इति विश्वः; ‘कृष्णः काके पिके वर्णे विष्णौ व्यासेऽर्जुने कलौ। कृष्णा तु नील्यां द्रौपद्यां पिप्पलीद्राक्षयो. रपि ॥ कृष्णं तु मरिचे लोहे’ इति हैमः.] ७. श्रमरूपी दाह. ८. प्रार्थीं, चिंतन कर, स्मर. ९. धुवून. १०.तुळसीच्या वृंदावनासमोर. ११.अन्य, दुसऱ्या कोणाची. १२. अनंता तारिले आतां काय वदूं—असा अन्वय. अनेक तारिलेस त्यांचीं आतां नांवें काय काय सांगूं? अगण्य भक्त तारिलेस—असा भाव. १३.दयाळूपणानें. १४. लौकिकास. १५.हरण करीं, निवारण कर. १६.उत्तम.१७.लक्ष्मीच्या म्हणण्याचा भाव कीं कृष्णाचें हें करणें खरें आहे कीं खोटें आहे हें कांहींच कळत नाहीं. १८. अयोग्य. १९. बहिणीच्या संकटाची. २०. अद्वैतवनीं. या प्रसंगाचें वर्णन पंडितांनीं असें केलें आहे:—‘गलद्वसन सांवरी पडत हो हरी आंवरी, पडेचि धरणीवरी त्यजुनि खेचरी केसरी । कृपांबु नयनांतरीं तिलक तो हि निद्रा हरी, दयांबुधि तया परी त्वरित पावला श्रीहरी. ॥ [वामनपंडितकृत काव्यें भाग १—पृष्ठ १५७ श्लो० ६ पहा.]

म्हणे, 'काय गांधारिचा सूत[1] मेला, सदां दुःख दे द्रौपदी उत्तमेला.'।
उतावीळ[2] झाली बहू कृष्णनाथा, त्वरें ये वनीं पक्षपाती अनाथा[3]. ॥ २७
सुखोल्हास त्या दर्शनें[4] पांडवांतें, निवे धर्मचिंता हरी थंड वातें।
तदा अष्टही[5] भाव वोसंडताती[6], शिरें तत्पदीं ठेवुनी वंदिताती. ॥ २८
हरीमूर्ति वृंदावनीं[7] शोभली ते, उभी याज्ञसेनी[8] विलोकी भली ते[9],।

२१. एकटाची म्हणजे बरोबर कोणी न घेतां. श्रीकृष्ण मथुरेचा राजा तेव्हां तो वास्तविक बरोबर आपल्या योग्य लवाजमा घेऊन जावयाचा पण द्रौपदीची इतकी काळजी कीं तो झटकन लवाजमा न घेतां निघून गेला—असा या शब्दाचा भावार्थ.

१. 'सुत' शब्दाचें वृत्तसुखार्थ रूपांतर. २. घाई. ३. अनाथांचा पक्ष घेणारा, अनाथांचा कैवारी. ४. पाहून. ५. अष्ट सात्विक भाव. सात्विकभाव—हे शरीरविकार आहेत, यांचे चार भेद मानतात. ते असे:—"१ **कायिक** २ **मानसिक** ३ **आहार्य** आणि ४ **सात्विक.** (१) **कायिक**—शरीराचे जे चलनवलनादि व्यापार, आणि मनोविकार उत्पन्न झाल्यावर मुखावर होणारीं त्या त्या मनोविकारास योग्य अशीं चिन्हें. हे सर्व कायिकअनुभाव होत (२) **मानसिक**—जसा मनोविकार उत्पन्न झाला असेल किंवा नाटकांत पात्रास त्या त्या प्रसंगीं जो मनोविकार उत्पन्न झाल्याचें अभिनयानें दाखवावें लागतें, तशी मनाची स्थिति असल्याचें दाखविणें किंवा ब्रह्मानंद समाधि इत्यादिक. (३) **आहार्य**—वेष धरून अभिनयद्वारा जें भाव तें. जसें:—विष्णूचें सोंग घेऊन चतुर्भुज होणें, सोंड लावून गणपति होणें, इत्यादिक. ह्याचा नाटकांत मात्र उपयोग आहे. (४) **सात्विक**—सत्वगुणापासून उत्पन्न होणारे जे शारीरिक विकार ते. हे आठ आहेत. त्यांचीं नांवें व लक्षणें. (१) स्तंब.—शारीरिक सर्व धर्म कायम असतां कांहीं कारणांनीं अकस्मात् गतिनिरोध होतो तो. (२) स्वेद.—घाम श्रमापासून उत्पन्न झालेला असला तर तो सात्विकभावांत गणला जाणार नाहीं; कारण तो मनोविकाराचें कार्य नव्हे. (३) रोमांच.—क्रोध, भय, हर्ष, राग, इत्यादिकांपासून अंगावर कांटे उभे राहतात ते. (४) स्वरभंग.—आवाज बदलणें. सर्दी झाली असतां जो आवाज बदलतो तो मनोविकारजनित नसल्यामुळें स्वरभंग समजूं नये. (५) वेपथु.—अंगास कंप सुटणें. हर्ष, भीति इत्यादिकांपासून हा होतो. साधारण एखाद्या वेळीं अंग कांपूं लागतें त्यास वेपथु म्हणत नाहींत; कारण तो कंप मनोविकारापासून उत्पन्न झालेला नसतो. (६) वैवर्ण्य.—शरीराचा रंग पालटणें. (७) अश्रु.—स्पष्टच आहे. (८) प्रलय.—चेष्टानिरोध. स्तंभांत गतिनिरोध असतो, व ह्यांत चेष्टानिरोध असतो. निद्रेंतही चेष्टानिरोध आणि गतिनिरोध असतो; पण तो मनोविकारजनित नसल्यामुळें तेथें स्तंभ किंवा प्रलय मानीत नाहींत. येणेंप्रमाणें हे आठ सात्विकभाव आहेत." [रसप्रबोध—पृष्ठ ६-८ पहा.] ६. उचंबळती, स्फुरती. ७. तुळशीच्या वृंदावनीं. [जालंधरदैत्याची स्त्री वृंदा, तिचें जें वन तें वृंदावन. वृंदावन म्हणजे तुळसी लावण्याची कुंडी, जागा इत्यादि असा अर्थ कालांतरानें झाला आहे.] ८. द्रौपदी. ९. तें=कृष्णमूर्ति.

तनू श्याम, भा [1]पीतवासा विकासे, [2]घनीं तेज विद्युल्लता ते विकासे. ॥२९

रत्नांचे बहु हार शोभति [3]गळां कौस्तूभ मुक्ताफळें,
वस्तू निर्गुण जे निरामय अशी ते सिद्ध [4]भक्तां [5]फळे, ।
[6]मौंजी शोभति [7]मेखळा झळकती जीं जोडिलीं माणिकें,
मूर्ती द्रौपदितें मिळे अशि कदां ना जोडिली आणिकें. ॥ ३०

करित द्रौपदि [8]दंडवता तया, बहु सुखी बघतां [9]विधितातया, ।
पुसत [10]अच्युत होय [11]सुजाणिला, 'वद तुं कां मज हे वनिं आणिला?' ॥ ३१

येरी नमूनि कथि वृत्त त्रिलोकपाळा, 'देऊं किती श्रम?' म्हणे, 'तुज हा! [12]कपाळा! ।
अत्रीज जो क्षुधित पुष्कळ विप्र संगीं, येतो त्वरें करुनि [13]मज्जन या प्रसंगीं. ॥
होतां विलंब क्षण भोजनिं भक्तरक्षा, शापूनि तो करिल आमुचि [14]सद्य रक्षा'! ।
सांगे हरी, '[15]अटक अन्न अकालमाजी आले ऋषी अधिकमास [16]दुष्काळमाजी. ॥

---

१. पीतांबरयुक्त. २. शोभे. ३. गळ्यांत. **'आं'** हा प्रत्यय सप्तमीचा असून 'अ'-कारान्त किंवा 'आ'कारान्त नामांस लागतो. याचीं अन्य उदाहरणें:—(१) पडुनि **गळां** गहिंवरल्या सीतेच्या कन्यका तशा गमल्या. [मोरोपंत—सीतारामायण], (२) कांसे सोनसळा, दिसे झळफळा, रंगीत माळा **गळां** । भाळीं पीत टिळा, नवीन विपुळा, माळा **गळां** पुष्कळा ॥ [विठ्ठल—विद्वज्जीवन], (३) जोड दिली दुखवुं नको, **पायां** पडतों बृहन्नडे सोड. ॥ [विराटपर्व—मोरोपंत]. ४. भक्तांकरितां. ५. फळ देई. ६. कमरेंत. ७. कमरपट्टा. ८. नमन, वंदन. ९. ब्रह्मदेवाचा जन्म विष्णूच्या नाभिकमलापासून झाला हें प्रसिद्धच आहे. येथें कृष्ण असें एकदम न म्हणतां पर्यायानें तोच अर्थ दाखविला आहे म्हणून येथें **'पर्यायोक्त'** अलंकार झाला आहे. या अलंकाराला इंग्रजींत Periphrasis असें म्हणतात. १०. कृष्ण. 'अच्युत' या शब्दाची व्याख्या अशी:—'च्यवनोत्पत्तियुक्तेषु ब्रह्मेंद्रवरुणादिषु ॥२३९॥ यस्मान्न च्यवते स्थानात्तस्मात्संकीर्त्यते**ऽच्युतः**। साधर्म्येणावतारेऽपि ब्रह्मेंद्रवरुणादिभिः ॥२४०॥ न स्वैश्वर्यात्प्रच्युतो यः सो**ऽच्युतः** परिकीर्तितः ॥' विवृत्तिमंत्रसहस्रसहितं श्रीविष्णोर्नामसहस्रम्—पृ० २१], 'ज्याची निजस्वरूपापासुनियां च्युति कदापि होत नसे। त्या शाश्वत देवाला **अच्युत** हें नाम फार योग्य असे. ॥ १०६ ॥ [पृ० ११], नाहीं च्युति स्वरूपा, कीं ज्याला षड्विकार ते नसती। यास्तव **अच्युत** ऐशी आख्या झाली असें तया म्हणती. ॥१८४॥' [पृ० ३५] [नामार्थदीपिका]. ११. सुज्ञ, जाणता (कृष्ण) सुजाणिला अच्युत [द्रौपदीतें] पुसता होय—असा अन्वय. १२. हा दैवा! १३. स्नान. १४. सध्यां, आतां. १५. सध्यां अन्न मिळणें अशक्य आहे—असा भाव. १६. येथें **'सार'** नामक अलंकार झाला आहे. आधींच मध्यान्हरात्र, त्यांत अधिक मास आणि त्यांतही दुष्काळ अशी एकापेक्षां एक मोठी अडचण वर्णिली आहे म्हणून **'सार'** अलंकार झाला. जेथें उत्तरोत्तर उत्कर्षाचें वर्णन असतें तेथें सार नामक अलंकार होतो:—जसें; मधाहून सुधा गोड, सुधेहून काव्य गोड, इ०. एखाद्या प-

परी गे! अशी गोष्टि ते एक माते! क्षुधा प्रस्तुतीं लागली ऐक मातें ।
तुझा शब्द मीं ऐकतां पात्रत्यागे, वनीं पातलों कां वदो गोष्टि त्या गे! ॥ ३४
क्षुधेतें मला अन्न दे वा फळातें,' म्हणे, 'ईस दे लाभ देवा! फळातें.' ।
'नसे मार्ग बोलावयाला' वदे ते, 'न आणीक बा! शुद्ध हा भाव देतें.' ॥ ३५
म्हणे कृष्ण,[1] 'स्थाली तुझी आण ते गे! दुजी कल्पना व्यर्थची तें न घे गे!' ।
वैरी[2] येरि हास्याननें पात्र हातीं, तदां पर्णदेंठास झाली पहाती. ॥ ३६

स्थाली निर्मळ शुद्ध आधिंच वरी क्षाळूनि कृष्णाकरीं,
ठेवी त्यांतचि पर्णदेंठ हरि तो औपापणातें[3] करी, ।
भक्तांचे जरि प्राक्तनींच, न तरी निर्मूनि दे शुद्धितें,
ऐसा पांडवरक्षणीं[4] हरि धरी नानापरी बुद्धि ते. ॥ ३७

पहातां करीं वोडवीतां[5] उदारा, करी दत्त देंठासि ते धर्मदारा, ।
'जगन्नाथ देवास पावो' वदे वो! असा सोडि संकल्प तो देवदेवो. ॥ ३८

---

दार्थांचे गुण उत्तरोत्तर पायरीपायरीनें वर चढून शेवटीं अगदीं अखेरच्या गुणांचें वर्णन झालें म्हणजे 'सार' अलंकार होतो. एका गुणापेक्षां दुसरा गुण पायरीनें अधिक, दुसऱ्यापेक्षां तिसरा गुण पायरीनें अधिक, असें वर्णन असून सर्व गुणांचें सार शेवटीं सांगितलें असतें म्हणून या अलंकाराला 'सार' असें म्हणतात. जसें:—(१) संसारामध्यें मनुष्यपण सार आहे, मनुष्यपणांत कुलीनत्व सार आहे, कुलीनत्वांत धार्मिकत्व, आणि धार्मिकत्वांत सदयत्व. (२) मधाहून सुधा गोड आहे, सुधेहून कविवाणी गोड आहे. (३) पर्वत मोठा आहे, त्याहून सागर, त्याहून आकाश, त्याहून ब्रह्म, आणि ब्रह्माहून आशा मोठी आहे. (४) राज्यांत सार पृथ्वी, पृथ्वीमध्यें सार स्वनगर, स्वनगरांत स्वमंदिर, आणि स्वमंदिरांत स्वपर्यंक आणि स्वपर्यंकीं स्वकलत्र सार आहे. (५) (पद्धत्व) सकलेंद्रियीं, मनुजता, सुवंशीं जनीं द्विजत्वहि दिलें भलें, बहु अलभ्य जें कीं जनीं । यशःश्रवणकीर्तनीं रुचि दिली तरी हा वरा म्हणे अधिक याच कीं अखिल याचकीं हावरा. ॥१२॥ (केकावलि). (६) ऐसें असतां 'भ्राता, तोही स्वज्येष्ठ, त्यांतही राजा, । तत्रापि धर्मकोविद, बहु मानी आणि शांतनव आजा ॥ २६ ॥ पांडुसमातें त्यातें धर्मज्ञा! मारितोसि पामरसा; । रोदन करील येणें विसरविला आठवूनि राम रसा. ॥ २७ ॥ (कर्णपर्व—अ० ४१) या अलंकाराला इंग्रजी साहित्यशास्त्रांत Climax असें म्हणतात.

१. मोरोपंतांनीं या प्रसंगाचें असें वर्णन केलें आहे:—'कृष्ण म्हणे, 'नर्म पुरे, तर्पाया योग्य सर्व थालीला, । मीच नव्हे काय इची सखि! सुरभिसखीच सर्वथा लीला.॥' 'आण बरें, पाहों दे.' ऐसा आग्रह करूनि आणविली । कृष्णेसि सत्सभेसि स्थालीसहि बहु दयाचि जाणविली.॥'.
२. हातांत घेई. ३. आपोआप, स्वभावतः. ४. दैवीं. ५. वोडवणें=प्राप्त होणें, मिळणें. [हा शब्द ज्ञानेश्वरींत आढळतो.]

देतां ढेंकर विश्व[1]जीवन, तशी तृप्ती त्रि[2]लोकीं घडे,
देखे पर्वत षड्[3]रसान्न द्रुपदी त्या स्वाश्रमीं ऊघडे, ।
दुग्धें, घृ[4]त, मधु, दधी, नवनितें सिंधूच कीं पूरते,
बोले द्रौपदि तापसी अजुनि कां नाले[5]? क्षु[6]धातूर ते. ॥ ३९

(चूर्णिका.)

येरिकडे ऋषिभार देखति सा[7]र चोज गंगातीरा । पंच पुरुषेंसि पतिव्रता भलि निर्मि नूतन ते कनकांबरा । सुंदरा अतिपामरा मज वर्णवेल किति सत्वरा । करि विश्वकर्ता । भक्तशिणहर्ता । हेम[8]पाट घनदाट मांडित भूलले ऋषि देखतां । नीट झाडूनि ताटभार बहुत रत्नखचित झाला मांडिता । देखती ऋषि वाढितां घमघमाट षड्रसान्न बहु उष्ण उष्ण चोखं[9]ट सुवास [10]अंबरीं धांवती । पापडादि सांडगे घृ[11]त पोळिया बहु आ[11]ज्य ततहि शोभती । वदूं ते किती । शर्करारचित कर्करीत अपूर्व मोदक दर्दरीत मधुदुग्धादि दहीं सागरासम आणिलीं. । लोणचीं बहुविध पात्रीं संसिद्ध यापरि कृष्णनाथ करी चरित्र भोजनीं तृप्तता ऋषिलागीं सहजें बाणली. ॥ ४०

(श्लोक.)

करिति तापसी चोज[12] मानसें, किति पदार्थ हे? बा! सिमा[13] नसे ।
द्रौपदी करीं उदार वाढितां, स्वार्थ ऋषिवरां होय वाढता. ॥ ४१
अमर्याद ते जेवितां पहा, जाय तो क्षुधादीक ताप हा ।
पोटिं स्व[14]ल्पही ठाव ना दिसे, जेवणेंपरी भावना दिसे. ॥ ४२
न पाहूं कधीं बा! अशा भोजनाला, मुखें वर्णिती पांडवां सज्जनांला ।
[15]अधोपंथ नालक्षवे पोटभारें, अशी लागली दृष्टि त्यांची न[16]भा रे! ॥ ४३
आपापणांत पुसती गति स्वांबराची, आहे किंवा वद गतीच दिगंबराची ।
प्र[17]क्षाळुनी वदन बैसति ते उताणे, दीले विडे मग युधिष्टिरदेव त्याणें. ॥ ४४

---

१. सृष्टिरक्षक. २. स्वर्ग, मृत्यु व पाताल या तीन लोकांत. ३. मागें पृष्ठ ७७ टीप ८ पहा. ४. येथें वृत्तसुखार्थ 'घृत' यांतील 'घृ'ला दीर्घत्व आलें आहे. ५. आले नाहींत. ६. भुकेले, बुभुक्षित, क्षुधापीडित. ७. सार चोज=मोठें आश्चर्य. ८. सोन्याचा पाट. संस्कृतप्राकृत शब्दांचा समास करणें अप्रशस्त होय. ९. चखोट, चांगले. १०. आकाशांत. ११. तूप. १२. आश्चर्य, नवल. १३. मर्यादा. १४. थोडी सुद्धां, अल्पही. १५. पोट फार भरल्यामुळें खालीं पाहवेना म्हणून ते आकाशाकडेच पाहात राहिले—असा भाव. १६. आकाशाकडे. १७. आंचवून.

लागतांच नयमात्र ऋषींतें, झालिं गुप्तचि [1]सहाहि तसीं तें ।
कृष्णकृत्य न गमेच म्हणूनी, बोलती कमळजादि गणूनी. ॥ ४५
धर्म धाडि इकडे सहदेवा, लागला म्हणुनि वेळ [2]भुदेवां ।
येर ये त्वरित तों ऋषिपासीं, वंदि 'कां' पुसे, 'वेळ जपासीं ? ॥ ४६
अन्नें प्रसिद्ध तंव वाढिलिं तेथ पात्रीं, तीं सेवणें म्हणत आपण सुपात्रीं ।
दुर्वास बोलत ऋषींस असों उग्यांतें, 'आम्हांसि बा ! कुमति [3]अंधज दे दग्यातें. ॥
छळायास कां धर्मरायासि जावें ? [4]खुळा मीच आतां मरायास जावें. ।
तरी हा बरा बंधु न भ्रांति आम्हां, द्वितीयें भरा बंध निभ्रांत आम्हां. ॥ ४८
सती कोपल्या शाप देईल साच' स्मरूनी वदे माद्रिजातें तसाच ।
'वरें नित्य कल्याण तुम्हासि माझ्या, असो आमुतें तृप्ति झाली सिमा ज्या.' ॥ ४९

## उपसंहार.

(श्लोक.)

आलिंगूनि ऋषी [5]नकूळअनुजा धाडी गृहा गौरवें
ऐसी [6]कृष्णकृपासुधाकरप्रभा [7]भक्तक्षिती मीरवे ।
धर्मा पाठवुनी निरोप ऋषि तो गेला त्वरें आश्रमा
ऐसा श्रीपति तो [8]पदोपदिं हरी त्या पांडवांच्या श्रमां. ॥ ५०
ज्यांला अंतरिं कृष्ण बाहिरहि तो [9]सर्वांभुतींही हरी
भासे, त्यांवरि विघ्न तें हरिच कीं कृष्ण स्वयें तो [10]हरी ।
'स्थालीपाककथा' अपूर्व कथिली [11]द्वैपायनें भारतीं
ते श्रोत्यांस निरूपिं [12]प्राकृतगिरा घ्या पांडुरंगारती. ॥ ५१

---

## [13]विठ्ठलकविकृत

## २२. [14]शबर्याख्यान.

(साकीवृत्त.)

[15]श्रीमद्भक्तिपरायण [16]शबरी विचरे त्या [17]कांतारीं ।

---

१. पांच पांडव व द्रौपदी. २. ब्राह्मणां, ऋषींना. ३. दुर्योधन. ४. वेडा. ५. सहदेवा. ६. कृष्णाची कृपारूपी चंद्राचा प्रकाश. ७. भक्तरूपी पृथ्वीवर. येथें 'उपमा'लंकार आहे. ८. वारंवार, नेहमीं. ९. जिकडे तिकडे, सर्व ठिकाणीं. १०. हरण करी. ११. व्यासानें. १२. मराठीभाषा. १३. मागें पृ० ३२ टीप १ पहा. १४. ही कथा वाल्मीकिरामायण–

योग्यासम ते निमग्न भजनीं शरयूतीरविहारी. ॥ १
निघे दंडकारण्यीं आणी चंड सवें आदिमाया, ।
सेवा वनिं स्वामिची स्वभावें निघे सती कराया. ॥ २
लक्ष्मण बंधू सवें निघाला तिघें चरणपथ चाले ।
क्रमिती घोर अरण्या श्रम ते ऋषिवर हरिते झाले. ॥ ३
दृढतर भाते पूर्ण जयांचे धनु हिंडति आरामीं ।
तेथें शबरी अखंड विचरे रंगुनि राघवनामीं. ॥ ४
वांछित दर्शन लाभ होइल कधि शोधि अटव्या रानीं ।
........................................................................ ॥ ५
आनंदलि मनिं म्हणे, 'मि वंदिन पद त्या श्रीरामाचे'. ।
निघे तसिच मग प्रांत निरिक्षी सत्वर आरामाचे. ॥ ६
पक्क फळांचे वृक्ष बहूतचि जेथें तेथें आली; ।
माझा राम क्षुधित असेल कीं म्हणुनी शीघ्र निघाली. ॥ ७
मोठ्या प्रेमें सफळ तरूतें वेळघुनि तोडि फळांतें ।
सत्वर उतरे वोटी भरुनी गात मुखीं अवळा ते. ॥ ८
देउनियां दशदिशा निरीक्षा सुरस फळातें चाखी. ।
आम्ल तिक्त कटु त्याग करुनियां गोडचि वसनें झांकी. ॥ ९
आलि निबिडवना हिंडत हिंडत जेथें जनक जगाचा ।

---

अरण्यकांड–सर्ग ७४ यांत आहे. या कथानकावर आनंदतनयाची कविता आहे. १५. ईश्वराची भक्ति करणारी. येथें 'दुःखदारिद्र्यवाचकाः शब्दाश्चादौ न प्रयोज्याः' । 'देवतावाचकाः शब्दा ये च भद्रादिवाचकाः । ते सर्वे नैव निंद्याः स्युर्लिपितो गणतोऽपि वा ॥' मङ्गलादीनि मङ्गलमध्यानि मङ्गलान्तानि च काव्यानि प्रथंते' या नियमांमुळें, श्री'शब्दप्रयोग काव्यारंभीं केला आहे. १६. या बाईचें नांव श्रमणा. ही शबर (भिल्ल) जातीची होती म्हणून शबरी हें जातिवाचक नाम (सामान्यनाम) हल्लीं विशेषनाम झालें आहे. आलिकडे नामदेव (शिंपी), चोखामेळा (महार), रोहिदास (चांभार) इत्यादि विशेषनामें जातिवाचक म्हणजे सामान्यनामें झालीं आहेत. त्याचे उलट शबरीचें उदाहरण आहे, त्याचा उपयोग विशेषनामाप्रमाणें केला आहे. १७. दंडकारण्यांत.

१. तपस्व्याप्रमाणें. २. राम निघे. ३. चंड (भयंकर) दंडकारण्यीं–असा अन्वय. ४. सीता. ५. पायांनीं, पायदळ. ६. चालण्याचे श्रम. ७. बळकट. ८. आरामानें, आनंदानें. ९. भयंकर. १०. पाही, शोधी. ११. फळयुक्त. १२. ओळंबून. १३. ओंटी. १४. दृढनिश्चयी, ईश्वरनामस्मरण करण्याविषयीं दृढनिश्चयी. १५. वस्त्रानें.

सनक सनंदन ज्या चरणीं नत[1] आणी अरिहि[2] नगांचा. ॥ १०
ज्याच्या मस्तकिं दीर्घ जटा, धनु शर करकमळीं शोभे, ।
वल्कलवेष्टित काया, आंगीं कवच, कैशाला[3] नोभें. ॥ ११
यापरि राम निरीक्षुनि शबरी वंदि पदांबुज भावें[4] ।
सात्विक भाव उदेले आंगीं; 'कवण परी तुज गावें?' ॥ १२
पूर्ण मनोरथ झाले; न उठे रामचरणिंची कांहीं ।
आपुल्या करकमळानें उचलुनि आलिंगन दे बाहीं. ॥ १३
'फार दिवस तूं रामा! असती वाटे मला भुकेला ।
गोड फळें हीं मी तुजसाठीं आणिलीं भक्षि कृपाळा!' ॥ १४
सारिं क्षतांकित[5] निरखुनि डोळां, 'कां गे! अशीं?' म्हणताहे ।
'चंचुपुटानें[6] दिल्या चुबुकण्या पक्ष्यांनीं दिसताहे.' ॥ १५
'चंचुक्षतें हीं न्हति नृपाला! मी आपुल्या निज दांतें ।
चाखुनियां तुज आणियलीं मी शुद्ध धरुनि भावातें? ॥ १६
मधुर फळांची घेउनी गोडी निरखुनि भाव तियेचा ।
परम सुखावे मग रघुराजा बोले ईश[7] श्रियेचा. ॥ १७
'झालों तृप्तहि माग अपेक्षित[8] काय मनोरथ आहे?' ।
बोले शबरी त्रिभुवनपतितें, 'वियोग तुझा नच साहे. ॥ १८
तूझें रूप सदोदित ध्यानीं राहो माझ्या[9] रामा! ।
हेंचि मागणें माझें असे.' कीं घडि घडि विनवी रांमा[10]. ॥ १९
येणेंजाणें[11] या संसारीं फार कठिण मज वाटे ।
निरसुनि मायामोहपसारा लावीं चिन्मयवाटे[12]. ॥ २०
रामा तव पद पाहतां मजला आनंद झाला भारी ।
आतां हें पद सोडुं कसें मी सांग मला सुखकारी? ॥ २१
तव पदमहिमा गोतमवामा[13] जाणे विधितनया[13] ते ।

---

१. नम्र. २. इंद्र, पर्वतांचा शत्रु. येथें 'पर्यायोक्त' आहे. ३. येथें कांहीं अपपाठ असावा. ४. भक्तीनें. ५. दांतांच्या क्षतांनीं युक्त. ६. चोंचीनीं. ७. श्री(लक्ष्मी)चा ईश (स्वामी)=राम. येथें 'कुजेचा' असा पाठ असता तर 'श्री' ऱ्हस्व करण्याची गरज न पडती. 'कुजेचा' असा पाठ अर्थानुरोधानेंही ठीकच होता. ८. इच्छित. ९. माझ्या ध्यानीं राहो— असा अन्वय. १०. स्त्री (शबरी). ११. जन्ममृत्यु इत्यादि फेरे. १२. मोक्ष. १३. अहल्या.

[1]षट्पद होउनि [2]पराग सेविति मुनिवर, [3]निधितनया ते.' ॥ २२
यापरि भिल्ली बोल बोलतां हृदयीं राम [4]निवाला ।
दशरथनंदन परम कृपाकर ज्याची प्रीति शिवाला. ॥ २३
पुनरपि आलिंगुनियां प्रितिनें प्रेमभरानें बोले ।
'जा शेवटिं [5]मिळेशी तूं; तुजला चुकतिल [6]भवभयझोले.' ॥ २४
यापरि राममुखींची वाणी ऐकुनि शबरि निघाली ।
आनंदलि मनिं [7]कृतार्थ झाली; चाले स्वपथ हि [8]चाली. ॥ २५
सद्गुरु [9]केशवरामापायीं विठ्ठल जडला साचा ।
बोलविले ते बोल बोलिला [10]मंदमती [11]अयसाचा. ॥ २६

---

# अनामकविकृत

## २३. व्यंकटेशस्तुति.

(श्लोक.)

व्यंकटेशजी! नाम चांगलें, आवडे मला चित्त [12]रंगलें ।
ध्यान मानसीं लागली प्रिती, पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ १
देखिली तुझी दूरुनी पुरी, हर्ष वाटला बहुत अंतरीं ।
ध्यान मानसीं लागली प्रिती , पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ २
व्यंकटेशजी स्वामि! [13]राजसा! पावसी मला हाचि [14]भंवसा ।
म्हणुनियां तुझी मांडली स्तुती, पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ३
व्यंकटेशजी तूजवेगळें, दीन दीसतों दावि पाउलें ।
[15]करुणांतरीं भाकिजे किती? पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ४
व्यंकटेशजी! कूळदेवता! तूंचि श्रीगुरू माउली पिता ।
इष्ट मित्र तूं [16]धंन संपती, पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ५

---

१. भ्रमर. २. पुष्परेणु, पुष्पांत जो बारिक रेणु असतो तो. ३. समुद्रकन्या (लक्ष्मी). ४. संतुष्ट झाला. ५. 'चिन्मयवाटे' हा शब्द येथें अध्याहृत आहे. ६. संसारदु:खाचे फेरे. ७. धन्य. ८. पायांनीं. ९. केशवराम हा ह्या कवीचा गुरु असावा. याविषयीं माहिती उपलब्ध नाहीं. १०. मूढ, मूर्ख. ११. पोलादाचा, पोलादी. कवीच्या म्हणण्याचा भाव कीं मी (विठ्ठलकवि) अत्यंत मूर्ख आहें. १२. रममाण झालें. १३. सुंदर. १४. भरंवसा. १५. करुणा+अंतरीं, 'करुणा जरी' असा अन्यपाठ. १६. 'वंध्वन्न' असें पाठांतर.

त्रिभुवनासि[1] या तूंचि रक्षिता, शेष शीणला गूण वर्णितां ।
वेद ही तुझी नेणती स्तुती, पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ६
कमलजापती! कमललोचना! कमलश्रीगुरु भक्तरक्षणा! ।
कमलश्रीगुरू [2]ब्रीद गाजती, पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ७
साधना तरी काय मी करूं? भक्ति कोणती सांग हो! धरूं[3]? ।
[4]तीर्थयात्रही फीरलों किती; पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ८
हृदय फूटलें कंठ दाटला, नीर लोचनीं पूर सूटला ।
धीर मी धरूं मानसीं किती? पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ९
उशिर हा तरी फार लागला, मार्ग लक्षितां दीन शीणला ।
अझुनिही किती अंत पाहसी? पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ १०
लक्षुमीपती छंद लागला, भक्तिकारणें शीघ्र पावला ।
भेटि दीधली कृष्णजीप्रती, पाव गा! त्वरें लक्षुमीपती! ॥ ११

---

## गोसावीनंदनकृत[5]

### २४. सीतास्वयंवर[6].

(शार्दूलविक्रीडित वृत्त.)

विश्वामित्र वशिष्ठ सर्व हि ऋषी आले सितासैंवरा
सांगातें[7] रघुराज पूर्ण विजयी लावण्यतेचा[8] हिरा ।
हातीं त्र्यंबकबाण[9] घेउनि उभा शोभे जसा नोवरा
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ १
चिंता फार करी मनीं जनक तो ही जानकी नोवरी
द्यावी त्या रघुनायकास स्वकरें वाटे मला अंतरीं. ।
केला म्यां[10] पण[11] हा परंतु धनु हें ओढील कैशा परी?
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ २

---

१. 'त्रिभुवननायका तुज लक्षितां' असा अन्य पाठ २. लौकिक, कीर्ति. ३. 'आदरूं' असाही पाठ आहे. ४. 'तीर्थआटणा' असा. ५. कऱ्हाड येथें राहणारे गणपत्युपासक निरंजनबोवांचे हे शिष्य होते असें वृद्धमाहितीवरून कळतें. या कवीचीं पदें बरींच प्रसिद्ध आहेत. ६. हा कथाभाग रामायण बालकांडांत आहे. या कथानकावर वामनपंडित, विठ्ठल, जयरामस्वामी, अमृतराय व चिंतामणि यांची कविता आहे. ७. बरोबर. ८. 'लावण्यते साजिरा' असा अन्य पाठ. ९. शंकराचें चाप. १०. 'म्हणे' असें पाठांतर. ११. प्रतिज्ञा.

केली चित्रविचित्र सुंदर सभा शृंगारिलीं मंदिरें
राजे सर्वहि रावणादिक बरे बोलाविले आदरें ।
त्यांमध्यें रघुराजरूप जनकें तें देखिलें गोजिरें
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ ३
क्रोधें रावण गुर्गुरी मग म्हणे, 'कैशासि आलीं भटें[1]
राजा हा बहु भोळला[2], जनक तो त्याशींच बोले हटें[3] ।
रामाचा बैंडिवार[4] फार वदती; हें बाळ तों धाकुटें.'
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ ४
क्रोधें रावण ऊठिला मग सभेपूढें उभा राहिला,
पाही चाप पराक्रमें उचलितां भूमीवरी त्राटिला ।
नाकीं तोंडिं रुधीर वाहत असे भूमीवरी पाडिला[5]
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ ५
विश्वामित्र म्हणे, 'रघूत्तमविरा! तूं नोवरा साजिरा[6]
वे गा! त्र्यंबक सज्य[7] ओढुनि करें सीतेसि तूं नोवरा.[8]' ।
रामें सद्गुरु[9] वंदिला, मग सभेपूढें उभा राहिला.
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ ६
रामें त्र्यंबकचाप ओढुनि करें मोडोनियां टाकिलें,
पुष्पांचा वरुषाव देव करिती त्रैलोक्य आनंदलें. ।
सीता येउनि माळ घालित गळां सर्वस्व तें अर्पिलें;
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ ७
ऐके हर्षसुखें कुरंगनयना चंद्रानना कामिनी
रामाचें रुप देखतांचि नयनीं तल्लीन झाली मनीं. ।
द्रव्यें सुवर्ण घेउनी निज करें ओंवाळिती स्वामिनी[10]
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ ८
भेरी टाळ मृदंग ढोल गजरे[11] धों धों दमामे किती
वीणा आणिक सनय्य बंबहि तसे वाद्यें बरीं वाजती ।

---

१. भट=योद्धे. ['भटें' हा शब्द तुच्छतादर्शक आहे.] २. भुलला. ३. मुद्दाम. ४. मोठेपणा. ५. 'तेहि स्थळीं लोळला' असाही पाठ आहे. ६. सुंदर. ७. 'चाप' असाही पाठ आहे. ८. येथें 'हो' हें क्रियापद अध्याहृत घेतलें पाहिजे. ९. 'श्रीरामें गुरु वंदिला' असाही पाठ आहे. १०. 'सुंदरी' असाही पाठ आहे. ११. गजर होई, वाजे, गर्जे.

तैशा संगित रावबासमिप त्या नृत्यांगना नाचती.
गोसावीसुतस्वामिराज नृप तो रामाय तस्मै नमः. ॥ ९

---

# नागेशकविविरचित[1]

## २५. चंद्रावळीवर्णन[2].

(श्लोक.)

### उपोद्घात.

वंदूनियां पाय गजाननाचे, दृष्टीपुढें काव्य शुभाननाचे ।
प्रभाव वर्णी मग भारतीचे[3] मुखांबुजीं[4] चालति भार[5] तीचे. ॥ १
दावितो बहुत भाव रदानें, गंडयुग्म गळतो वरदानें ।
देत जो निजजनां[6] वरदानें, दीधली मति तयां वरदानें[7]. ॥ २
जरि शिरीं गणराज विराजतो, तरिच हा कवि एक विराजतो ।
मतिस दे जरि तेच सरस्वती, रसवती तरि होय सरस्वती. ॥ ३
गुरुचरणसरोजीं शत्पदप्राय (?) जाले
मन नवरसधारास्वादनीं फार धालें[8] ।
सकल कविकुळांतें वंदितों आदरेंशीं
तदुपरि वचनें मी बोलतों सुंदरेंशीं. ॥ ४
त्यानंतरें प्रार्थिन सज्जनांतें, आहे तयांशीं मज सज्ज[9] नातें ।
ते स्वामि, ज्यां सेवकते[10] सजावें[11], त्यांच्या प्रसादें कवितेस[12] जावें. ॥ ५
कर्ता अहंभाव[13] नसेच पाहें, हरि स्वसत्ता[14] वदवीत आहे ।

---

१. या कवीनें आपलें इतिवृत्त या काव्याच्या अखेरीस दिलें आहे तें असें:—राहण्याचा गांव भिंगार (जिल्हा अहमदनगर). बापाचें नांव मोरजोशी, आईचें नांव जानकीबाई. वडील भावांचीं नांवें मल्हारी व त्र्यंबक. हा कवि बराच विद्वान् असावा असें वाटतें.
२. हा कथाभाग 'अग्निपुराणां'त आहे. याच कथानकावर मोरेश्वरकवीनें एक सुंदर काव्य रचलें आहे व तें पहिल्या भागांत छापलें आहे. हें आख्यान बरेंच सरळ व सुबोध आहे. प्रत्यंतराच्या अभावामुळें कांहीं ठिकाणीं अशुद्धें राहिलीं आहेत त्यास आमचा नाइलाज आहे.
३. वाणीचे. ४. मुखकमळीं. ५. समूह, संभार. ६. भक्तांस. ७. वर देणाऱ्यानें. ८. संतुष्ट झालें. ९. जवळचें. १०. किंकरत्व, दास्य. ११. शोभावें. १२. कविता करायास जावें. १३. 'मी कर्ता' असा गर्व नाहीं. १४. हरी आपण होऊन हें काव्य माझ्याकडून करवीत आहे. मी करीत नाहीं—असा कवीचा उद्देश.

जें जें हरीच्या रुचिलागिं देतें, तें तें स्वयं[1] मद्वचनास येतें. ॥ ६
जें जें हरीनें मज बोलवावें, तें तें स्वभावें मग म्यां वदावें ।
तेथें करी कोण विकल्प[2] वांछा, बळी[3] असे केवळ ईश्वरेच्छा ! ॥ ७

**कथारंभ.**

चंद्रावळी चारु[4] चकोरनेत्रा, तिच्या कथा मी वदतों पवित्रा ।
असक्त झाला हरि जो जयेसी, वर्णील पां कोण पुरें तयासी ? ॥ ८
राही मही[5]शललना ललनांत[6] धन्या, चंद्रावळी तदनुजा[7] मनुजांत धन्या ।
[8]संपूर्णचंद्रवदना, सदनांत[9] राहे, वर्णीति ते सुर[10], तिला [11]रति लाजताहे. ॥ ९
चंद्रावळी सुंदर गोपपत्नी[12], सदां मुदा[13] वर्तत फार यत्नीं ।
सेवा प्रियांची[14] बहुसाल माने, पतीविणें देव दुजा[15] न जाणे. ॥ १०
परपुरुषमुखातें स्वप्निंही ते न देखे
अणुभरि कलुशानें[16] चित्त तीचें न माखे ।
[17]श्वशुरसदन मान्या[18], मानिते नित्य काळीं
निजपतिचरणातें ध्यात जे [19]अंतराळीं. ॥ ११
[20]अदृष्ट तीचें मग तें उदेलें, किंवा महद्भाग्य फळासि आलें, ।
सासूसि बोले स्वगृहांत धीटा, 'जाइन मी हो ! मथुरेसि हाटा[21]. ॥ १२
व्रजवधू अणि जातिल बाइजी, मिहि तयांप्रति जाइन आइजी ! ।
[22]मसृण दुग्धदह्यासि विकावया, चतुर विक्रय बोल शिकावया.' ॥ १३
सासू म्हणे चंद्रकलेस, 'बाळे ! झणीं मनीं तूं धरिसी कुचाळे[23], ।
वाड्यांतुनी बाहिर त्वां न जावें, कुलस्त्रियांनीं स्वगृहीं वसावें. ॥ १४
महा भूतसंचार होतो जयेला, मनीं बुद्धि ऐसीच होते तयेला ।
जगीं आमुचें नांव हें थोर आहे, तया लाविसी तूं कलंकासी पाहें. ॥ १५

---

१. आपल्या आपण, आपोआप. २. संशय, किंतू, मतभेद. ३. बलवत्तर, बलवान्. ४. सुंदर. ['सुंदरं रुचिरं चारु' इत्यमरः.] ५. महि+ईश+ललना=पृथ्वी+पति+भार्या=कृष्णाची बायको. ६. येथें लाटानुप्रास आहे. ७. तिची धाकटी बहीण. ८. इंदुमुखि. पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणें जिचें मुख आहे ती 'संपूर्णचंद्रवदना.' ९. घरांत, घरीं. १०. देव. ११. मदनभार्या. १२. गवळीण, अहिरभाजा. १३. आनंदानें. १४. नवऱ्याची. १५. दुसरा. १६. पापानें. १७. सासरें, सासऱ्याचें घर. १८. आदरणीय, पूज्य. १९. अंतःकरणांत. २०. दैव. २१. बाजारास. २२. तोललेल्या. २३. वाईट संवय.

सहज सुंदररूप तुझें असे, अति विशेषच [1]आभरणीं दिसे ।
अतुल [2]कज्जल [3]तांबुल घेउनी, तरुण दुर्जन ते जळती मनीं. ॥ १६
तुला [4]लेंकरूंबाळ गे! होय जेव्हां, बरा स्थीरसा जाण संसार तेव्हां ।
समाधान बोले जरी लोक सारा, तरी लेंकुरावीण संसार [5]वारा.' ॥ १७
बोले नणंदा मग हास्य वाचा, 'होईल आधीं विकराव ईचा, ।
भेटेल वाटे जरि कृष्ण गाटा, संसार ईचा तरि तीन वाटा. ॥ १८
चंद्रावळी! तूं जरि जासि [6]हाटा, अनर्थ वाटे तरि होय मोठा, ।
वाटे हटानें हरि दान मागे, उच्छिष्ट [7]पात्रें करितां न [8]भागे. ॥ १९
महा चाट आचाट ये आदरेंसी, अचाटें कचाटें करी सुंदरेंसीं ।
जनीं [9]निर्जनीं [10]सांजणी! भीत नाहीं, [11]हरीतो हरी चित्तवित्तास पाहीं. ॥ २०
उभा दूरि राहोनियां नेत्र मोडी, खडे [12]हाणितां जाण पात्रासि फोडी ।
निरीतें हरी, [13]कंचुकीग्रंथि सोडी, महाचुंबनीं त्यासि अत्यंत गोडी. ॥ २१
निजकरें हरितो हरि तो [14]चिरें, [15]अधरपान करी अमृतोत्करें ।
करि विनोद वधूंसह नेटका, करिं धरूनि वदे सह नेटका. ॥ २२
करी [16]रळी, तो करिं होन देतो, रागें वदावें, तरि हो न देतो; ।
जे वर्जिती लागति तीस पाई, स्वधर्मकर्में बुडती सफाई. ॥ २३
[17]अवचट [18]चट त्यातें लाविली राधिकेनें,
[19]शिशुपणिं शिकवीलें '[20]कामशास्त्रा'सि तीनें; ।
बहुत चतुर झाला शीकला सर्व [21]तंत्रें,
[22]निपटेच कपटानें [23]प्रोक्षिलीं जाण पात्रें. ॥ २४
राधा [24]कडे घेउनियां निघाली, तों कृष्णनाथें तनु चेतविली; ।

---

१. दागिन्यांनीं, दागिने घातल्यामुळें. २. काजळ. ३. विडा. ४. मूल झाल्याशिवाय. हा भाग सुभाषितरूप समजावा. ५. वाऱ्याप्रमाणें, असार, व्यर्थ. ६. बाजारास. ७. भांडीं. [येथें स्त्रिया—असा अर्थ. कवीच्या म्हणण्याचा भावः—कृष्ण स्त्रियांस भ्रष्ट करण्यास थकत नाहीं.] ८. दमत—थकत नाहीं. ९. वनांत. १०. हे मैत्रिणी! ११. हरण करितो. १२. मारून, फेंकून. १३. चोळीची गांठ. १४. वस्त्रें. १५. चुंबन घेई. १६. थट्टा. १७. वाईट. १८. संवय, छंद. १९. लहानपणीं, बालपणीं. २०. कामशास्त्रविषयक (१) कामसूत्र, (२) रतिरहस्य, (३) अनंगरंग (४) रतिमंजरी व (५) रतिचंद्रिका हे पांच संस्कृत ग्रंथ आढळतात. २१. (कामशास्त्रांतील) इतिकर्तव्यता, अवश्य करावयाचें जें कर्म तें. २२. केवळ, निस्तुक, पूर्णपणें. २३. सिंचन केलें, शुद्धीकरण केलें. २२. कडेवर, कमरेवर.

गेली तिची ते उचटोनि चोळी, तो [1]चाट आधींच कुचांस चोळी.॥२५
ऐसी उदासीन जनांत झाली, ते पापपुण्यां विसरूनि गेली ।
सर्वस्व तीचें हरिलें हरीनें, हें काम ज्याचें जन सर्व जाणे.' ॥ २६
ऐकूनि तीच्या वचनासि [2]बाला, करूनि हास्यासि वदे स्वलीला, ।
'ऐसी क्रिया त्यासि समस्त आली, ते काय तुम्हांस नसेल झाली?॥२७
आधीं [3]वधू ते [4]अनुरक्त होते, सुखें नरानें मग भोगिजे ते; ।
नेदील जेव्हां निज हस्त बाळा, तेव्हां तिसीं कोण करी कुचाळा?॥२८
जाईन मी आजि बळेंचि हाटा, पाहों कसा वाट धरील गाटा? ।
जो आड येईल वदेल बोली, त्याचा करें दांत घशांत घालीं.' ॥ २९
असें वदोनी मग सुंदरीनें, [5]अभ्यंग केला, अति आदरानें ।
पुसोनियां सर्वहि [6]अंगनेला, ते नेसली सुंदर लाल शेला. ॥ ३०
[7]तोडबंद अति सुंदर भासे, त्यावरि [8]अरुण वस्त्र [9]विकासे ।
आदरें करुनियां मग बाळी, [10]लेतसे बहुत सुंदर चोळी. ॥ ३१
घातली सखिजनीं मग वेणी, लेइलीं अतिमनोहर [11]लेणीं ।
काय वर्णन करूं? बहु [12]शोभे, देखतांच मुनिचें मन लोभे. ॥ ३२
वेणी त्रिवेणीसम भासताहे, या कारणें ते [13]त्रिगुणात्म पाहें ।
आधीं [14]फेरा केतकिपत्र साजे, त्यानंतरें राखडि ते विराजे. ॥ ३३
मूद ताइत विराजित भारी, नागबंद धरिती मग नारी ।
भोंकरें सहित कांसव [15]मांसा, मोर बोर कुहिरीवरि कैसा? ॥ ३४
दाडिमांवरि विराजित [16]रांवा, बेल साल फळ तें मग दावा ।
आंवळासहित पुष्प विराजे, आरसिउपरि चंपक साजे. ॥ ३५
आंवळेसहि जिभीं अणि गोंडे; देखतां मुनि मनीं [17]मुरकुंडे ।
घातले उपरि रंगित नाडे, पाहतां यति तयासहि [18]नाडे. ॥ ३६

---

१. चावट. २. तरुण स्त्री. 'बाला स्यात्षोडशाब्दा तदुपरि तरुणी त्रिंशतिर्यावदूर्ध्वं प्रौढा स्यात्पंचपंचाशदवधि परतो वृद्धतामेति नारी.' (रतिरहस्य). ३. स्त्री. ४. आषक. ५. अभ्यंगस्नान. ६. स्त्रियांना. ७. एक गळ्यांतील दागिना. ८. पिंगट रंगाचें वस्त्र. ९. शोभे. १०. घालीतसे. ११. दागिने. १२. चंद्रावळी शोभे. १३. सत्व, रज व तम या गुणांनीं युक्त. १४. पिंपळपान. १५. मासोळ्या. १६. पोपट. १७. चकित होई. १८. जाची, त्रास देई.

गंगावनीं गुंफित फार लेणीं [1]श्रोणीतटीं [2]चुंबित रम्य वेणी ।
भासे जशी [3]श्यामल सर्पिणी ते, दंशावया कृष्णवनासि जाते. ॥ ३७
सिरसि बाळ्या सिसफुलासि ल्याली, त्याच्या खालीं हांसळी यांसी घाली ।
पानें पव्या साजती [4]भाळदेशीं पत्रीं मोत्यें घोळती तीं विशेषीं. ॥ ३८
मुक्ताफळांचा [5]सर, भांग रेखे, त्याही पुढें भांग टिळा सुरेखे ।
त्याखालतें लावित चंद्रहास्या, भ्रूअंतरीं सिंदुरबिंदु केशां. ॥ ३९
पुलिना थवे सर मोर होती, मना नये ती मग लेति मोतीं ।
नाकासि मोतीं अतिरम्य [6]भावे, दाणा तयाचा अति मोल पावे. ॥ ४०
कर्णीं फुलें भोंवरिया अभंगा, पखे लवंगा बुगड्या सुरंगा ।
कोथिंबिरी आणिक खुंटबाळ्या घोंसाचिया त्या जडिता निराळ्या. ॥ ४१
सर्वांवरी शोभति तोंगलें हीं, जडीत कापा उपमाचि नाहीं ।
नागोत्तरें कुंडल कर्ण झालीं, त्यालागिं बाळा मग ते निघाली. ॥ ४२
टिकमणि गरसोळी तेज मोठें सरीचें
सरळ सर गळांचे शोभती मोतियांचे ।
तदुपरि दुलडीही सांखळी ताइतेंसी
पदक जडित शोभा एकदाण्यासि कैसी? ॥ ४३
एकावळी अंबरसा विराजे, पेटी महा माणिक माळ साजे ।
चिताक चिंता पटि त्या विशाळा, घाली गळां मोहनमाळ बाळा. ॥ ४४
धुकुधुकि बहु शोभा कारल्यालागिं आली
हयकुल हयदोरा हार हंमेर घाली ।
दृढतर पुतळ्यांची माळ निंबोळियाची
सरजयुरज(?) माळा चारु चांफेकळ्यांची. ॥ ४५
जडित कनकमाळा मोतियांचीच जाळी
तरुणजनमनांतें देखतां फार [7]जाळी ।
तदुपरि [8]कडदोरा शोभतो [9]मध्यदेशीं
जर कमर झणाणी नाद तो किंकिणीसीं. ॥ ४६

१. श्रोणि=कंबर, कटि. २. तिची वेणी कंबरेपर्यंत पोंचे इतकी लांब होती—असा भावार्थ. ३. काळी. ४. कपाळावर. ५. एक गळ्यांतील दागिना. ६. शोभे. ७. पोळी, भाजी. ८. करगोटा, गोफ. ९. कमरेंत.

बाहू बहू शोभति बाजुबंदीं, त्या तोळबंद्या अतिरम्य रुंदी ।
वांकी चुडे कंगणियांसि घाली, त्या आंवळ्यांचे सर थोर त्याली. ॥४७
सकंकणें पाटलिया सुवाळे, दोरे जवे हातसरा निराळे ।
कांचेच्चिया बांगडिया सुरंगा, स्थळीं स्थळीं शोभति त्या दुरंगा. ॥ ४८
जडित तो पाहें सिंका[1]च नेटका[2] आंगोळिकीं[3] त्या नवरत्नमुद्रिका ।
आरशांस अति तेज आगळें[4], जेहगीर(?) वरती दशांगुळें. ॥ ४९
पायांकडे पैंजण रम्य पाहें, त्या घागऱ्यांचा ध्वनि गर्जताहे ।
वांकी तथा सांखळिया विशाळा, त्या वेगळ्या गुंज पट्या निराळ्या. ५०
वाळे निराळे गुजऱ्यास पाहे, सर्वांवरी जेहर लेत आहे ।
नादें विनोदें नभ पूर्ण जालें, कंदर्पदर्पा अति तेज आलें. ॥ ५१

अनवट बहु भारी, जोडवीं फार माने
खुळ खुळ रव[5] कैसा होत पोल्हारियानें ।
बहु नकसि[6] विरोद्या वाजती रम्य घांटे
अरुणकिरण शोभा यावकें[7] पूर्ण दाटे. ॥ ५२

त्याली कसी आणिक रम्य भूषा[8], तांबूलशोभा वदनीं विशेषा ।
करीं धरूनी मुकुरासि[9] लक्षी, ते लेतसे अंजन [10]खंजनाक्षी. ॥ ५३

बहुत सखरपापा (?) बुंथि[11] घेऊनि बाला
धरुनि मुकुर हातीं रूप पाहे सुशीला[12] ।
अमल[13] कमलनेत्रा मानसीं बोलताहे,
सकल विमल शोभा ईश्वरायोग्य आहे. ॥ ५४

मसृण दुग्ध दहीं दुरड्याभरी, चतुर ठेविती गौळणिच्या शिरीं, ।
सकळही मग चालति गोपिका, उजळल्या[14]च जणों[15] निशिं दीपिका[16]. ॥ ५५

---

१. शिक्का, मोहोर, खूण. २. नीट, सुरेख. ३. बोटांत, अंगुळ्यांत. ४. फार, अतिशय. ५. ध्वनि, शब्द. ६. नकशी, चित्रें वगैरे. ७. अळित्यामुळें. ८. भूषणें. ९. आरसा. १०. खंजरीट पक्ष्याच्या डोळ्यांप्रमाणें जिचे डोळे आहेत अशी. ११. पडदा, आच्छादन. १२. सन्मार्गानें चालणारी स्त्री. १३. पवित्र. १४. उगवल्या. १५. येथें **उत्प्रेक्षा** नामक अलंकाराचें उदाहरण आहे. उत्प्रेक्षेचें लक्षण:—'अत्यंतसादृश्यादसतोऽपि धर्मस्य कल्पनमुत्प्रेक्षा । तां चेवमन्येशंकेध्रुवमित्यादिभिर्द्योतयेत ।' [काव्यानुशासने श्रीमद्वाग्भटः—पृष्ठ ३४] या अलंकाराची **मो**रोपंतकृत '**द्रो**णपर्वा'तून कांहीं उदाहरणें देतों:—(१) 'भीमावरि न गणुनि शरवृष्टीची झडकरी करी लगट । वाटे जनांसि काळचि तो त्याला झडकरी करील गट ॥ ४६ ॥' (२)

स्वनवती नवती दळ कोमला, तुज पुरे जपु रे! तिज वेगळा. ॥ ७२
स्तनभरें नभ रे! उचलीतसे, निजघनें जघनें भुलवीतसे ।
सुवदनावदनासि विलोकितां, जनमनीं नमनीं मग शांतता. ॥ ७३
कमळ कोमळ गंध मनोहरी, भ्रमर भोंवति कुंजति त्यावरी ।
चतुर सादर ते अवलोकिली, सुरजनीं [1]रजनीशमुखी भली. ॥ ७४
चंद्रावळी चंद्रमुखी सुकेशी, देवांगनांमाजि जशी [2]सुकेशी ।
नेत्रें करी गंजन खंजनांचें, मोठें मनोरंजन तें जनांचें. ॥ ७५
भ्रमकरें [3]दशधा [4]विधु [5]कांचला, नखमिसें चरणीं मग वांचला ।
दिधलि सोडुनि ते निज शुभ्रता, चरणिं सेवितसेच सुरक्तता. ॥ ७६
मृदुल उंच नखीं उपमा नसे, सकळ माणिकरंग फिका दिसे ।
सुनख अंगुळियांवरि शोभती, [6]उरग पंचफणापरि भासती. ॥ ७७
पादांगुळी पोंवळिवल्लि जाणा, आरक्त नखें कुसुमेंचि माना ।
किंवा प्रवाळें तरुचीं तवानें, त्या अग्रभागीं सुर गोप जाणे. ॥ ७८
किंवा गमे पंचशरें जगातें, जिंकोनियां ठेवियलें शरातें ।
कीं पादपद्मींहुनि पंचगंगा, निघालिया भासति त्या सुरंगा. ॥ ७९
सरस पाउलरंग विराजतो, तदनु [7]बाळरवी मग लाजतो ।
पदरुहीं सरसीरुह जिंकिलें, म्हणउनी कमळीं जळ सेविलें. ॥ ८०
सरळ अंगुळि देखत लाजते, कमळताळ चळाचळ कांपते ।
अरुण पाउल रंग विलोकिला, अरुणही पळतां मग [8]खंजला. ॥ ८१
पदतळें कमळें अति कोमळें, बहुत रंगित भासति निष्कळें ।
चरणिंची मृदु टांच कशी दिसे, अरुण भाव तया कुसुमीं नसे.॥ ८२
घोटीं तिचीं वर्तुळ रम्य भारी, स्थिरावले कीं [9]पुरुषार्थ चारी ।
[10]निर्लोम त्या पोटरिया सुरेखा, सुवर्ण वर्णा [11]कमनीय देखा. ॥ ८३
विमळ वर्तुळ [12]जानु विराजल्या, कनकदंड तशा उरु चांगल्या ।

---

१. रजनि+ईश+मुखी=चंद्रमुखी. येथें 'पर्यायोक्त' अलंकार आहे. २. एक स्वर्गांतील अप्सरा. ३. दहादां. ४. चंद्र. ५. कापला, (दहा) तुकडे झाले. ६. उरग=उरसा गच्छतीति उरगः। उरानें सरपटत जो चालतो तो उरग=सर्प. ७. बालार्क. ८. लंगडा झाला. [खंज(संस्कृत)=लंगडा.] ९. धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ. १०. केंसाशिवाय, रोमरहित. ११. सुंदर, सुरेख. १२. मांड्या.

कदळिची उपमा ऊरुतें नसे, बहुत शीतळ ते कदळी वसे. ॥ ८४
करि करी उपमा तरि जाणतां, असति त्यास जरी सकुमारता ।
मदनमंदिर होइल चांगलें आनवलोकितां(?) तें परि वर्णिलें. ॥ ८५
अनुपम परि त्याचें वर्णिती थोर युक्ती
सदन मदनदेवें ठेविली स्वर्णशुक्ती ।
चळ दळ दळ तेंही त्यासि ऐकोनि कर्णीं
चळ चळ चळ कांपे काळ तो, सत्य वर्णीं. ॥ ८६
सदन मदनदेवें बांधिलें मध्यदेशीं
अरुणकिरण मध्यें ऊरु शोभे विशेषीं ।
मदनसदनरूपा वर्णितां थोर गेले
मुनिवर परि ज्याच्या दास्यकामासि ठेले. ॥ ८७
नारीवरांग मृदु सुंदर उंच तैसें, मंड्क(?) पृष्ठीवरी मांसल जैसें ।
किंवा असे बहुत सुंदर रत्नपेटी, ते ठेविली रतिरसें तुजलागिं भेटी. ॥ ८८
किंवा नवी नवरसां उतरावयाची, ते कूंपिका मज गमे स्मरवैद्यकींची ।
किंवा गमे मदनमोहनयंत्र आलें, त्याच्या बळें सकळही जग वश्य झालें. ॥ ८९
अळेंच केलें स्मरवेलिकेतें, वल्ली दिसेना परि पुष्प येतें ।
कामप्रिया पंकजपत्र जाणे, मध्यें स्मरें कीं चिरिलें नखानें. ॥ ९०
भयें मुनीच्या अति नम्र झाला, तो वीध भूमीवर काय आला? ।
नितंबबिंबीं वसतीस केलें, स्थूलत्व तेणें मग त्यास आलें. ॥ ९१
महत्व त्यानें जंघनास केलें, या कारणें गौरव त्यासि आलें; ।
किंवा रथांगीं लघुता करी ते, त्याच्या सळें चक्रहि कुर्कुरी तें. ॥ ९२
किंवा मनोराहु मुखासऱ्याला, नितंबबिंबीं रविबिंब आला ।
मध्यास तीच्या बहु सिंह भ्याला, नेणो दरीच्या विवरीं लपाला. ॥ ९३
नितंबबिंब प्रभुच्या भयानें, संकीर्ण तो मध्यम देश जाणे, ।
महा भयें क्षीण विशेष झाला, स्वगौरवालागीं भुलोनि गेला. ॥ ९४
शिशुत्व संराज्य बुडोनि गेलें, मध्यांग देशांतरिं दैन्य आलें ।
किंवा कुचांनीं परिचक्र केलें, गुरुत्व मध्येंच कुटूनि नेलें. ॥ ९५

१. केळीची. २. मांड्यांना. ३. सोन्याची शिंपी. ४. मी वर्णीं. कवि म्हणतो:—मी हें खरेंच वर्णन करीत आहें. ५. असा संस्कृतप्राकृत शब्दांचा समास करणें अप्रशस्त आहे. ६. नजराणा. ७. कुपी, शिशी. ८. मोठेपणा. ९. मांड्यांस. १०. मुख+आसऱ्याला=तोंडाच्या आश्रयाला. ११. कमरेस, कटीस. १२. बिळांत. १३. परिचक्र केलें=स्वारी केली.

अथ गमत हरीच्या द्वेषनीं[1] पाप झालें,
तरिच बहुत मध्यालागिं दारिद्र आलें ।
स्तनजघननितंबीं शत्रुता थोर झाली,
म्हणउनि भय मध्या क्षीणता[2] कीं उदेली[3]. ॥ ९६
विधि करुनि विधीनें सर्वथा थोर कष्टी,
गजगमत तयेची निर्मिली आगमेष्टी ।
मुठिस धरुनि मध्या पाहिला पूर्ण दृष्टी
म्हणउनि सुदतीचा[4] मातसे माज मुष्टी. ॥ ९७
परम रुचिरतेची स्त्रीनदी पूर्ण पाहें,
अभिनव हरि तेथें नाभिआवर्त[5] आहे ।
भ्रमति मुनिजनांचीं मानसें त्यांत भारी
बुडति निघति वेळोवेळ देवा! मुरारी. ॥ ९८
घन जघन जयाचें साजिरें फार आहे,
तदुपरि रमणीचा नाभि गंभीर[6] आहे ।
हृदय रुचिरपणाचा भासतो तोची ठेवा[7]
जनमनतपनाचा भासतो कूप किंवा. ॥ ९९
रोमराज[8] करवाल[9] कसाचा, नाभि मुष्टि गमतो मग तीचा ।
शस्त्र हें विरचिलें मदनानें, जिंकिलें सकळही जग ज्यानें. ॥ १००
उरोज पक्षद्वय मध्यकाळीं, मुखींहुनी शस्त्र भुजंगबाळीं ।
जाते भयें नाभि बिळांतराळीं, रोमावळी तेचि दिसे निराळीं. ॥ १०१
किंवा पयोधर धराधर जाणताहे, त्याचे तळींहुनि चळे शमन स्वपाहे ।
कीं वारुळांतर बिळांतुनि तो निघाला, दंशावया जनमनास[10] भुजंग आला. १०२
पिपीलकाची रुचतेचि बोली, प्रवेशते नाभि बिळांतराळीं ।
कीं नाभिकुंडीं मदनाग्नि देखा, त्याच्यावरी चालति धूम्ररेखा[11]. ॥ १०३
आळेंच तें नाभि नव्हेच जाणा, न रोमराजी; लतिकाचि जाणा ।
तीलागिं आले स्तनगुच्छ भोरी[12], तद्दर्शनें रक्षक मार मारी. ॥ १०४
कीं यौवन[13]स्त्रीनयनें जनाची, भासे शलाका[14] मजलागिं तेची ।

---

१. द्वेष करण्यानें, द्वेषामुळें. २. कृशता. ३. उत्पन्न झाली. ४. चांगले आहेत दांत जिचे अशीचा. ५. नाभिरूपी आवर्त (भोंवरा). ६. खोल. ७. सांठा. ८. रोमावळी. ९. तरवार. १०. लोकांच्या मनास. ११. धूम्र=धूर. १२. पुष्कळ, मोठे. १३. तरुण स्त्रियांचे डोळे ह्याच शलाका. १४. चोया, बाण.

किंवा शराचा[1] शर तोच पाहे, बळी त्रिलोकावरि चालताहे. ॥ १०५
किंवा नवीन स्तनगुच्छ आले, त्याकारणें हे भ्रमरालि[2] चाले ।
किंवा त्रिरेखा[3] त्रि नदीच जाणा, रोमावळी सेतु निर्बद्ध[4] जाणा. ॥ १०६
किंवा पयोधर कटाहुनी ते उडाली, भृंगालि नाभिकमळावरि नीट आली ।
किंवा गमे मदनकुंजरशुंडिका[5] ते, गंभीर नाससरसीं[6] सलिलास[7] जाते. ॥ १०७
कीं काममातंग कटद्वयाची, धाराच ते चालतसे मदाची ।
कीं लोकचित्त क्रमबंधनाचें, ते शृंखळा[8] लोहमयीच[9] साचे. ॥ १०८
महारूप[10] नाहीं असें देवलोकीं, नसे मृत्युलोकीं नसे नागलोकीं[11] ।
असा मांडिला ब्रह्मदेवेंची लेखा, उराखालत्या शोभती त्या त्रिरेखा.॥ १०९
मन तोचि कृषीवळ[12] नेटका[13], उदर भूमिवरी करि कार्षिका[14] ।
सुभग त्या त्रिवळी बहु शोभती, जनमनें क्रमतां मग भागती[15]. ॥ ११०
उत्तुंग[16] पीवर पयोधर हेननाने(?), कंदर्पभूमिप्रति मल्ल असेव जाणे ।
अत्यंत सुंदर उरस्थळ भूमिकेसी, आले जणों अति मदें झगडावयासी[17]. ॥ १११
उत्तंग पीन कुच हे नव्हतील जाणा, तारुण्य कुंजर कठोर कटा समाना ।
रोमावळी सरळ सोंड दुरूनि पाहें, नाभी नव्हे ललित पुष्कर[18] तेंच आहे. ॥ ११२
निधान कुंभद्वय तेंच पाहे, श्यामत्व मुद्रा वरि भासताहे ।
त्यालागिं हे इच्छिल सानुरागें[19], मारी तयाला स्मर फार रागें. ॥ ११३
स्तनद्वयाचें मुख नीळ कैसें, सरोजयुग्मीं अलियुग्म जैसें ।
कीं चक्रवाकाद्वय[20] तेंचि जाणा, किंवा उरीं कंदुकयुग्म[21] माना. ॥ ११४
किंवा जणो[22] श्रीफळयुग्म[23] आहे, कीं नारिकेलद्वय[24] तेंचि पाहें ।
कीं तेच हेमाचळ तुंग[25] शृंगें, किंवा स्वयें ज्योति अभंग[26] लिंगें. ॥ ११५
किंवा गमे सकळ भाग्य फळासि आलें, देखोनियां बहुत विस्मित विश्व झालें ।
लावण्यपुंजित असेंच मनास येतें, कीं एडके थडकती निज मानसातें. ॥ ११६

---

१. मदनाचा, पंचबाणाचा. २. भ्रमरपंक्ति. ३. पोटावरील वळ्या, सुरकुत्या. ४. बांधलेला, तयार केलेला. ५. मदनरूपी हत्तीची सोंड. ६. नाभिरूप तलावांत. ७. सलिल=पाणी. ८. बिडी. ९. लोखंडाची केलेली. ['मय' प्रत्ययाचा अर्थ 'युक्त' 'परिपूर्ण' 'विशिष्ट' असा आहे.] १०. अत्यंत सौंदर्य. ११. पाताळांत. १२. शेतकरी. १३. उत्तम, चांगला. १४. शेतकी. १५. थकती, श्रांत होती. १६. पुष्ट. १७. मांडावयास, युद्ध करावयास. १८. सुंदर कमळ. १९. प्रीतीनें. २०. चक्रवाक या नांवाचा एक पक्षी आहे. यांतील नर व मांदीस एकमेकांचा विरह सहन होत नाहीं. २१. कंदुक=चेंडू. २२. येथें 'उत्प्रेक्षा' अलंकार झाला आहे. २३. सुपारी. २४. नारळ. २५. उंच. २६. अक्षय.

किंवा गमे सकळ विश्व जिणोन शानें, केलें अधोवदन दुंदुभितें स्मरानें ।
आकाश भूवरि पडे मग काय वांचे? या कारणें दृढ धिरें दिधलें स्तनांचें. ११७
तारुण्य सूर्य रुचि शैत्य व तोय आटे, नेणो उरोज उघडीं पडताति बेटें ।
कीं वैपरित्यरतिरंग तरावयासी, हे सांगडी स्तनमिषें धरिली उरासी. ॥ ११८
नारी नव्हे ते तरि रुद्रवीणा, उरोज [1]तुंबीफळयुग्म माना ।
स्वरास ते सद्गुण भासताहे, या कारणें सुख रतीस अमूप आहे. ॥ ११९
नव्हे नायका ते असे हेमवल्ली, नसे हस्त ते पल्लवायुक्त आली ।
तिच्या अंगुळ्यांतें प्रवाळें नवीनें, नखें तेच आरक्त पुष्पाप्रमाणें. ॥ १२०
कीं हे तवा कामिनी शृंग दोन्ही, करांगुळी सायक ते विमानीं ।
कीं हस्तपाश रचिले स्मरानें, कोणास कंठीं पडती न जाणे. ॥ १२१
कर [2]रुचिर तयेचे शोभती तैंच कैसे?
कनक जडित केळी कोंवळे गर्भ जैसे ।
करतळ [3]तळयाची निस्तुळी जाण पाळी
विमल सरळ तेथें अंगुली जाण केळी. ॥ १२२
प्रवाळवल्ली अथवा उदेल्या, [4]पंकेरुहा [5]पंकुलियाचि आल्या ।
स्मरानळालागिं रया निघाल्या, कीं देवता पाणितळ्यासीं आल्या. ॥ १२३
आरक्तनखांकित पादपद्में, चक्रें हतीं शोभति भाग्यसद्में ।
त्याच्या फळा प्राप्ति अशीच मोठी, जैं होय देवा! तुजलागिं भेटी. ॥ १२४
रेखात्रयें कंठ विशेष साजे, देखोनि त्यातें मग शंख लाजे ।
ऐकोनि कैं [6]ठाकल कोकिलाही, लाजोनि जाळी तरि कोळसाही. ॥ १२५
गेला नये हंस महानुभावी, निलाजिरा मोर मुखासि दावी ।
ऐकोनि तीचा स्वर पूर्ण कर्णीं, [7]मयूरहंसाश्चर कोण वर्णी? ॥ १२६
स्वरापुढें काय कराल वीणा? महाभयें काष्ठमयीच जाणा ।
स्वरास माधुर्य महा रसाचें, पीयूष भासे बहु सा रसांचें. ॥ १२७
हनुवटी अति सुंदर देखिली, कनक वोतुनियां जशि निर्मिली ।
उपरि गोंदित बिंदु कळाधिका, मुख सुधास्थिति होय [8]पिपीलिका. ॥ १२८
दुर्दोष होईल म्हणोनिशानें, तो लाविला अंजनबिंदु तीणें ।
किंवा स्मरें अंजन ठेविलेंसे, तें देखतां हो! जन होय [9]पीसें. ॥ १२९

१. भोंपळे. २. सुंदर. ३. तळ्याची. ४. कमळाला. ५. पांकळ्या. ६. पुढें येईल. ७. मयूर आणि हंस यांस आश्चर्य वाटलें—असा भाव. ८. मुंगी, डोंगळा. ९. वेडें.

किंवा मिषें तें विष काय आलें? त्या देखिल्या मूर्च्छित विश्व झालें।
कीं नासिकीं मस्तकिं चंद्र आहे? रोडेंजला राहु दुरूनी पाहे. ॥ १३०
तिचें ओंठसौंदर्य देखोनि भारी, प्रवाळें कशीं शुष्क होती शरीरीं।
तया ओंठसौंदर्य बिंबास नाहीं, भयें नासती पक्क तें बिंब पाहीं. ॥ १३१
नव्हे ओंठ वैक्रांत पीयूषवल्ली, तयेचीं प्रवाळेंचि बाहेर आलीं।
तया आर्द्रता ते सुधेच्या रसाची, म्हणोनी जनांतें पिपासा तयाची.॥ १३२
जो जो तयेच्या अधरासि पाहे, तो तो तृषापीडित फार राहे।
तत्ता न तूतेंच घडेल जेव्हां, तृषार्त तूं होशिल पूर्ण तेव्हां. ॥ १३३
मुख नव्हेचि सुधारसदीर्घिका, नव्हति ओंठ तयेप्रति पाळिका।
मुख वरी धरिली अमृतें बरी, तृषित तूं हरि! पान मुखें करीं. ॥ १३४
दंतांस तीच्या अति तेज साचें, तैसें हरी! कुंदकळ्यांस कैचें?।
तांबूल घेते वदनीं प्रयत्नें, तेव्हां तिचीं भासति दंतरत्नें. ॥ १३५
डाळिंबबीज जरि सोज्वळ फार होतें, दंतोपमेस तरि तें बरवेंच येतें।
तीचे विराजत असे समदंत कैसे? हीरे सुनीळ मणि कर्दमबद्ध जैसे.॥ १३६
बत्तीस ठायीं विधि कर्वतूनी, केले असे दंत असेच मानीं।
कलंक तैसाच असे निराळा, त्याच्याच केल्या चिरिया निराळ्या. ॥ १३७
सोळा कळा कीं चिरिल्या समाना, हें युक्त तीच्या वदनास माना।
पूर्वीं कळांनीं तम खादलेंसे, तें कापितां काय चिऱ्यांत बैसे? ॥ १३८
हांसें तियेच्या वदनासि यावें, चंद्रोदयीं काय तदा करावें?।
हांसोनि बोले वचनें जयासीं पीयूषवृष्टी वरि होय त्यासी. ॥ १३९
तद्वाक्यपीयूषतरंग येतो, क्लीबांही तों फार विकार होतो।
ते नोबले कीं वचनासि जेव्हां, तमीं स्वरूपीं जन होय तेव्हां. ॥ १४०
गल्ल मांसळ विराजित पाळी, पक्क निंबु फळतुल्य झाली।
देखतो पुरुष जो मग तीतें, मार मार करितो शरघातें. ॥ १४१
महादीप्ति मोठी कपोलद्वयांची, जशी दीधली वोप ते कांचनाची।
कपोलद्वयीं बिंबतें रूप साचें, जणों आरसे ठेविले कांचनाचे. ॥ १४२
कपोलीं तिच्या पत्रवल्लीच भासे, जणों स्थापिले मन्मथें काय फांसे?।

---

१. रोड झाला, कृश झाला. २. तोंडल्यास. ३. तोंडांत. ४. तहान, तृषा. ५. विस्तीर्ण सरोवर. ६. चकचकित. ७. कर्दम=चिखल. ८. नपुंसकांस सुद्धां. ९. मनाची चलविचल. १०. बोलत नाहीं. ११. मांसयुक्त, लठ्ठ. १२. गालांची. १३. कांति, तेज.

जनांचीं मनें लोचनें हीं [1]कुरंगें, क्षणें बद्ध होती तयाच्या प्रसंगें ॥ १४३
[2]नासा शुकाची जरि नीट होती, नाकासि तीच्या उपमेसि येती ।
नासा तयाची अति उंच मानें, पुष्पें तिळाचीं गळती भयानें. ॥ १४४
कीं तैलधारासम ते चपाता, किंवा असे तो मदनाग्निभाता ।
कीं नेत्रगोत्रोद्भव मध्य भिंती, कीं ते पताकाप्रति अंगकांती. ॥ १४५
सौंदर्य तीच्या नयनास पाहें, तद्वर्णनीं कोण समर्थ आहे? ।
देखोनि तीच्या नयनासि कांती, पळोनि जाती हरिवीण नाती. ॥ १४६
इचें नेत्रलावण्य आम्हासि नाहीं, [3]चकोरें कसीं भक्षिती वन्हि पाहीं ।
बरे साजिरे चांगले नेत्र कैसे? जळामाजि हो! पोंहती [4]मीन जैसे. ॥ १४७
तथा नेत्र देखोनि नीलोत्पलांनीं, कसें त्यास लागों पहातेंच पाणी ।
अहो! नेत्र शोभेति मोठ्या विलासें, जणों खेळती मन्मथाचेच फांसे. ॥ १४८
कीं ते मनोगंजन खंजनाचें, मोठें मनोरंजन तें जनांचें ।
कीं ते महाभंजन साहसाचें, कीं नेत्र ते अंजनयुक्त साचे. ॥ १४९
नेत्र धांवतचि सत्वर आले, कर्ण [5]कूपकुहरा मग भ्याले ।
अन्यथा बहुत लांबत जातें, स्थान आश्रवण यास्तव त्यातें. ॥ १५०
लोचनीं दुरुनियां हरि पाहे, तार कामिनि वसे विष आहे ।
तेंच लेपुनि कटाक्ष शरातें, मारिते तरुण लोकमनांतें. ॥ १५१
कीं लोचनीं अंजन रम्य आहे, त्यालागिं हो तें विषसाम्य पाहें ।
तेणें समालीस कटाक्षबाणें, सारीतसे मानस काय नेणें. ॥ १५२
वक्र नेत्र[6]विशिखें अनुरागें, भेदिते मुनिमनासहि वेगें ।
लक्ष्य सर्वहि अलक्ष्यच पाहीं, तीपुढें सम धनुर्धर नाहीं. ॥ १५३
त्यालागिं ते आधित वक्र पाहे, शक्रास ते काय गणीत आहे? ।
ज्यालागिं पाहे परिपूर्ण दृष्टी, तो सर्वथा धन्य; न [7]माय सृष्टीं. ॥ १५४
विंधणार अबला पाहातसे, वक्रनेत्र शरमार पुरा नसे ।
लक्षभेद परिपूर्णहि होतसे, हें अपूर्व बहुसेंच मला दिसे. ॥ १५५
लक्ष्मी नव्हे ते तरि काय कटाक्षबाणीं, पूर्वींच ते रचियली [8]कमनीय मानीं ।
आकर्ण पूर्ण शर तोच कटाक्ष साचें, जाळें महा हृदय जर्जर निर्जराचें. ॥ १५६

---

१. मनरूप हरिणें. २. चोंच, चंचु. ३. पृ० ५३ टीप २ पहा. ४. मासे, मत्स्य. ५. कुहर= (१) बीळ, खळगा. (२) कान; ६. नेत्रकटाक्षानें. ७. मावत नाहीं, राहत नाहीं. ८. सुंदर.

कीं [1]पापण्याकेश [2]अहीच माना, ते नेत्रपात्रीं [3]वमिताति जाणा ।
तारामिषें तें विष फार सांचे, देखोनि त्यातें मग काय वांचे? ॥ १५७
[4]भ्रूलता दिसति कामकमाना, नेत्र तेच शरनेमक माना ।
लक्ष कारण महा जन लाहे, कोण हा परि महाजन लाहे. ॥ १५८
कीं भोंवया अंजन वक्र रेखा, कीं त्याच कंदर्पमिशा सुरेखा ।
कीं कर्णकूपांतुनि सर्प आले, अनन्य [5]भेणें मग वक्र झाले. ॥ १५९
[6]ललाटीं प्रभा साजिरी पूर्ण देखा, जसी अष्टमीमाजि शुभ्रा सुरेखा ।
विधीनें इची निर्मिली भाळपट्टी, तयामाजि भाग्याक्षरें तूजसाठीं. ॥ १६०

धिक्कारिला चंद्र तदाननानें, तो अंतरीं [7]दाहे [8]महापमानें ।
मध्या [9]विधू यास्तव नीळ झाला, कळंक ऐसें म्हणती तयाला. ॥ १६१
सुवर्णवल्लीवरि पद्म येतें, तिच्या मुखासी तरि साम्य होतें ।
[10]आंदर्श तीच्या वदनासि पाहे, महा भयें तो मळ लिप्त होये. ॥ १६२
केशपाश कमनीयक आधीं, त्यावरी अति फुलेंच सुगंधी ।
धूप दावितहि सोडित जेव्हां, वीख सर्वहि सुगंधित तेव्हां. ॥ १६३
केशपान नभ निर्मल साजे, त्यांत तो मुखसुधा सुविराजे ।
शोभताति कुसुमें बहु तारा, देखतां न धरवे मग धारा. ॥ १६४

इचे केश देखोनियां चामरातें, जगामाजि तात्काळ 'धिक्' वाक्य होतें ।
तथा देखिल्या सुंदरा कामपाशा, मयूरें कशीं सांडती पुच्छआशा. ॥ १६५
नव्हे वेणिका ते असे [11]भृंगलेखा, मुखाब्जासि ते पाठिसीं येत देखा ।
अहो! मन्मथाची असे तेच सूरी, कठोरें मनें योगियांचीं विदारी. ॥ १६६

किंवा असे ते मकरध्वजाची, विकासकाळीं तरवार साची ।
नव्हे म्हणावी तरि काय कैशी, कापीतसे ते मुनिमानसांशी. ॥ १६७

नव्हे भांग हा कामिनी शस्त्रधारा, महा धीर जो त्यास होतो विदारा ।
शिरीं ठेविला मन्मथें काय भाला, पहातांची तो खोंचिताहे जनाला. ॥ १६८
[12]धम्मिल्ल राहोदर भेद झाला, त्यांतूनि तो कीं मुखचंद्र आला? ।
तो घाव अद्यापि तसाचि आहे, त्यालागिं कीं बोलति भांग पाहें. ॥ १६९

---

१. पापण्यांचे केश. संस्कृत प्राकृत शब्दांचा समास करणें अप्रशस्त होय. २. सर्प. ३. ओकती. ४. भ्रुकुटि हीच लता (वेल). ५. भयानें. ६. भालप्रदेशावर. ७. संतप्त होई. ८. फार अपमान झाल्यामुळें. ९. चंद्र. १०. आरसा, आयना. ११. भ्रमरसमूह. १२. काळाकुट्ट, फार काळा.

क्षशोपली कीं सम हेमलेखा, विद्युल्लता कीं [१]मुंदरांत देखा ।
मंदाकिनी ते गगनीं विराजे, किंवा तिचा भांग कशांत साजे? ॥ १७०
[२]नखारभ्य हो केशपर्यंत पाहा, तयेचें असे अंगसौंदर्य माहा ।
प्रभेनें तिच्या लोक हा दीप्त झाला, नभामाजि तो सूर्य लोपोनि गेला. ॥ १७१
अनूपम्यें ऐशीं मला वर्णवेना, तिला भोगितां दैन्य त्याचें कळेना; ।
महापुण्य जन्मांतरीं आचरावें, तरी सुंदरे नायकेशीं रमावें. ॥ १७२
असो. फारसें काय आतां वदावें? प्रयत्नें तुवां शीघ्र [३]सौरांश घ्यावें ।
सुखें योग होईल दोघांसि जेव्हां, रसाची नदी कोण वाहेल तेव्हां, ॥ १७३
असें वदोनी मग दूरी राहे, मुरारि तो फार करी त्वरा हे ।
पेंद्यास पाचारुनि बोलताहे, 'आधीं तिचा तूं [४]अनुकार पाहें. ॥ १७४
जाऊनियां तीजसमीप यत्नें, बरीं वदावीं मृदु शब्दरत्नें ।
लावीं तये दानमिषेंच झांसा, युक्त्योक्तिनें कामिनि पाडिं फांसा. ॥ १७५
साहेल तूझ्या वचनासि जेव्हां, झालें असें मानिन कार्य तेव्हां ।
बोलेल नारी जरि फार रागें, प्रयत्न तेव्हां बहुसाल लागे.' ॥ १७६
पेंद्या तथा तेथुनियां निघाला, गोपीजनासन्मुख नीट आला ।
बोले तयासीं मग तो स्वभावें, 'देऊनि दाना मग शीघ्र जावें. ॥ १७७
दान चोरुनि तुम्ही बहु जातसां, कोण आजि नवी गौळण नेतसां? ।
योग पंचम तुम्हां तरि ठाउका, वार आजि तिसरा दिसतो निका.' ॥ १७८
बोलिली शशिकळा तरि, 'बाई! [५]ग्रामसिंह वदतो तरि काई? ।
काय दान कवणाप्रति द्यावें? पेंदिया [६]झिडकरूनि वदावें.' ॥ १७९
पेंद्या म्हणे, 'कृष्ण वनासि राखी, मेवा नवा येत तयासि चाखी ।
निषेध टाकूनि अनंग कीजे, तें दान वेगीं हरिलागिं दीजे. ॥ १८०
त्वां आपुला गोरस सत्य द्यावा, पीयूष पाजूनि सुखी करावा ।
[७]कंदर्पकांता हरिलागिं देई, यावेगळें आणिक दान काई?' ॥ १८१
तद्वाक्यें बहु भेदली, खवळली, ज्वाळा जशी पेटली,
किंवा वीज कडाडली, तडकली, किंवा मही गर्जली, ।
पाळी कीं फुटली, समुद्र रचली, स्वर्गावली तूटली,
किंवा दिग्गजमंडळी सरकली, कीं कामिनी कोपली. ॥ १८२

१. मेघांत. २. नखापासून केशांपर्यंत. ३. उत्तमांश. ४. रुकार, मत, विचार. ५. कुत्रा. ६. लौकर. ७. रति.

‘मेल्या वोस पडो, तुझें मुख झडो, जिव्हा तुझी ते खुडो,
हत्या तूज घडो, शरीर रगडो, इंगोळ आंगीं जडो, ।
तूझी रांड पडो, शिरीं शर बुडो, नर्डी यमा सांपडो,
वेगीं वंश बुडो, समूळ उपडो, संसारवल्ली उडो. ॥ १८३
खांचेसि घालीं तुजलागिं वेगीं, तुझ्या घरालागिं उठो भडागी.’ ।
वदोनि ऐसें मग पेंदियातें, तोंडावरी चापटिलें[2] निघातें[3]. ॥ १८४
[4]भोंवंडि आली मग धांव बा! रे! दिक्चक्र धांवे धरणी न थारे ।
आकाश तें काय पडों पहातें, नेत्रांस झांकूनि बसेच हातें. ॥ १८५
[5]अशुद्ध वाहे वदनीं खळाळा, [6]उत्पाटला दांत पडे निराळा ।
शिरांत हाणोनि सवेग लाथा, [7]हाटासि गेली [8]प्रमदा स्वसस्ता. ॥ १८६
एक्या मुहूर्तें भ्रम तो निवाला, पेंद्या महा शंख करीत आला ।
गोपाळ ते हांसति सर्व त्याला, ‘कैसा मुलाला सिरपाव[9] झाला.’॥ १८७
पेंद्या म्हणे, ‘बा! हरि! काय सांगों? कामासि तूझ्या तरि आगि लागो ।
असे स्थळीं दाटुनि धाडिजेते, आम्हासी रांडी तरि मारि जूतें[10]. ॥ १८८
उन्मत्त गोपीजन फार झाल्या, मुखावरी हात बरा निवाला ।
नेत्रासि माझ्या भ्रम थोर झाली, तों मस्तकीं लाथ बरी विझाली. ॥ १८९
त्यानंतरें सावध शीघ्र झालों, पळोनि मी तूजसमीप आलों ।
समीप तीच्या हरि! त्वां न जावें, महत्व[11] तें तूज तरी न व्हावें.’ ॥ १९०
वदे सुदामा मग हास्यवाचा, ‘स्वभाव हा नाहिंच जावयाचा ।
ब्रह्म हरीचा बहु थोर झाला, अनेक सृष्टींस करूं निघाला. ॥ १९१
त्याला मनुष्यत्व नसेच कांहीं, हा पापपुण्यास गणीत नाहीं ।
याच्या गुणें हें जग वश्य झालें, त्याला मनुष्यत्व पशुत्व आलें. ॥ १९२
नाहीं स्वदेहीं अभिमान यासी, परांगनेचे कुचसीळनासी[12] ।
करूनि ‘नाहीं’ म्हणतो; न शंका, याच्या पणें जीवपणासि मूका. ॥ १९३
ऐशाच गोपी गमजा करीती. दो चौं दिसां यासि मिळोनि जाती. ।
त्यासी तरी सादर ऐक्यें[13] भावीं, आम्हासि पाहा वरें[14] भेद दावी.’ ॥ १९४
हरी म्हणे, ‘हेंच तुम्हीं म्हणावें, म्यां आपुलें कार्य बरें करावें.’ ।

---

१. श्लोक १८२।१८३ यांत अनुप्रासालंकार आहे. २. चापटी मारिली. ३. जोरानें. ४. भोंवळ. ५. रक्त. ६. उपटला, पडला. ७. बाजारास. ८. तरुण स्त्री. ९. लाथ; (पक्षीं) पोशाखविशेष. १०. जोडा. ११. मोठेपणा. १२. कुचमर्दनासी. १३. द्वैतरहित. १४. वरून.

त्वरें गड्यांचीं मग घेति नामें, 'माझीं तुम्ही काय कराल कामें?' ॥ १९५
[1]कामा सकामा तरि येत नाहीं, [2]रामा हरामा बहुसाल पाहीं, ।
हेमा हरामा करितो [3]तरंगी, दामा सदा मानसरंगभंगी. ॥ १९६
कार्यासना गा! करि फार नागा, केलीं म्हणे कार्य मला न सांगा, ।
नामास नामा बहुसाल बाहे, सदा सुदामा नीजरूप पाहे. ॥ १९७
एका अनेका परि कार्य नाशी, लोमा उभा राहुनि तोंड [4]वासी, ।
रंगा असे फारच हेमरंगा, दासा सदांचा तरि कार्यभंगा. ॥ १९८
रंभा समारंभ करी निराळा, विरा विरूपीवरि पांच डोळा, ।
जना जनाला बहु दुःख देतो, शिव्या शिव्यांला बहुसाल घेतो. ॥ १९९
पिसा पिसासा दिसतो मला हा, पोसा सदा पोशित आत्मदेहा, ।
नाऱ्या नरा तो करितो विचारा, समोर मोरा न दिसेच [6]दारा. ॥ २००
हा पांढरा काय करील कार्या? केरांत केरा करितो सपार्या, ।
तो अंत माझा बहुसाल आहे, दामा [7]दमामा बहु वाजताहे. ॥ २०१
पादे सदां तो पदमा परारा, भित्रा भयें कांपतसे थरारां, ।
दोंदा सदां दोंदिल वाढवीतो, हा बांकुडा लांकुडसा रहातो. ॥ २०२
कुडा [8]कुडें कार्य करीत आहे, धोंड्याच धोंडा तरि घालताहे, ।
सांडा स्त्रियांनीं तरि सांडिलाहे, वेंडाच वेडावरि फार पाहे. ॥ २०३
हांशास हांसें बहुसाल येतें, भुतासवें भोंवत सर्व भूतें, ।
लख्यास लक्षी बहुसाल चाळा, चांदा सदां चांदणिया निराळा. ॥ २०४
पेंद्यास कांहीं करुणाच नाहीं, धना धना चिंतित सर्व पाहीं, ।
हरी म्हणे आपण शीघ्र जावें, जें आपुलें आपण तें करावें. ॥ २०५
हरी बोलिला पेंदियाला त्वरेसी, 'क्षणीं तूं मनीं राग कांहीं धरीसी, ।
तिची भेट मी आज घेईन सत्य, तयेचें उद्यां होतसे पारिपत्य.' ॥ २०६
वदोनियां सत्वर तो निघाला, तदा [9]वल्लवांलागिं आनंद झाला, ।
हरीच्या सवें चालिला गोपमेळा, जणों फूटली अब्धिची काय [10]वेळीं.॥२०७

१. श्लोक १९६-२०५ यांत गोपांचीं नांवें व त्यांचीं स्वभावलक्षणें दिलीं आहेत. २. गोपविशेष. ३. खाडा करणें, पाळी चुकणें. ४. तोंड फाडी—उघडी. ५. वेड्याप्रमाणें. ६. स्त्री. ७. नगारा. ८. वाईट. ९. गौळ्यांस. १०. सीमा, मर्यादा. (मर्यादा, तीरभूमि). ['वेला स्यात्तीरनीरयोः' इति विश्वः. 'वेला काले च सीमायामब्धेः कूलविकारयोः । अक्लिष्टमरणे रोगे ईश्वरस्य च भोजने ॥' इति मेदिनी.]

[१]नारा डाव खरा अणी लघु गिरा मोका निका कावरा
भोरा पांढर पांढरा सगुहिरा गोरा विपारा हिरा ।
कोरा तो कुहिरा लसत्परकरा केरा तुरा हंबरा
धारा तो विदरा घटींच नवरा तो निस्तुरा शंकरा. ॥ २०८
नामा नारद लाहमा अणि कुमा कामा कमाला हमा
सोमा तो लखमा लुमा अणि उमा भीमा तिमा तो तमा ।
हेमा होय हमा अणीक पदमा कैसा सुदामा दमा
हेमा तो पदमा कुमा सहणमा रामा हरामा गमा. ॥ २०९
वाळ्हा दोंदिल बोबडा सकुबडा कोंडा कुडा वांकुडा
धोंडा तो दगडासवेंचि चिपडा गुंडा गडागा बडा ।
झेंडा बोडिक कानडा बडबडा तोंडाळ तो लंगडा
बेडा बेडुक धोंगडा तिडतिडा साडा सडा कांकडा. ॥ २१०
काळा तो कमळा कराल करळा बाळा बुळा आंधळा
भोळा नीळ धुमाल ताल सरळा तोळा तिळा तांदळा ।
काळा कोकिळ कावळा खुळखुळा धाला विरोळा तुला
हिंदोळा पिवळा विशाल बरळा वाचाळ तो पिंगळा. ॥ २११
कैसा तो नरसा विसा अणि पिसा दासा बसा लांबसा
मासा कापुससा भुसा अणि पिसा पोसा दसा पोरसा ।
थोंटा थोरकटा जटाळ चिकटा गाटा गढ्ढ थीवटा
खोटा हात टुटा करी खटपटा मोठा दुटा धाकटा. ॥ २१२
मूका कुब्जकुका सका अणि तुका एकाक्ष तो माणिका
टोंका तो भुरका सकान तुटका एका निका रोडका ।
मोका कामुक लाडका अणि बका बोका बुका बोडका
सेका कामुक लाडका अणि भिका मंका चिका रेणुका. ॥ २१३
आणीकही गोप उदंड आले, मार्गास रोधूनि[३] विरुद्ध ठेले ।
गोपांगना हाट करूनि आल्या, देखूनि थोवां[४] मग नीट झाल्या. ॥ २१४
त्या कोणत्या तेंच वदेन नांवें, हें तो हरीनें मज बोलवावें, ।
त्यांची करीं मी हृदयांत पूजा, तो बोलवी ग्रंथ समस्त वोजा[५]. ॥ २१५

---

१. श्लोक २०८-२१३ यांत गोपांचीं नांवें आहेत व नांवांस अनुसरून त्यांस विशेषणें लाविलीं आहेत. २. या व पुढील पांच श्लोकांत 'अनुप्रासा'लंकार आहे. ३. अडवून. ४. थवा, समुदाय. ५. उत्तम प्रकारें.

चंद्रावळी आणिक रंगमाला, पद्मावती सोमकळा सुशीळा, ।
तरंगिका चारु कुरंगनेत्रा, रंभा प्रभा रूपवती पवित्रा. ॥ २१६
चंपावती चंपकपत्रनेत्रा, चंद्रप्रभा चंद्रमुखी सुनेत्रा ।
हारावती हारतरंगितांगी, मनोहरा मानसरंगभंगी. ॥ २१७
पुष्पावती कुंदसमान [1]दंती, सरम्य रम्या रमणीय कांती, ।
बिंबाधरा मदनमोहन मर्दितांगी, मदालसा ते सुरसा सुरंगी. ॥ २१८
जयंतिका कामुक वैजयंती, जया पताका विजया जयंती, ।
[2]पीनस्तनी सुंदर वीवरोरू, रंभोरु[3] वामा कमनीय भेरू[4]. ॥ २१९
हंसस्वरा हंसगता वतांसी, हंसावरा मानसराजहंसी, ।
रत्नावती रत्नकळा रसाळा, कामालया कामकळा सुशीळा. ॥ २२०
सुवर्णवल्लीवरि मंजरी ही, रंभावती भोगवती सती ही, ।
गानप्रिया गायनगर्वितांगी, सुगायनातें सुरतप्रसंगी. ॥ २२१
आनंदिनी नंदनिका सुकेशी, कृशोदरी[5] मंजुळ मंजुभाषी ।
सारावती चंपकवल्लिका ती, चांपेइका ते तरते पाहाती. ॥ २२२
रुक्मावती रुक्मनिभा कुरंगी, लीलावती ते ललिता लवंगी, ।
अंबोजमाळा अणि रूपलीला, कामस्यदा कामिनि कामशीला. ॥ २२३
कामांकुशा मोहनि कामसेना, कलावती मंगळरंगसेना ।
तरंगिणी आणिक रंभिणीया, विलासिनी गंभितका सखीया. ॥ २२४
आणीक गोपी बहुसाल भावी, नांवें तयांचीं किति म्यां वदावीं ।
गोपाळ ते हांसति पूर्व अर्धीं, गोपी शिव्या देतिल उत्तरार्धीं. ॥ २२५
भाग्या म्हणे, 'भागति पाय तूझे, कडेवरी येउनि बैस माझे.' ।
भागी म्हणे, 'पाय तुझाच टांगो, मेल्या कडेला तरि आग लागो.'॥ २२६
'मी कूबडा ये कुबडीस जोडा, देईन हीलागुनि लाल घोडा.' ।
'मेल्या जळाल्या वदसील काई ? घोड्यास इच्छील तुझीच आई.' ॥ २२७
'एकाक्षि हे काजळ फार ल्याली, एकाक्ष मी यास्तव नेत्र घालीं.' ।
'जळो तुझा तो तरि एक डोळा, तोडील तूझा तरि काळ ळोळा.'॥ २२८
'कृशोदरी हे मजला न भावे[6], गुरुत्व ईच्या उदरा करावें.' ।

१. दांत. २. पुष्टस्तनी. ३. केळीसारख्या जिच्या मांड्या आहेत अशी. ४. भिरू, स्त्री. ५. क्षामोदरी. ६. आवडत नाहीं.

'तूं आपलें तोंड फिरोन पाहें, तुझ्या वयें[1] लेंक घरांत आहे.' ॥ २२९
'हिचा बरा हा मुखचंद्र भावीं[2], थोटा असें मी ग्रहणासि लावीं.' ।
'घरीं तुझ्या तें बहिणीस लागो, सकल अंतक तो तुज सांगो.'॥ २३०
तो आंधळा दूरुनि हांक मारी, 'जे आंधळी ते मजलागिं नारी.' ।
'खांचे पडो हा कवणास बाहे, याच्या घरीं आंधळि माय आहे.' ॥ २३१
'तृषा विशेषीं[3] मजलागिं आहे, पीयूष ईच्या अधरांत आहे.' ।
'तान्हेअला तूं जरि फार होसी, लावी नसें मीं तरि तीस पीसी.'॥ २३२
'दुरील नातें मजलागिं सांगें, भावास हे भावजयीच लागे.' ।
'बेव्या! अगा! च्या तुज काय सांगूं? नातें तुझें तें बहिणीस लागो.'॥ २३३
'माझी असे ईस बहूत गोडी, देखोनि मातें मग नेत्र मोडी.' ।
'तूं आमुचा होशिल बापभाई, नेत्रास मोडील तुझीच आई.' ॥ २३४
'खोबेजैते[4] हे मजला पहातां, हे धन्य माझ्याच पडेल हातां.' ।
'हातासि तूझ्या तरि आगि लागो, घरांत तूझ्या तरि काळ आगो.'॥ २३५
रामा सिते धांवतसे धराया, 'हे आमुची होइल पूर्व जाया.' ।
सिता शिव्या देत तयासि माहा, 'हा राम कैसा? अग लेंक पाहा.'॥ २३६
'हे घालिताहे मजलागिं डोळा, ईलागिं पाहा न पुरेति सोळा.' ।
'सोळा तुझे बापच सत्य होती, याकारणें ते वदनासि येती.' ॥ २३७
'खुणाविते हे मजलागिं बोटें, हिनेंच केलें जग सर्व थोटें.' ।
'तूं थोंट गाठा बहुसाल खोटा, तुझ्या घरा होतिल तीन वाटा.' ॥ २३८
'हे मेहुणीलागिं वडील व्हावी. व्याही सखा त्यासि त्रिहीण व्हावी.' ।
'आई तुझी सगृह कामदासी, तिचा स्वयें तूं तरि लेंक होसी.' ॥ २३९
शिवा म्हणे, 'अन्य विचार नाहीं, तूं पार्वती मी शिव सत्य पाहीं.' ।
'तुझी असें मी तरि सत्य माता, जिव्हे तुझ्या फोड उठेल आतां.'॥ २४०
'हिचा मृदंगापरि मौंज[5] साजे, दोहींस वा नाद विशेष वाजे.' ।
'त्याणें तुला फार अजीर्ण झालें, मुखींहुनी सत्वर तेंच आलें.' ॥ २४१
देखे हरी कौतुक हास्य भारें, चंद्रावळी बोलतसे विचारें, ।
'जें बोलणें तें मजलागिं बोलें, भूतांसि त्वां कां पण चेतवीलें?' ॥ २४२
पेंद्या म्हणे, 'काय वदेल गोष्टी? आम्हांसि केलें बहुसाल कष्टी, ।
आम्हासवें हे गमजा करीते, देखोनि कृष्णा मृदुता धरीते. ॥ २४३

१. वयाचे. २. आवडतो. ३. पुष्कळ. ४. लाजते. ५. कंबर, ढुंगण.

वाचाट हे चाट महा अचाटी, हे बोरकांटी तरटी निवाटी, ।
गाटी गटाटी जग थोंट मोटी, इच्या विचारें पडती कचाटीं. ॥ २४४
हरी थोर, हे बोर चेंटा म्हणावी, जगीं थोंट मोठी महा राय गोंवी ।
महा दुष्ट हे थोर चेटे कराळी, अधोदृष्टिनें हे त्रिलोकास जाळी.' ॥ २४५
हरी म्हणे त्यास, 'फिरोन पाहें, हे आप्त आम्हां वरचीच आहे.' ।
पेंद्या तुझें काय खरें म्हणावें? म्यां आपुले सोइरिकेसि जावें.' ॥ २४६
'अगइ! हळुच हा वो! लावितो काय नातें?
जवळिच जुडतो कीं लागलें भूत यातें.' ।
दचकलि हरिणाक्षी दूर दूरूनि बोले
'निपट बरळलासी गोवळ्या! काय झालें? ॥ २४७
करिसि किति कचाटें वाट आम्हांस देईं,
दहिं दुध नवनीतें आपुलें दान वेईं.' ।
वदत हरि तयेतें, 'आपुलें दान द्यावें
रतिपतिसुखभावें, शीघ्र गांवासि जावें.' ॥ २४८
'आकाशीं पुष्प तेव्हां, श्रवणहि उरगा[1], वेळे[2] होईल जेव्हां,
मूका गाईल जेव्हां, बधिरहि वचनें आइके सर्व जेव्हां, ।
जन्मांधा दृष्टि जेव्हां, जलनिधि अवघा शुष्क होईल जेव्हां,
वांझेला पुत्र जेव्हां हरि! सकळ तुझें चिंतिलें होय तेव्हां. ॥ २४९
वाळूला तेल जेव्हां, अवचट सशिया शिंग वाढेल जेव्हां,
पाप्याला पुण्य जेव्हां, खळजन न करी थोर कापट्य जेव्हां, ।
वायूला रूप जेव्हां, मृगजळ तृषितालागिं तोषील जेव्हां,
खारें पीयूष जेव्हां, तरि सकळ तुझें चिंतिलें होय तेव्हां. ॥ २५०
शारें[3] अग्नीस जेव्हां, विबुधगुरुसही मूर्खता होय जेव्हां,
निर्भाग्या भाग्य जेव्हां, उदय दिनकरा पश्चिमे होय जेव्हां, ।
चंद्राला दाह जेव्हां, मग खगपतिला सर्प डंखील जेव्हां,
आकाशा माप जेव्हां, हरि! सकळ तुझें चिंतिलें होय तेव्हां.' ॥ २५१
काळाला मृत्यु जेव्हां, विधुहि निजमुखें खाय राहूस जेव्हां,
भूमीला भार जेव्हां, तदुपरि सुरही झांकिती[4] नेत्र जेव्हां,

१. सर्पाला. २. ज्या वेळीं होईल. ३. शहारें, हींव, थंडी. ४. नेत्र झांकणें=मृत्यु पावणें, मरण येणें.

लक्ष्मीला दैन्य जेव्हां, मग गरळ शिवालागिं बाधेल जेव्हां,
विघ्नेशा विघ्न जेव्हां, हरि! सकळ तुझें चिंतिलें होय तेव्हां.' ॥ २९२
धर्माला कर्म जेव्हां, तदुपरि अमृता पंक चाराय (?) जेव्हां,
शत्रूला लोभ[1] जेव्हां, अणि[2] निजचरणीं खंज[3] धांवेल जेव्हां, ।
वज्राला भंग जेव्हां, तदुपरि वडवा वन्हि मागेल जेव्हां,
मेरूचा स्फोट जेव्हां, हरि! सकळ तुझें चिंतिलें होय तेव्हां.' ॥ २९३
'हें सर्वही होइल एक वेळे,' हरी म्हणे, 'सांडि विशेष चाळे. ।
तुझी असे सर्वहि बुद्धि तुच्छा, बळी असे केवळ ईश्वरेच्छा.' ॥ २९४
'जें होतसे तें हरि! होउं द्यावें, कर्तृत्व तेथें मग कां वदावें?' ।
'तूं सांडि वो सर्व विकल्पवांछा, बळी असे केवळ ईश्वरेच्छा. ॥ २९५
इच्छे जयाचे घडमोडि पाहे, त्यालागिं हें काय अशक्य आहे? ।
म्हणी करावी तरि कार्य तुच्छा, बळी असे केवळ ईश्वरेच्छा.' ॥ २९६
'सुंदरे! त्वरित तूं मज पाहें.' आदरें पदर वोढित आहे. ।
संचली दचकली मग बाला[4], 'सोडिं तोडिसि किती वनमाला?' ॥ २९७
'काय यासि करुं? दूरि न राहे, वासना बहुत दुष्ट नरा हे, ।
पल्लवीं धरिसी कां परदारा? तोडिसी मजचि कां घरदारा? ॥ २९८
गोवळा! वळिसि तूं तरि गाई, चित्त हें परवधूवरि कायी? ।
हांसतील घरचीं मज जेव्हां, जीव देइन पुरा तरि तेव्हां. ॥ २९९
भाकरीवरि तुवां करमावें[5], पीउनी अणिक ताक रमावें, ।
लोक येति बहुसा दर[6] वाटे, देखतोसि बहुसा दरवाटे. ॥ २६०
हाणतांच दिससी परदेसी, जाब काय घरिंच्या परि देसी? ।
नातळें[7] मज खळा! सर मागें, फीर लोक घर वासर मागे. ॥ २६१
कांबळीस करितो स्वपताका, कां घरीं बहुत तो खप ताका. ।
आपुलें कुल तरी समजावें, कां मृगें हरि[8] तरी समजावें. ॥ २६२
रंकराय करि कामशकातें (?) हे कुबुद्धि तरि कां मशकातें? ।
वैभवा निजभवासि रमावें, काय त्वां परवधूसि रमावें? ॥ २६३

---

१. दया. २. आणि, आणखी. ३. लंगडा. ४. बाला=षोडशवार्षिकी स्त्री. 'बाला स्यात्षोडशाब्दा तदुपरि तरुणी त्रिंशतिर्यावदूर्ध्वं प्रौढा स्यात्पंचपंचाशदवधि परतो वृद्धतामेति नारी.' (रतिरहस्य.) ५. सुखी राहावें. ६. दर=भय. ७. स्पर्श करूं नको. ८. हरिणानें आपण हरि (सिंह) आहों असें कां समजावें? समजूं नये—हा भाव.

खाय जाउनि शिळीच शिदोरी, तूटली वरि कसी तुझि दोरी, ।
कामिनीसह कदा न वदावें, बैस घेउनि वळीं नव दावें. ॥ २६४
काय पातक महा सुरसा हे, ठाव नेदिल खळास क्ष्मा[१] हे, ।
जे जगांत पुरवी सुरसाई, त्यावरीं करिति ते सुर साई. ॥ २६५
कोणि येउनि महाजन यातें, सांगती द्विजसमाज नयातें, ।
कोणतें स्थळ तया तळपावें, आपुलें मुख तरी कुळपावें. ॥ २६६
काय दाखविसि तुल्य पणाला, कंस मारिल तुला लपणाला, ।
जाउंदे मज घराप्रति कामा, पावसील परि त्यापरि कां मा.' ॥ २६७
देखते बहुतसा कर यातें, सांगती द्विजसमाज नयातें, ।
ओढिलें मग तिनें पदराला, दाखवी बहुत भूपदराला[२]. ॥ २६८
'सांडिं गे! मजसवें गमजातें, ठाउकें सकळ आगम[३] ज्यातें ।
रेंतसी[४] मजसवें अनुरागें[५], कंस मारिन तुझ्या तनु रागें.' ॥ २६९
'क्षणिक सुख हरी! हें काय आषक्य होसी?
तदुपरि परलोकीं जाब तूं काय देसी? ।
सदन धन जनाला सर्वथा आचरावें,
झडकरि परलोकींहूनि म्यांही चरावें.' ॥ २७०
बोल ते बहुत ते रण सोडी, सर्वथा परि तयेसि न सोडी, ।
चिंतिलें परि कसेंच पळावें, भाक देउनि तरीच पळावें. ॥ २७१
वदे तदा, 'वागति लोक पाहें, एकांतिचें हें तरि कार्य आहे, ।
आतां तरी तूं घरिं जाउं देई, येईन सांजे हरि! भाक घेई. ॥ २७२
चिंतिलें हरि! तुझेंच करावें, सज्जनासि तरि भाव करावे, ।
भाक देउनि ठकुनी[६] निघाली, कृष्ण शेज मग कानानिं घाली. ॥ २७३
चंद्रावळी हांसति त्या सुकेशी, भाकेसि उत्तीर्ण कसेनि होसी[७]? ।
म्हणे तया काय, 'उगें असावें, यत्नें खळापासुनि सोडवावें.' ॥ २७४
चंद्रावळी आत्मगृहासि गेली, त्यानंतरें ते मग सांज झाली, ।
तो वाट पाहे मग तो मुरारी, झाली असे रात्र नयेचि नारी. ॥ २७५
म्हणे, 'कां न येते कसें काय झालें? मला वंचिलें[८] कीं तिचें विघ्न ठेलें ।

१. पृथ्वी, धरत्री. २. राजभयातें. ३. वेद. ४. रतसी, रममाण होसी. ५. प्रीतीनें. ६. फसवून. ७. तूं आपलें वचन पुरें कसें करशील? ८. फसविलें.

उठे बैसतो येत जातां न भागे, प्रियेवांचुनी सेज पाठीस लागे. ॥ २७६
हा चंद्रमा तावितसे करानें[1], कां ठेविलासे तरि शंकरानें, ।
तयेविणें काय मला घरानें, जाळी असे सर्वहि वाघरानें. ॥ २७७
घालिसील किति विंजणवारा, दाह होत बहुसा जन वारा, ।
होतसे तरि शरीर विदारा, ते मला त्वरित दाखविं दारा. ॥ २७८
सांगिजे विनती पंचशरा हे, आजिचा दिवस तूं शम[2] राहें, ।
पीडिसील किती कामशरानें? जीव वाटत असे दश रानें. ॥ २७९
मन्मथासि शुभ वस्तुसि दावा, जीव जाय निजवस्तुसि दावा, ।
पुष्पभार मजलागिं न साहे, त्यास हो बहुत चंदन साहे. ॥ २८०
काननांत रुतु सारस माजे, स्त्रीजनांत बहुसा रस माजे, ।
कोण पाहत असेल तमासा, प्राण चंचळ जसा धृत[3] मासा. ॥ २८१
केतकीदळ सुगंध न वाटे, कां नयेचि वनिता धन वाटे, ।
तोष देत न फुलेल जना ती, प्राण काम मज सोडुनि जाती. ॥ २८२
चित्तभंग बहु पुष्पपरागें, जेंवि जाय मुनिचें तप रागें, ।
हार ते उरग भासति मातें, पाहणें चहुंकडे बहु मातें. ॥ २८३
काय येइल नयेच पळानें, सोडिलीच झणिं म्यां चपळानें ।
कोण बेळ तरि चिंतित जावें, काय म्यां निज शरीर त्यजावें. ॥ २८४
नीज हे मज नये कँरमेना[4], नीज हेम जन एक रमेना, ।
धाम हा जन मनोजय दावा, वा महाजन मनोज येंदावा (?)' ॥ २८५
ऐसा हरी खिन्न विशेष झाला, तों अंशुमाळी[6] उदयासि आला, ।
त्यानंतरें काय मनीं विचारी, स्त्रीवेष वेऊनि ठकीन नारी. ॥ २८६
स्त्रीवेषधारी मग काय कँारी[7], राहीच झाला न दिसे मुरारी, ।
बैसोनियां पालखिये निघाली, चंद्रावळीच्या सदनासि आली. ॥ २८७
चंद्रावळी बहुत सत्वर धांव घाली, आनंदयुक्त उभयां मग भेटि झाली, ।

---

१. किरणांनीं. २. शांत. ३. धरलेला. ४. चैन पडेना. ५. हें पद्य 'चरणयमका'चें उदाहरण आहे. 'अंत्ययमक वाढतां वाढतां अगदीं चरणभर वाढत जातें. [अशा] चरणभर वाढत गेलेल्या यमकास 'चरणयमक' म्हणतात. [अलंकारमीमांसा–पृष्ठ ५३.] यमकाचे अनेक भेद आहेत:—पुच्छ, पंक्ति, संदष्टक, संदंश, सुख, गर्भ, परिवृत्ति, युग्मक, महायमक. (काव्यालंकार–अध्याय ३ पहा. काव्यप्रकाश—नवम उल्लास–पृष्ठ २६२-५६३—वामनाचार्यसंशोधित आवृत्ति पहा.) ६. सूर्य. ७. करी.

राही करीं धरुनियां सदनासि नेली, वोंवाळणी निजकरें तिजलागिं केली.॥ २८८

'अगइ! नवल मोठें आज हें काय झालें?
अघटित घडलें कीं हेम चाऱ्यासि[1] आलें. ।
अति तरि सुख त्राटे मायना[2] तोष सृष्टी,
बहुत दिवस झाले देखिलें आजि दृष्टीं.' ॥ २८९

राही म्हणे, 'हे उपचार पाहीं, दोवींत वो! अंतर भिन्न नाहीं. ।
आलिंगनानें मन फार धालें, मदीय सर्वांग बरें निवालें.' ॥ २९०

चंद्रावळी विविध पाक[3] करी त्वरेसी.
भर्तार हांसत असे बहुसा तयेसी, ।
'जेव्हां मदीय भगिनी सदनासि येती,
तेव्हां न होयच अशी तरि पाकरीती.' ॥ २९१

'जे नित्य काळ पळ ते सदनासि येती,
त्यांलागिं आदर मह्रा तरि कोण देती[4]? ।
जे कीं विशेष समयीं जरि येत आहे,
त्यालागिं फार करिजे उपचार पाहें.' ॥ २९२

त्यानंतरें भोजनसिद्धि झाली, तों पश्चिमाशा[5] रविला मिळाली. ।
प्रिया[6] प्रियालागिं म्हणे स्वभावें, 'रात्रीं घरा आजि तुम्ही न यावें. ॥ २९३

आली पहा मद्भगिनी गृहासी, झाली नसे एकहि गोष्ट तीसी, ।
दोवीजणी स्वस्थ कथा स्वभावें, याकारणें आजि घरा न यावें.' ॥ २९४

'बरें' म्हणोनी प्रिय शीघ्र गेला, चंद्रावळी मंचक सिद्ध केला. ।
चहूंकडे त्या समया घृतानें, भरून लावी मग दिव्य मानें[7]. ॥ २९५

लवंग जायेफळ जायपत्री, कंकोळ वेलां[8] कमनीय पात्रीं ।
कर्पूर तांबूलदळें[9] विशाळें, पूंगीफळांचीं शकलें[10] निराळें. ॥ २९६

चुना तथा कात सुगंध भारी, ऐसी विड्यांची करि दिव्य नारी. ।

---

१. चारा देऊन सोनें मिळालें—असा भाव. २. मावेना, राहीना. ३. पक्वान्नें. ४. बहु सहवासानें अनादर उत्पन्न होतो—असा समज सार्वलौकिक आहे. 'बहु सहवास अनादरकारण' [मोरोपंत]. 'अतिपरिचयादवज्ञा संततगमनादनादरो भवति'. 'अति तेथें माती.' Familiarity breeds contempt. ५. दिवस मावळला—असा भावार्थ. ६. चंद्रावळी. ७. आदरपूर्वक. ८. वेलदोडा. ९. विड्याचीं पानें. १०. सुपारीचीं खांडें (तुकडे).

उगाळिलें केशर तें निराळें, कृष्णागरूनें[1] भरिलें कचोळें. ॥ २९७
पोंवा जेवादी[2] उपमाच नाहीं, कस्तूरिका आबिरगंध पाही ।
गुलाल नानापरिचे फुलेले, अबीर पुष्पांसहि सिद्ध केलें. ॥ २९८
दोघीजणी वीटक[3] नीट घेती, एकासि एकी उपचार देती ।
राही म्हणे, 'रात्र विशेष झाली, निद्रा भरानें नयनासि आली.' ॥ २९९
आलिंगनें देउनियां निजेल्या, कृष्णें कुचेष्टा मग नीट केल्या ।
ओढी निरी कंचुकिग्रंथि सोडी, मर्दी कुचां चुंबन देत तोडी. ॥ ३००
नेत्रांस उद्घाटुनि[4] नीट पाहे, राही न देखे हरि देखताहे. ।
बाला म्हणे, 'हें तरि काय झालें? कैसें महद्भूत उगेंच आलें? ॥ ३०१

अगइ! अवचिती हें काय गे! स्वप्न पाहें?
बहिण तरि नव्हे हे वीवशी[5] कोण आहे? ।
चकितचि चपळाक्षी नेत्र लावूनी पाहे
तंव तरुण मुरारी अंतरीं देखताहे. ॥ ३०२

तदा समुन्मीलितनेत्र बाला, पाहातसे सत्यच मेघनीळा, ।
वदे नटानें मग काय, 'यानें, राहीस्वरूपें ठकिलें ठकानें.' ॥ ३०३
हरी म्हणे, 'हें उसणें स्वभावें, भाकेसि देऊनि कसें पळावें? ।
बरें दिसे काय पळून जातां? उगी असें. आग्रह काय आतां? ॥ ३०४
चिच्छक्ति तूं, मी जगदीश पाहीं; दोघांत वो! भिन्न नसेच कांहीं. ।
बाह्यांतरीं मीच वसें स्वभावें, तेथें दुजेंसें मग कां वदावें?' ॥ ३०५
उठोनियां ते मग नीट पाहे, तों देव पीतांबर नेसलाहे. ।
आपादपद्मांकित वैजयंती[6], माळा गळां अंग सनीळ कांती. ॥ ३०६
शोभे महा नाभि सरोज पाहें, विश्वांत जन्मस्थळ तेंच आहे. ।
उरस्थळीं मंडण थोर मानें, श्रीवत्स ऐसें दिधलें द्विजानें[7]. ॥ ३०७

---

१. चंदनविशेष. २. कस्तूरी. ३. विडे, पानपट्या. ४. उघडून. ५. जखीण. ६. ही वैजयंती पुष्पांची माला विष्णूची होय. हिचीं कुसुमें कोमजत नाहींत असा समज आहे. या वैजयंतीचीं पुष्पें जशीं सदां ताजीं आणि टवटवीत असतात, तशींच Laurel नामक झाडाचीं पुष्पें कधीं वाळत नाहींत, सदां ताजीं असतात, असा प्राचीन रोमन लोकांचा समज आहे. ७. भृगुऋषीनें. 'भृगुनामक ऋषि ईश्वराच्या ब्रह्मा महेश आणि विष्णु या तीन रूपांपैकीं अधिक सहनशील कोणतें तें पाहण्याच्या हेतूनें प्रथम ब्रह्मदेवापाशीं गेला- नंतर शिवापाशीं गेला. परंतु या दोन्ही ठिकाणीं त्याचा अपमानच झाला. शेवटीं तो विष्णूपाशीं गेला आणि लक्ष्मी-जवळ असतांना त्याच्या उरावर लाथ मारिली, तरी श्रीविष्णूनें त्याचा धिक्कार न करतां उ-

प्रभावसे कौस्तुभ सन्मणीसी, महायुधें सिद्ध चतुर्भुजांसीं ।
आकर्ण पूर्ण नयनें विशाळें, मुखांबुजीं तेज असे निराळें. ॥ ३०८
गालावरी कुंडलतेज साजे, किरीट माथां बहुसा विराजे, ।
देखोनि रूपा मग ते निवाली, चंद्रावळी ते प्रणिपात[1] घाली. ॥ ३०९
मनोवृत्तिभावें स्वरूपीं मिळाली, हरीनें तदा आसनें[2] सिद्ध केलीं ।
महाप्रीति दोघांजणांलागिं आली, म्हणोनीच ते रात्र षण्मास झाली. ॥ ३१०
हा वृक्ष पाहा कदलीद्वयानें, संवेष्टिला काय महा सुखानें ।
दुरूनी पंचास (?) सवेग आला, तो पर्वतांगींच धरूनि ठेला. ॥ ३११
नेणो महावातनिघात येतो, याकारणें चंचल वृक्ष होतो ।
सुवर्णवल्ली सुखसेज आली, अंबूज चंद्रासही भेट झाली. ॥ ३१२
कामांकुशीं मंडन थोर केलें, द्विजीं सुरंगा मग रंगवीलें ।
कपोतिका फार करी स्वरानें, कृष्णत्व हा घोळतसे तयेनें. ॥ ३१३
हा काळ पाहें विपरीत भासे, मेघावरी पर्वत पालथेसे ।
मली (?) तयाच्या चपळा सुभावें, तयावरी पर्वत थोर धांवे. ॥ ३१४
पाहा कसें हें विपरीत झालें, तमीं असौमात (?) गिळूनि ठेले ।
भूमंडळीं अंबर तें निजेलें, तारांगणीं व्यापित सर्व केलें. ॥ ३१५
आकाशदेशाहुनी चंद्र येतो, सरोज सारांश सुधेस घेतो, ।
तैसीच गंगा उतरे महीतें, पुनः पुन्हा तेच उडोन जाते. ॥ ३१६
नानाप्रकारीं सुरते सुकर्णी, आकर्णिली कोण तयेसि वर्णी ।
ग्रंथासि संपूर्ण करी त्वरेसी, भृंगारवासी[3] कवि नागजोशी. ॥ ३१७

---

लट सत्कार केला, व तें भृगुऋषीच्या लाथेचें आपल्या उरावर उमटलेलें चिन्ह अलंकाराप्रमाणें शोभादायक मानूं लागला. त्या लाथेच्या चिन्हाला श्रीवत्स व विष्णूला श्रीवत्सांक अथवा श्रीवत्सलांछन असें म्हणतात. [विविधज्ञानविस्तार.]

१. नमस्कार. २. बंध=कामशास्त्रविषयक ग्रंथांत वर्णिलेलें आसन. सुरताचे उत्तानक, वर्यंग, उत्थित, स्थित आणि आनतक असे पांच भेद मानिले आहेत आणि या भेदांचे अनेक प्रभेद आहेत. त्यांसच बंध अथवा आसन असें नांव आहे. नागरबंध, व्योमपादबंध, सौम्यबंध, जृंभितबंध, वीणकबंध असे अनेक बंध आहेत. यांचें सविस्तर निरूपण 'रतिरहस्य', 'अनंगरंग' 'रतिमंजरी' इत्यादि ग्रंथांत पहावें. हे बंध कांहींच्या मताप्रमाणें १६ आहेत व कित्येक तर यांची संख्या ८४ पर्यंत वाढवितात. ३. भिंगार येथें राहणारा.

## उपसंहार.

**'चंद्रावळीवर्णन'** पूर्ण झालें, काव्यामृतें विश्व समस्त धालें, ।
जे गाति हर्षें नर आणि नारी, ते सर्वभावें मिळती **मुरारी**. ॥ १

## कविवर्णन.

पिता **मोर**जोशी महा ख्यात आहे, तथा **जान**की नाम मातेसि आहे; ।
अहो! थोरल्या दोन्हि बंधूंसि साचें, असे नाम **मल्हारि**चें **त्र्यं**बकाचें. ॥ १
तया धाकुटा तोच **ना**गेश पाहें, कवित्वीं जया ज्ञान संपूर्ण आहे. ।
तयाच्या मुखें ग्रंथ संपूर्ण झाला, जनां वाचितां फार आनंद झाला. ॥ २

**को**[1]काव्या **य**शवंतराव जगतीं विख्यात राजा असे
त्याच्या पुण्यकृती पुरोहित बरा तो **मो**रजोशी वसे ।
तत्पुत्रें लघुकोमलामलपदीं पद्मावळी गुंफिली
श्री**ना**गेशकवीश्वरें सभवरें **चं**द्रावळी वर्णिली. ॥ ३

**गणे**शास आधीं नमस्कार केला, तयानंतरें प्रार्थिलें **शार**देला, ।
करां जोडुनी वंदिलें सद्गुरूसी, बरा ग्रंथविस्तार केला त्वरेसी. ॥ ४

---

१. हा कोणी जहागिरदार, इनामदार असावा. ह्या यशवंतरावाविषयीं माहिती अहमदनगराकडील इतिहासप्रिय हितचिंतकांनीं मिळवून पाठविल्यास फार उपकार होतील.